श्री मातुश्री जमनाबाई स्मारक ग्रंथमाला पुष्प १ लें

# स्त्री-जीवनविषयक कांहीं प्रश्न

सौ. कमलाबाई टिळक, एम्. ए.

व्हीनस बुक स्टॉल

# विज्ञापना

आपल्या देशी भाषांतील साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सदुद्देशानें, पतितपावन कै. श्रीमंत सरकार महाराजसाहेब सर सयाजीराव (तिसरे) गायकवाड, सेनाखासखेल समशेरबहादूर, जी. सी. आय्. ई., एल्एल्. डी. यांच्या आज्ञेनुसार कै. श्रीमंत मातुश्री महाराणी जमनाबाईसाहेब यांच्या पुण्यस्मृतिप्रीत्यर्थ एक ग्रंथमाला प्रसिद्ध करण्याचें ठरविण्यांत आलें होतें.

तदनुसार श्रीमती सौ. कमलाबाई टिळक, एम्.ए. यांजकडून तयार करविण्यांत आलेलें "स्त्री–जीवनविषयक कांहीं प्रश्न" नामक पुस्तक "श्री मातुश्री जमनाबाई स्मारक ग्रंथमालेचें" प्रथमपुष्परूपानें प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

भाषांतर शाखा
प्राच्य विद्यामंदिर,
बडोदे.
ता. २२–७–४०

भा. प्र. कोठारी
भा. मदतनीस

ज्यो. मा. मेहता
विद्याधिकारी
बडोदें राज्य

# अनुक्रमणिका



शास्त्र) समजली जाऊ लागली. स्त्रीच्या मोहाला बळी पडणाऱ्या आपल्या मनाला दोष देण्याऐवजी, पुरुष मोहवस्तूलाच, स्त्रीलाच दोषी ठरवू लागले व तिच्या अंगी आपल्या अंगचे अवगुण चिकटवू लागले.

**यदि जिव्हासहस्रंस्याज्जीवेच्च शरदां शतम् ॥**
**अनन्यकर्मा स्त्रीदोषाननुक्त्वा निधनं प्रजेत ॥** —महाभारत

(हजार जिभा असलेला एकादा मनुष्य, दुसरे काही काम न करता, शभर वर्षें जगून, स्त्रियाचे दोष सागत बसला, तरी त्याच्याकडून ते दोष पुरते सागितले जाणार नाहीत. सागता सागताच तो मरून जाईल!)

**शय्यासनमलंकार कामं क्रोधमनार्जवम् ।**
**द्रोहभावं कुचर्यां च स्त्रीभ्यो मनुरकल्पयत् ॥** —मनुस्मृति

अशी स्त्रियाच्या दोषाची नामावळी मनूने सागितली आहे. पद्मपुराणात तर स्त्रियाना कमालीच्या विषयासक्त ठरवले आहे.

**स्थलं नास्ति क्षणं नास्ति नास्ति मार्थयिता नरः ।**
**तेन नारद नारीणां सतीत्वमुपजायते ॥**

मनूने पुरुषाला आई–बहीण–मुलगी याच्यापासूनसुद्धा सावध राहण्यास सुचविले आहे.

**मात्रा स्वस्त्रा दुहित्रा वा न विविक्तासनभाग्भवेत् ।**
**बलवानिन्द्रियग्रामो विद्वासमपि कर्षति ॥**

दुर्गुणाची केवळ खाण अशा स्त्रीवर कुणाचे तरी दडपण असणे नेहमीच जरूर आहे. म्हणून मनु म्हणतो,

**पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।**
**रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥**

याप्रमाणे स्त्रियाच्या कपाळी पारतन्त्र्याचा शिक्का कायमचा बसला. बालविवाहादि रूढीनी पारतन्त्र्याच्या दुःखाच्या जोडीला दुर्दशा आणिली. विवाह हा उपनयनाच्या जागी मानला गेल्यामुळे आठवे वर्ष, ही विवाहाची उत्तम वेळा ठरली. इतक्या लहानपणी, विवाहविषयक मुलीचे मत विचारण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. मुक्या गाईप्रमाणे, आईबाप घालतील तेथे तिला बांधून राहावे लागे. लहान वयामुळे पित्याच्या घरी काहीच शिक्षण झालेले नसतें; व विवाह झाल्यावर स्त्रीचें व्यक्तिमत्वच नाहीसे होत असल्यामुळें, तिच्या

---

# स्त्री-जीवनविषयक कांहीं प्रश्न

प्रकरण १ लें : : :

.... .... पूर्वी व आतां

श्रीमती सरोजिनी नायडू यांनीं १९०६ सालीं केलेल्या आपल्या एका भाषणांत असे उद्‌गार काढले होते कीं, "विसाव्या शतकांत सभास्थानीं उभें राहून आम्ही स्त्रीशिक्षणासाठीं आक्रोश करावा, ही सकृद्दर्शनी किती अचंब्याची गोष्ट आहे? इसवी सनापूर्वी अडीच हजार वर्षे भारतीय स्त्रिया उच्च संस्कृतीच्या कळसास पोचल्या होत्या; आणि आज—आज चार हजार वर्षांनंतर भारतीय स्त्रियांना शिक्षण द्या—नुसतें प्राथमिक शिक्षण तरी द्या, असा आम्ही कंठशोष करीत आहो!"

काय ही अनुकपनीय पुच्छप्रगति! ज्या वेळी इतर देशांतील रानटी स्थितीत असलेल्या समाजांतील स्त्रिया भारवाहक पशूंचे जीवन कंठीत होत्या, त्या वेळीं भारतीय समाजांत सुलभा, गार्गीसारख्या अनेक स्त्रिया, पुरुषांच्या बरोबरीनें कर्ममार्ग व ज्ञानमार्ग अवलंबीत होत्या: आणि आज, इंग्लंड-रशियादि देशांत स्त्रिया या पुरुषांच्या धर्मअर्थादि व्यवहारांत खऱ्याखुऱ्या सहचारी बनल्या आहेत, व भारतीय स्त्रिया केवळ भारवाहक होऊन राहिल्या आहेत. कोणाही विचारवंत मनुष्यास हा विपरीत प्रकार पाहून खेद वाटल्याशिवाय राहणार नाहीं, व हें असे कां व कसे झाले याची चुटपुट मनांतून जाणार नाहीं. भारतीय स्त्रियांचा हा असा अधःपात चार हजार वर्षांत कसकसा होत गेला हें आपण थोडक्यांत पाहूं.

वेदकाली स्त्रियांचा दर्जा किती उच्च होता, हे एकाच गोष्टीवरून अजमावतां येईल. ती म्हणजे आर्यांची देवविषयक कल्पना. आर्यांच्या दैवतांत देवतांची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. किती तरी वैदिक ऋचांतून या देवतांना आर्यांनीं आळवलें आहे. शिवाय अखिल सृष्टीच्या आद्य तत्त्वाच्या

कल्पनेंतही स्त्रीतत्त्वाला बरोबरीने स्थान देण्यांत आले आहे. प्रकृतियुक्त परमेश्वर अर्धनारीनटेश्वर हा विश्वाचा निर्माता, शास्ता व त्राता आहे. कुठल्याही देवाला, स्त्रीतत्त्वावांचून, शक्तीवांचून, आर्यांच्या मताप्रमाणें मुळी पूर्णताच येत नाही. वेदकालीन इन्द्राणी एके ठिकाणी, मोठ्या अभिमानानें म्हणते, "देवहो, इन्द्राच्या मोठेपणाचें मूळ कशांत आहे? माझ्या ठिकाणी आहे तें. मी सर्व शक्तिमान् आहे. माझ्या पतीनें माझे सामर्थ्य ओळखून असावें!"

कोठे ही वेदकालीन स्वसामर्थ्याची जाणीव व आत्मविश्वास व कोठे विसाव्या शतकांतल्या परिस्थितीने दुबळ्या झालेल्या, व्यक्तित्व, माणुसकी गमावून बसलेल्या, अज्ञानी, भारभूत वाटणाऱ्या परावलंबी स्त्रिया! आपणास वैदिक धर्मीय म्हणवणारे हिंदु आज आपला वेदांगभूत धर्म विसरून गेले आहेत. 'न मातुः परं दैवतम्।' असा तोंडाने पोकळ जप मात्र ते करतात; पण प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र या देवतांच्या नशीबी, अज्ञान, अवमान व पारतन्त्र्य यांची खेटरपूजा असते.

वेदकाली स्त्रियांना मान होता, कारण त्यांना पुरुषांप्रमाणेच तेव्हां स्वतंत्र बौद्धिक व आत्मिक जीवन होते. या जीवनाला आवश्यक असे उच्च दर्जाचें शिक्षण, त्यांना मुलांच्या बरोबरीनें मिळे. मुलीचे मुलांप्रमाणेच उपनयन होत असे. उपनयनानंतर शिक्षणाचा काळ सुरू होई. स्त्रीविद्यार्थिनींचे दोन गट असत. सद्योद्वाहा व ब्रह्मवादिनी. पहिल्या प्रकारच्या विद्यार्थिनी सोळाव्या वर्षापर्यंत शिक्षण घेऊन मग अनुरूप पतीशीं विवाहित होत.

**ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम्।** —अथर्ववेद

(ब्रम्हचर्याच्या काळांत योग्य शिक्षण घेतल्याने मुलीला योग्य नवरा मिळतो.)

वैदिक स्तोत्रें व नित्यनैमित्तिक कृत्यांना लागणारी सूत्रें त्या मुखोद्गत करीत. शूद्रांप्रमाणें स्त्रियांना वेदाधिकार व ज्ञानाधिकार नाहीं ही दुष्ट कल्पना त्या वेळी अस्तित्वांत आली नव्हती. पुरुषांप्रमाणेच स्त्रिया सांजसकाळ संध्या करीत. विवाहानंतर गृहस्थाच्या जीवनांत, पत्नीचें स्थान फार उच्च असे.

**अयज्ञीयो वैष योऽपत्नीकः।** —शतपथ ब्राह्मण

पत्नीशिवाय गृहस्थाचा, यज्ञ ज्याचा प्राण असा वैदिक धर्म अपुरा राही. यज्ञामध्यें पत्नीचा फार महत्त्वाचा भाग असे. सामवेदांतील भाग गाणें, यज्ञीय

तांदूळ कुटणें, यज्ञीय पशूला स्नान घालणें, वेदीच्या विटा रचणे, वगैरे कामें तिलाच करावयाचीं असत. सूत्रकालापर्यंत, म्हणजे इसवी सनापूर्वी पांचशें वर्षांपर्यंत पति बाहेर गांवी गेला असतां, पत्नीला यज्ञकर्म करण्याची परवानगी असे. फक्त स्त्रियांनीं करावयाचे असेसुद्धां सीता, रुद्रबली, रुद्रयाग वगैरे अनेक यज्ञ असत.

ब्रह्मवादिनी स्त्रिया आजन्म ब्रह्मचर्य पाळून वेदविद्येचा व ब्रह्मविद्येचा अभ्यास करीत. त्यांचा व्यासंग सद्योद्वाहांपेक्षां अर्थातच जास्त दांडगा असे. पठणाशिवाय स्वतंत्र लेखनही त्या करीत. लोपामुद्रा, विश्ववारा, घोषा या विदुषींनीं रचिलेल्या ऋचा ऋग्वेदांत आढळतात. ब्रह्मयज्ञाच्या समयीं संस्मरणीय अशा विद्वान् लेखक वर्गांत, सुलभा, मैत्रेयी, गार्गी, वाचक्नवी या पंडितांचींही नांवे आहेत. दुर्दैवाने या स्त्रियांची ग्रंथसंपत्ति आज उपलब्ध नाही. वेद, पूर्वमीमांसा याबरोबर तत्त्वज्ञानाचाही अभ्यास स्त्रिया करीत. याज्ञवल्क्याची स्त्री तिच्या आत्मज्ञानविषयक पिपासेबद्दल प्रसिद्धच आहे. विदेही जनकाच्या दरबारांत जी आध्यात्मिक चर्चा चाले, त्यांत गार्गी अत्यंत प्रामुख्यानें भाग घेई; तिने एका प्रसंगी, याज्ञवल्क्यासारख्या विद्वानालासुद्धां कुंठित केले होते. स्वतंत्र ग्रंथरचना, आध्यात्मिक चर्चा, यांखेरीज पुरुषांप्रमाणेंच अध्यापनाचाही व्यवसाय स्त्रिया करीत. त्यांना उपाध्याया किंवा आचार्या अशी स्वतंत्र संज्ञा असे.

ज्याप्रमाणें यज्ञांत, राजदरबारांत, समारंभांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें मान असे, त्याचप्रमाणें गृहांतही स्त्रीचें स्थान फार स्पृहणीय होते. स्त्री, पुरुष व अपत्य या त्रिपुटीशिवाय, गृहस्थाला मुळी गृहस्थत्वच येत नसे. स्वतंत्र व सुबुद्ध अशा स्त्रिया आपल्या बालकांच्या सर्वश्रेष्ठ गुरु समजल्या जात होत्या. " हजार शिक्षकांपेक्षां पिता श्रेष्ठ; व त्यापेक्षां हजारपटीनी माता श्रेष्ठ गुरु समजावी, '' हे सुभाषित सर्वांस ठाऊक आहेच. पण आतां तें नुसतें लोकांच्या तोंडांतच राहिलें आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत तें गृहीत धरलेलें दिसत नाहीं; आणि बरोबरच आहे तें. स्वतःचें बालपण पूर्ण होण्याच्या पूर्वींच जी दुसऱ्या बालकांना जन्म देऊं लागते, ती बालिश, अर्धपक्व बुद्धीची, थकलेल्या देहाची व खुरटलेल्या मनाची माता, स्वतःच्या बालकांना त्यांच्या शरीर-मन-बुद्धीचा विकास करील, असें ओजस्वी शिक्षण कसें देऊं शकणार? वेदकालीं स्त्रियांचा शारीरिक,

मानसिक व आत्मिक ऱ्हास करणारा बालविवाह नव्हता. त्या आपल्या पसंतीनें स्वयंवर, सोळाव्या सतराव्या वर्षी शिक्षण पूर्ण झाल्यावर करीत. विवाहानंतर पत्नी ही, पुरुषाचा हक्काचा गुलाम न बनतां त्याची खरोखरीची सहधर्म-चारिणी व सखी होई. वेदांतून घेतलेले, आपल्या विवाहपद्धतींतील मंत्र अभ्यासिले तर ही गोष्ट स्पष्ट होईल. विवाहमंगलाचा विधि सुरू असतां, एके ठिकाणी उपाध्याय तिला म्हणतो,

**सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी अधि देवृषु ।**

दुर्दैवाने ही पहिली लग्नगांठ जर मध्येच तुटली, तर वेदकालीन स्त्रीला दुसरा अनुरूप सहचर निवडण्याची परवानगी होती. अथर्ववेदांत पुनर्लग्नाचा स्पष्ट उल्लेख आहे.

**या पूर्वं पतिं वित्त्वा अथान्यं विन्दते पतिम् ।**
**पञ्चौदनं च तौ अजं ददातो न वियोजतः ॥**

पुनर्लग्न न करतां, ती तशीच राहिली, तरी तिचे जीवित आधुनिक हिंदु विधवेसारखे कष्टमय होत नसे. सतीसारख्या निर्घृण व अमानुष कल्पनेला वेदांत थारा नाही. रानटी स्थितींत असतांना सतीची चाल आर्यांत असावी व नंतर सुसंस्कृत झाल्यानतर त्यांनी तिचे उच्चाटन केलें असावे, असे दिसतें. कारण, पत्नी पतीच्या चितेच्या शेजारीं किंवा त्याच्या मृतदेहाजवळ असतांना उपाध्याय तिला म्हणतो,

**उदीर्ष्व नार्यभिजीव लोकं गतासुमेतमुपशेषे एहि ।**
**हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभिसंबभूथ ॥**

—ऋग्वेद

( बाई, ऊठ; संसारांत परत चल. मृतपतीशेजारी कशाला बसतेस? त्याच्या विषयींचें तुझें पत्नीचे कर्तव्य संपलें आहे आतां.)

वेदकालीन समाजांत स्त्रियांचा दर्जा किती उच्च होता, हें वरील वर्णनावरून लक्षांत येईल. वेदकालीं पत्नी ही प्रत्येक बाबतींत पतीशीं "सहाधिकारी" होती. पण, सूत्रकालीं स्त्री या उच्च स्थानापासून ढळली. आर्य लोकांना या सुमारास संख्याधिक्यामुळें स्थलांतर करण्याची जरूरी भासूं लागली; उत्तरेकडील मुलूख सोडून, ते हळुहळूं दक्षिणेकडे सरकूं लागले. या नवीन वातावरणांत, त्यांची संस्कृति हळुहळूं बदलूं लागली. विशेषतः

दक्षिणेतील मूळ रहिवाशी अनार्यांशीं कराव्या लागलेल्या झगड्यांत, आर्यांची मूळ उच्च व उदार संस्कृति मलिन झाली. जीवनकलहांत योद्ध म्हणून उपयोगी पडणाऱ्या पुरुषवर्गाला जास्त महत्त्व या कालांत येऊन, स्त्रिया या दुय्यम व कमी दर्जाच्या समजल्या जाऊं लागल्या. प्रत्येक युयुत्सु समाजांत, स्त्रियांना नेहमींच गौण स्थान मिळतें, हे आजकालच्या इतिहासावरूनही आपणांस स्पष्ट दिसतच आहे. अशा समाजांत स्त्रियांचे व्यक्तिमत्व पार लोपून, "रक्षण करण्याची एक वस्तु" एवढेंच महत्त्व त्यांना प्राप्त होतें. शिवाय, अनार्यांशी सारखा संबंध येत गेल्यामुळें, अनार्यांचा स्त्रियांकडे पाहण्याचा दृष्टिकोन आर्य हळुहळू उचलूं लागले. यामुळें, बहुपत्नीकत्व, नियोग वगैरेसारख्या असंस्कृत व स्त्रियांचे हीनत्व सिद्ध करणाऱ्या चाली आर्य-समाजांत पडत चालल्या.

सूत्रकाली स्त्रियांचा दर्जा हीन होण्याचे बलवत्तर कारण म्हणजे, या सुमारास त्यांना वेदपठणाला व यज्ञकर्माला अनधिकारी ठरविण्यांत आलें हें होय. स्त्रिया यज्ञकर्माला अनधिकारी कां ठरविण्यांत आल्या, याचें एक कारण फारच मनोरंजक आहे. यज्ञकर्मांत 'सोमप्राशन' हे एक महत्त्वाचे अंग असे. दक्षिणेकडील उष्ण प्रदेशांत, नाजूक प्रकृतीच्या स्त्रियांना सोमप्राशन सोसत नाहीं असें आढळून आल्यामुळे, तैत्तिरीय संहितेत "स्त्रियांना सोमप्राशनांत भाग देऊं नये" असा दंडक घालण्यांत आला; व पुढे हळुहळू सर्वच यज्ञ-कृत्यांतून त्यांना वगळण्यांत येऊं लागलें. वेदपठणाची अर्थातच त्यांना गरज पडेनाशी झाली; व म्हणून त्या वेदाच्याही अनधिकारी समजल्या जाऊं लागल्या.

स्त्रिया वेदपठणाला अनधिकारी ठरण्याची दुसरींही कारणें होतीं. सूत्रकाली, वैदिक धर्माचें एकसूत्री, समानदर्शी स्वरूप लोपून, त्याला क्लिष्ट, उथळ, व निव्वळ कर्मकांडाचे स्वरूप प्राप्त झाले. आर्य अनार्यांत शरीरसंबंध होऊन विविध 'वर्णांची' प्रजा निर्माण होऊं लागल्यामुळें चतुर्वर्णाची संस्था निर्माण करावी लागली. मंत्रद्रष्टे ब्राह्मण, साहजिकच वर्णश्रेष्ठ बनले व त्यांनीं सर्व ज्ञानकर्माचा मक्ता आपल्याकडे घेऊन त्यांचें पावित्र्य राखण्यासाठी, नीच योनींतील वैश्यशूद्रांना वेदांचे अनधिकारी ठरविले. याच स्तुत्य हेतूनें, स्त्रियांचाही वेदाधिकार व यज्ञाधिकार हळुहळू काढून घेतला गेला. वेदांच्या शाखाउपशाखा व यज्ञांचे मंत्रतंत्र, ब्राह्मणांच्या काळीं फारच

वाढले होते. या प्रचंड वेदविद्येचे आकलन स्त्रियांकडून निर्दोषरीत्या होईल, अशी ब्राह्मणांना खात्री वाटेना. कारण उपनयनापासून विवाहापर्यंत सर्व-सामान्य स्त्रीला फक्त सातआठ वर्षें वेदाध्ययनाला मिळत. वैदिक कालीं एवढा काल अध्ययनाला पुरा पडे. पण वेदांचा विस्तार ब्राह्मणकालीं वाढल्यामुळे व वेदमंत्रोच्चार करतांना एवढीशी चूक झाली तरी ती पाठकाचा नाश करते अशी समजूत प्रचलित झालेली असल्यामुळे, स्त्रियांना वेदाध्ययनाला मनाई करण्यांत आली. जिनें यज्ञाला उपयोगी पडणारे वेदमंत्र अभ्यासिले नाहींत, ती स्त्री यज्ञकृत्यांत जाणतेपणे कसा भाग घेऊं शकणार व ग्रथाधाराशिवाय अतिशय गुंतागुंतीचे झालेलें ब्राह्मणकालीन यज्ञतंत्र ती निर्दोषपणे कसे पार पाडणार? तेव्हां स्त्रीला यज्ञांत पुरुषाच्या बरोबरीनें भाग घेण्याची बंदी ओघा-नेंच आली. यज्ञकाली, पतिशेजारचें, तिचें सान्निध्य निवळ औपचारिक 'हाताला हात लावावा' या स्वरूपाचे होऊन बसलें. स्त्रियांचीं यज्ञांगभूत सर्व कर्तव्यें निरनिराळया पुरुपांकडे सोपविण्यांत आली. पतीच्या गैरहजेरीत त्याचा पुत्र किंवा बंधु यज्ञादि धर्मकृत्यें करूं लागला. सध्याबलि देण्याची पत्नीला परवानगी असे; पण तीसुद्धां अमत्रक देण्याची!

**सायमन्नस्य पक्वस्य पत्न्यमंत्रं बलिं हरेत् ।** —मनुस्मृति

वेदाभ्यासाचा अधिकार नसल्यामुळें, उपनयनाला साहजिकच केवळ औपचारिक स्वरूप, स्त्रियांच्या बाबतींत येऊं लागलें. तिच्या विवाहापूर्वी तें केव्हां तरी कसेंबसे उरकून घेण्यांत येई. पुढें मनूच्या काळांत अशी टूम निघाली कीं, मुलीचे उपनयन करायचे पण ते वेदमंत्रपूर्वक करायचें नाही. ज्या वेदा-भ्यासासाठीं प्रवेश मिळावा म्हणून उपनयन करायचें, ते वेदच उपनयनाचे वेळीं उच्चारायचे नाहीत, ही केवळ उपनयनविधीची थट्टा आहे, असें दिवसे-दिवस साहजिकच वाटूं लागले व पुढें याज्ञवल्क्यासारखे स्मृतिकार मुलींचे उपनयनच करूं नये, असे प्रामाणिकपणे उघड उघड म्हणूं लागले. स्त्रियांच्या बाबतींत लग्न हाच संस्कार उपनयनवजा मानला जाऊं लागला; कारण, पति-सेवा ही गुरुसेवेसारखीच आहे व घरकाम हें एक प्रकारचे यज्ञकृत्यच आहे असें सांगण्यांत येऊं लागलें.

**वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिकः स्मृतः ।**
**पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया ॥** —मनु.

याप्रमाणें उपनयन म्हणजेच पर्यायानें वेदाभ्यास व धर्मकर्माधिकार बंद झाल्याबरोबर स्त्रियांची साहजिकच शूद्रांच्या बरोबर गणना होऊं लागली. हळुहळू जातकर्म, नामकरण, चूडा वगैरे वैदिक संस्कारही मुलींच्या बाबतींत अमंत्रक करावे, असे स्मृतिकार म्हणू लागले. याच्याही पुढें एक पाऊल जाऊन, यज्ञस्थानीं, औपचारिक रीत्या सुद्धां स्त्रियांनीं पतीच्या सन्निध बसण्याची जरूरी नाहीं, असें एक पक्ष म्हणूं लागला. पण, जेमिनीसारख्या विद्वानांनीं जुना पक्ष सावरून धरला. पत्नी ही यज्ञस्थली पतीच्या सन्निध असलीच पाहिजे; कारण 'दोघांनीं आचरणीय' अशीच सर्व यज्ञकृत्यें वेदांत वर्णिलेलीं आहेत. पण, एकटी पत्नी मात्र यज्ञ करू शकत नाहीं, असा सर्व स्मृतिकारांचा आग्रह आहे. कारण,

**अतुल्या हि स्त्री पुंसा । यजमानः पुमान् विद्वांश्च । पत्नी स्त्रीचाविद्या च ।।**

—पाराशरस्मृतीवरील माधवाचार्यांची टीका

या एकाच वचनावरून स्त्रियांचीं, वेदकालापासून स्मृतिकालापर्यंत कशी मानहानि होत चालली होती, हे उघड दिसून येईल. वेदकालीं एकटी, सहजरीत्या यज्ञ करणारी,

**कन्या वारयावती सोममपि स्रुता विदत् ।**
**अस्तं भरन्त्यब्रवीदिन्द्राय सुनवै त्वा ।।** —ऋग्वेद

कित्येक नवीन प्रथा यज्ञकृत्यांत चालू करणारी,

**वेधा ऋतस्य वीरिणीन्द्रपत्नी महीयते ।** —ऋग्वेद

वेदसूक्तें रचणारी, ब्रह्मवादिनी म्हणून गौरविली जाणारी स्त्री स्मृतिकारांच्या मते 'अविद्या' ठरली गेली!

अविद्या, अज्ञानाच्या अंगीं साहजिकच अनेक दोष व दुर्गुण आले. स्त्रीच्या मनाची व बुद्धीची वाढ खुंटून, पुरुषाच्या भोगेच्छापूर्तीचें एक साधन' यापलीकडे तिची किंमत उरली नाहीं. वैदिक तत्त्वज्ञानांत विवाह व पुत्रोत्पत्ति हे प्रत्येक गृहस्थाचे ध्येय व स्वर्गप्राप्तीचे साधन ठरविलें गेलें असल्यामुळें, स्त्रीला मोक्षमार्गांतील अडचण, असे पुरुषाने कधींच मानले नाही. पण उपनिषद्, ब्राह्मण व स्मृति यांच्या कालचा हिंदुधर्म आध्यात्मिक स्वरूपाचा व कर्मसंन्यासाकडे कललेला असल्यामुळें, शारीरिक सुखांचा मोह पाडणारी व संसाराच्या जंजाळांत पकडूं पाहणारी स्त्री ही '**नरकमार्गस्य दीपिका**'। (योग-

शास्त्र) समजली जाऊं लागली. स्त्रीच्या मोहाला बळी पडणाऱ्या आपल्या मनाला दोष देण्याऐवजीं, पुरुष मोहवस्तूलाच, स्त्रीलाच दोषी ठरवूं लागले व तिच्या अंगी आपल्या अंगचे अवगुण चिकटवूं लागले.

**यदि जिव्हासहस्रंस्याज्जीवेच्च शरदां शतम् ॥**
**अनन्यकर्मा स्त्रीदोषाननुक्त्वा निधनं व्रजेत ॥** —महाभारत

(हजार जिभा असलेला एकादा मनुष्य, दुसरे कांही काम न करतां, शंभर वर्षे जगून, स्त्रियांचे दोष सांगत बसला, तरी त्याच्याकडून ते दोष पुरते सांगितले जाणार नाहीत. सांगतां सांगतांच तो मरून जाईल!)

**शय्यासनमलंकारं कामं क्रोधमनार्जवम् ।**
**द्रोहभावं कुचर्यां च स्त्रीभ्यो मनुरकल्पयत् ॥** —मनुस्मृति

अशी स्त्रियांच्या दोषांची नामावळी मनूने सांगितली आहे. पद्मपुराणांत तर स्त्रियांना कमालीच्या विषयासक्त ठरवले आहे.

**स्थलं नास्ति क्षणं नास्ति नास्ति मार्थयिता नरः ।**
**तेन नारद नारीणां सतीत्वमुपजायते ॥**

मनूनें पुरुषाला आई–बहीण–मुलगी यांच्यापासूनसुद्धां सावध राहण्यास सुचविलें आहे.

**मात्रा स्वस्रा दुहित्रा वा न विविक्तासनभाग्भवेत् ।**
**बलवानिन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ॥**

दुर्गुणांची केवळ खाण अशा स्त्रीवर कुणाचे तरी दडपण असणे नेहमीच जरूर आहे. म्हणून मनु म्हणतो,

**पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।**
**रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥**

याप्रमाणें स्त्रियांच्या कपाळी पारतन्त्र्याचा शिक्का कायमचा बसला. बालविवाहादि रूढींनीं पारतंत्र्याच्या दुःखाच्या जोडीला दुर्दशा आणिली. विवाह हा उपनयनाच्या जागीं मानला गेल्यामुळें आठवें वर्ष, ही विवाहाची उत्तम वेळा ठरली. इतक्या लहानपणी, विवाहविषयक मुलीचें मत विचारण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. मुक्या गाईप्रमाणें, आईबाप घालतील तेथें तिला बांधून राहावें लागे. लहान वयामुळें पित्याच्या घरीं कांहींच शिक्षण झालेलें नसतें; व विवाह झाल्यावर स्त्रीचें व्यक्तिमत्वच नाहींसें होत असल्यामुळें, तिच्या

विकासाला उपयोगी असें शिक्षण घेण्याचें कारणच उरत नाहीं. पतीच्या घरी, ती त्याची हक्काची दासी म्हणून त्याच्या कक्षेंत राहते. वेदोक्त हक्काचें, मानाचे स्थान, योग्य शिक्षणाभावी तिला गृहांत व धर्मकृत्यांत मिळत नाहीं. तिचें स्वतत्र, शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक जीवन खुंटतें. पति हाच तिचा देव. पतीच्या मध्यस्थीवांचून तिला पारलौकिक हिताचा दुसरा प्रत्यक्ष असा रस्ताच नाही. हा पति कसाही असला, तरी त्याला देव म्हणून पूजले पाहिजे.

**विशील: कामवृत्तो वा गुणैर्वा परिवर्जित: ।**

**उपचर्य: स्त्रिया साध्व्या सततं देववत्पति: ।।**

हे साध्वीव्रत पतीच्या मरणोत्तरही चालू ठेवावयाचे. विधवा-पुनर्विवाहाची वेदकालीं प्रचलित असलेली पद्धति मनुस्मृतीच्या काळी बंद झाली. अगदीं कोवळया वयांत वैधव्य आले तरी मुलीला जबरदस्तीनें संन्यस्तवृत्तीची दीक्षा देण्यांत येई. पुरुषाला मात्र प्रथमपत्नीच्या हयातींत व मरणानंतर वाटेल तितक्या स्त्रिया करण्याची परवानगी होती. सतीची चालही कित्येक दिवस स्त्रियांच्या बोकांडीं बसली होती. या एकाच चालीवरून स्त्रीचें स्वतंत्र व्यक्तिमत्व कसे पूर्ण अस्तास गेले होते तें दिसून येईल.

आतां मनुस्मृतीनतर लिहिली गेलेली वाल्मिकी, कालिदासप्रभृतीचीं काव्ये व महाभारतादि इतिहास, यांत कांही स्वतत्र व कर्तबगार स्त्रियांचे आदर्श रेखाटलेले दिसतात खरे; पण या आदर्शभूत स्त्रिया बहुतेक क्षत्रिय वर्गांतून घेतलेल्या दिसतात. यावरून असे वाटते की, ब्राह्मणांना आपलें शासन प्रबळ व सत्ताधारी क्षत्रियांच्यावर बराच काळपर्यंत स्थापित करतां आलें नाही. उत्तरेसारख्या क्षत्रियांच्या मुली कलांचें शिक्षण घेत, सावित्री-दमयंतीसारख्या स्वयंवर करीत (दमयंतीला तर पुनर्लग्नाचासुद्धां हक्क अबाधित होता असें दिसतें). कैकेयीसारख्या पतीच्या बरोबरीनें युद्धाला जात. द्रौपदीसारख्या, युक्तिवाद लढवून पुरुषांशी धर्मचर्चा करीत. ओरिसाच्या त्रिभुवनदेवीप्रमाणें स्त्रिया स्वतंत्रपणें राज्यशकटही हांकीत असत.

याप्रमाणें, शास्त्रवचन धाब्यावर बसवून, प्रत्यक्ष व्यवहारांत क्षत्रियांनी जरी कांही वैदिक आचार चालू ठेविले असले, तरी त्यांच्या सर्वसाधारण विचारसरणीवर मनुस्मृतीचा संस्कार हळुहळूं होत चालला होता, हें उघड दिसतें. सुसंस्कृत व सुबुद्ध द्रौपदीला धर्मराजानें आपली खाजगी मालमत्ता

समजून पणाला लावली; सीतेसारख्या अकलंक साध्वीला राजा रामचंद्रानें, केवळ संशयावरून, ती गर्भवती असतां टाकून दिली; माद्री पंडूबरोबर सती गेली; राम एकपत्नीव्रत होता हें वरचेवर कौतुकानें वर्णिलें जातें; यावरून इतर राजांचा दशरथासारखा मोठा 'जनाना' होता हें उघड दिसतें.

महाभारत रामायणासारख्या श्रेष्ठ काव्यांच्या नायिका होण्याची ज्यांची पात्रता, अशा द्रौपदी-सीतेसारख्या प्रातःस्मरणीय थोर स्त्रियांची ही गत; मग काव्येतिहासांतून न उल्लेखिलेल्या, खालच्या थरांतल्या अनंत हिंदु स्त्रियांची, मनुस्मृतीच्या निर्दय शासनाखालीं कशी दुर्दशा व अधःपात होत असेल याची कल्पना करणें कठिण नाहीं.

याप्रमाणें, ब्राह्मणांचे तत्त्वज्ञान क्षत्रियांच्या अडथळासुद्धां हळुहळू जिंकीत, बलवत्तर होत जात होतें. पण इ. स. पूर्वी सुमारे पांचशे वर्षे, एका जबरदस्त धक्क्याने त्याचा पाया कांहीं काळ हादरून टाकला. या चळवळीचा उगमही प्रथम क्षत्रियांमधूनच झाला. ब्राह्मणांच्या कंटाळवाण्या व निर्जीव अशा कर्मकांडाच्या वेटोळ्यांमधून निसटण्याची ती शेवटची धडपड होती. शीख व जैन धर्मांचा या प्रतिक्रियेमधून जन्म झाला. परतु ब्राह्मण धर्माला सर्वांत जबरदस्त पायबंद बौद्ध धर्मानें घातला. राजबिंडा सिद्धार्थ, जगांतील दुःख-पापांनीं कंटाळून, राज्याचा त्याग करून, बायकामुलांना सोडून देऊन, बाहेर पडला; आणि सारा हिंदु समाज एका नवीन जीवनाने रसरसून गेला. जाति-भेद, यज्ञीय हिंसा, यांविरुद्ध बंड पुकारलें गेलें. संन्यास हा बौद्ध धर्माचा प्राण; यामुळें गौतम बुद्ध स्त्रियांविषयी प्रथम अगदी उदासीन होता. पण पुढें आईच्या आग्रहानें, त्यानें स्त्रियांना मुक्तिमार्ग खुला करून दिला. याप्रमाणें, हिंदु धर्मानें स्त्रियांच्या पायांत आध्यात्मिक पारतंत्र्याची ठोकलेली खोडाबेडी तुटून पडली व स्त्रिया पुरुषांप्रमाणे धर्माधिकारी बनल्या. बुद्धाची बायको, आत्या त्याच्या पट्टशिष्या बनल्या. त्या वेळची एक गोष्ट मोठी मनोरंजक व उद्बोधक आहे. गांवोगांवीं सद्धर्माचा प्रचार करीत करीत, बुद्ध एका शहरापाशीं आला. ब्राह्मणांनीं घाबरून शहराच्या वेशी बंद केल्या. पण पारतंत्र्याला कंटाळलेल्या हजारों स्त्रिया, धार्मिक व व्यावहारिक बंधने झुगारून, वेशी फोडून बाहेर पडल्या व बुद्धाला शरण जाऊन त्याच्या शिष्या बनल्या. बुद्धाच्या या असंख्य शिष्या, भिक्षूंप्रमाणेंच लहानमोठे मठ चालवीत. भिक्षुणींच्या मठांतील अंतर्गत

कारभार स्त्रियाच स्वतन्त्रपणे पाहात. याप्रमाणे, बौद्ध धर्माने व्यावहारिक व पारमार्थिक समान हक्क स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें मिळवून दिले.

पण बौद्ध धर्माचा हा विजय फारच क्षणभंगुर ठरला. बुद्धिमान्, कर्तृत्ववान् ब्राह्मण अपमान व पराभव मुकाट्याने गिळून फार दिवस स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. कालांतरानें, भिक्षुभिक्षुणींमध्यें माजलेल्या अनाचारांचा त्यांनीं फायदा घेतला. शंकराचार्यांसारखे दिग्विजयी, विद्वान् नेते निर्माण झाले, व त्यांनीं हिंदु धर्माची विजयी पताका पुनः देशभर फडकावली. स्त्रियांचे व्यावहारिक व आध्यात्मिक स्वातंत्र्य बौद्ध धर्माबरोबरच लयाला गेलें; व त्यांची, एथपासून एकोणीस-विसाव्या शतकापर्यंत उत्तरोत्तर सारखी दुर्दशाच होत गेली.

कारण, अकराव्या शतकापासून मुसलमानांचीं गंडांतरें सुरू झालीं. त्यांमुळे हिंदु स्त्रियांचे उरलेंसुरलें स्वातंत्र्य नामशेष झालें. मुसलमानांना त्यांच्या धर्मानें चार बायका करण्याची जरी परवानगी होती, तरी परस्त्रीशीं विवाह करण्याला मज्जाव होता. म्हणून आपल्या पोरीबाळींचें राज्यकर्त्यांच्या वांकड्या नजरेपासून रक्षण करण्यासाठी हिंदु प्रजा, आपल्या स्त्रियांना पडद्याआड लपवून ठेवू लागली व शक्य तितक्या लवकर त्यांचीं लग्नें उरकून टाकूं लागली. कधीं कधीं तर पाळण्याला बाशिंग बांधण्यापर्यंत वेळ येई. बालविवाह व पडदा या दोन चालींनीं स्त्रियांची शारीरिक, मानसिक वाढ कायमची खुरटली. मुसलमानांच्या बहुपत्नीकत्वाचा संस्कारही हिंदु समाजावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. मुसलमान समाजांतून घेण्याजोग्या अशा चांगल्या गोष्टी हिंदु समाजाने उचलल्या नाहींत. मुसलमान कायदा स्त्रियांच्या बाबतींत मनुस्मृतीपेक्षां किती तरी उदार आहे. विधवा-विवाह, विवाहविच्छेद, वारसा वगैरे किती तरी हक्क मुसलमान स्त्रियांना आहेत. पण हिंदु स्त्रियांच्या दुर्दैवानें, हिंदूनी हे अनुकरणीय कायदे न उचलतां पडद्याची चाल, स्त्रियांकडे एक चैनीची वस्तु अशा दृष्टीनें पाहण्याची मनःप्रवृत्ति, वगैरे वाईट गोष्टी मात्र मुसलमानांपासून घेतल्या.

पुढें मुसलमानी साम्राज्याचा अस्त झाला. पण बालविवाह व पडद्यासारख्या दुष्ट चाली, जशा मुसलमानी अंमलाबरोबर आल्या, तशा त्यांच्याबरोबर गेल्या नाहींत. त्या एकदां ज्या ठाणें देऊन बसल्या, त्या बसल्याच; परंपराप्रिय हिंदु समाजानें त्या कायमच्या आत्मसात् करून सोडल्या.

त्यानंतर अनेक वर्षें लोटली, व एकोणिसाव्या शतकांत हिंदुस्थान इंग्रजांच्या एकछत्री साम्राज्यांत सामील झाला. हिंदी जनतेचें आर्थिक व राजकीय साम्राज्य कायमचें लोपून, पारतंत्र्याचा व गुलामगिरीचा शिक्का तिच्या कपाळीं बसला. या राष्ट्रीय आपत्तीचा परिणाम, हिंदु स्त्रियांच्या स्थितीवर अप्रत्यक्षपणें तरी झाल्याशिवाय कसा राहील ? पण हिंदु स्त्रियांना, इंग्रजी राज्यापासून, राजकीय व सामाजिक हक्कांच्या दृष्टीने मोठा फायदा झाला, हें कबूल केले पाहिजे. इग्रजांचें स्त्रीदाक्षिण्य, त्यांच्या वाङ्मयांतील सामाजिक उदारमतवाद, वाघिणीचें दूध प्यालेल्या एकोणिसाव्या शतकांतील तरुण पिढींत भिनूं लागला. या पिढींत पंडित ईश्वरचद्र विद्या-सागर, राजा राममोहन रॉय, मलबारी, कर्वे, रानडे, तेलंग वगैरे मोठमोठे महानुभाव सुधारक निर्माण झाले व त्यांनी हिंदु समाजांतील बालविवाह, विधवा-विवाहनिषेध, अज्ञान वगैरे अनेक दुष्ट रूढीचे निर्मूलन करून अबलादास्यविमोचनाचा चंग बांधला. आज १९३८ सालीं हिंदु स्त्री-समाजाची प्रगति पाहिली, म्हणजे त्या महापुरुषांनी हिंदु स्त्रीसमाजावर केवढे मोठे उपकार करून ठेवले आहेत, हे लक्षांत येईल. बंगाल्यांतील ब्राह्मोसमाज, पंजाबांतील आर्यसमाज, मिशनरी कार्यकर्ते, देवधर, कर्वे वगैरेंच्या प्रयत्नांनीं स्त्रीशिक्षणाचे पाऊल आज कितीतरी पुढे पडले आहे. कित्येक स्त्रिया अर्थोपार्जनक्षम झाल्या आहेत. बालविवाह, सुशिक्षित हिंदु समाजांतून नाहीसा झाला आहे. विधवा-विवाह बरेच प्रचलित झाले आहेत. स्त्रियांना बरेंचसे आचारविचार-स्वातंत्र्य मिळालें आहे. मतदानाचे हक्क बव्हंशीं मिळून प्रधानपदावर स्त्रिया काम करू लागल्या आहेत. या प्रशंसनीय प्रगतीला, वर उल्लेखिलेल्या व तत्सम अनेक पुरुषांनीं हातभार लावला आहे.

पण अद्यापि पुष्कळ कार्य बाकी आहे. स्त्रियाच्या स्वाधीनतेच्या आंदो-लनाचीं सूत्रे स्त्रियांनीच आपल्या हाती घेतलीं पाहिजेत व तशीं तीं त्यांनी घेण्याचा उपक्रमही झाला आहे. प्रगतीचा अंतिम कळस स्त्रियांचा स्त्रियांनीच गांठला पाहिजे व तो, वेळ पडल्यास, झगडून गांठला पाहिजे. पूर्ण स्वातंत्र्य व स्वाधीनता, हीं कधी भिक्षा मागून मिळत नसतात. त्यासाठीं लढाईच करावी लागते. उदार व स्त्रीदाक्षिण्ययुक्त समजल्या गेलेल्या इंग्लंड देशांत, मतदानाचा हक्क मिळविण्यासाठीं महिलांना कसें झगडावें लागलें हें सर्वांस

विदितच आहे. अर्थात् देशादेशांतील परिस्थिति निराळी असल्यामुळें, कुठल्या मुद्द्यांवर संघर्षणाची ठिणगी पडेल, तें हिंदुस्थानांतील देशस्थिति व समाजस्थितीवर अवलंबून राहील.

---

प्रकरण २ रें : : :

## .... .... बालविवाह

स्त्रीस्वाधीनतेच्या इतिहासाचे थोडक्यांत समावलोकन पहिल्या प्रकरणांत केलें. यापुढील प्रकरणांत, स्त्री-स्वातंत्र्याच्या मार्गांत काय काय अडचणी आहेत, त्या दूर करण्याचे गेल्या अर्धशतकांत कसकसे प्रयत्न करण्यांत आले व ते कितपत यशस्वी झाले, यापुढील प्रयत्नांची दिशा कोणत्या स्वरूपाची असावी, वगैरे बाबींचा विचार करण्याचें योजिलें आहे. स्त्रियांच्या दुःखांची व दुर्दशांचीं हीं गाऱ्हाणीं आजपर्यंत किती वेळां तरी गाऊन झाली आहेत. पण वरचेवर आपली दुःखें वेशीवर टांगणें, त्यांच्या परिहाराला अत्यंत अवश्य आहे. आपल्या तक्रारी आपल्या हितचिंतकांपुढे वरचेवर आणणें, म्हणजे नुसतें रडगाणें गाणें नव्हे, तर चालू परिस्थिति पुनः-पुन्हां स्पष्टपणें आकलन करणें होय. या पुनरुच्चारानें विचारविनिमयाला मदत होते व नवे नवे मार्ग दुःखपरिहारार्थ दिसूं लागतात. तेव्हां कंटाळा न करतां, या मळलेल्या वाटेवरूनच आपणांस पुनः एकदां गेलें पाहिजे व सुलभ व सुखकारक असा नवीन एकादा मार्ग फुटतो कां हें शोधून पाहिले पाहिजे.

हिंदु स्त्रियांच्या दुर्दशेविषयीं जेव्हां जेव्हां स्वकीयांत, किंबहुना परद्वीपस्थांतही चर्चा निघते, तेव्हां तेव्हां त्या दुर्दशेच्या मुळाशीं असणाऱ्या अनेक कारणांपैकीं एकादें ढोबळ कारण प्रथम जर डोळ्यांसमोर उभें राहात असेल, तर तें 'बालविवाह' हें होय. आमच्या समाजांतील दहाबारा वर्षांच्या गृहिणी व माता पाहून, परकीय समाजास अचंबा वाटतो. एका विधिमंडळाच्या गौरकाय सभासदानें तर, हिंदुस्थान हें एक पोरकट राष्ट्र आहे; कारण सर्व

हिंदी लोक लहान लहान पोरींच्या पोटी आलेले आहेत (India is a nation born of babies), असे भर सभागृहांत विधान केले होतें. तें ऐकून हिंदी सभासद जरी कितीही चिडले, किंवा मेयोबाईने लिहिलेल्या बालपत्नींवरील अत्याचारांच्या अमानुष गोष्टी वाचून, हिंदु लोक किती जरी खवळले, तरी अतिशयोक्ति वजा करतां वरील दोन्ही गोष्टीत मुळाशी सत्य आहे, ही गोष्ट कोणासही नाकबूल करतां येणार नाही. हिंदु स्त्रियांची शारीरिक व मानसिक हानि करून, त्यांची संतति दिवसेंदिवस अधिकाधिक कमकुवत करून, राष्ट्राचे अपरिमित नुकसान करणारा हा बालविवाह हिंदु समाजाच्या केव्हां व कसा राशीस बसला?

हिंदु संस्कृतीच्या प्रातःकाळी, वेदांच्या शासनाखाली हिंदु समाज असतांना बालविवाह खात्रीने प्रचलित नव्हता. ऋग्वेदांतील,

**सूर्यां यत्पत्ये शंसन्तीं मनसा सवितादात् ।**

या वचनावरून, मुली लग्नात मोठ्या, पंधरासोळा वर्षांच्या व म्हणून विवाहोत्सुक असत, हें उघड दिसते.

**सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्वां भव ।**

यावरूनही, वधू घराचा कारभार सासूकडून आपल्या हातांत घेण्याला समर्थ अशी जाणती, वयानें मोठी असली पाहिजे. वैदिक विवाहमंत्रावरून पतिपत्नीची गांठ लग्नानंतर तावडतोबच पडे असें दिसतें. पत्नी वयांत आलेली असल्याशिवाय, वेदमंत्रांत असा उल्लेख येणे शक्य नाही. यावरून वेदकाली मुलगी लग्नांत चांगली प्रौढ असे, असें सिद्ध होतें.

इ. स. पूर्वी पांचव्या शतकापर्यंत प्रौढ विवाहाची चाल रूढ होती. गृह्यसूत्रांतील 'चतुर्थी कर्माच्या' उल्लेखावरून, व महाभारतांतील कुंतीद्रौपदीच्या प्रौढविवाहावरून ही गोष्ट सिद्ध होते. इ. स. पूर्वी चारशें वर्षांपासून ख्रिस्ती सनाच्या दुसऱ्या शतकापर्यंत, जी धर्मसूत्रें लिहिलीं गेलीं त्यांनी प्रथम बालविवाहाचा सूतोवाच केला. तरी पण धर्मसूत्रकारांतही दोन पक्ष होते. वसिष्ठ आणि बौधायन यांच्या मताप्रमाणें, मनाप्रमाणें स्थळ न मिळाल्यास रजोदर्शनानंतर तीन वर्षांपर्यंत मुलगी अविवाहित ठेवण्यास हरकत नाही. मनुकौटिल्यांनींही या मताला दुजोरा दिला आहे.

**त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमारी ऋतुमती सती ।**
**ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम् ।।** —मनु.

पण गौतम व विष्णु यांच्या मते रजोदर्शनानतर तीन महिन्यांच्या आंत मुलीचा विवाह झालाच पाहिजे. याप्रमाणें धर्मसूत्रकारांचा मतभेद असला तरी एकंदर समाजाचा कल रजोदर्शनापूर्वी मुलीचा विवाह उरकून टाकण्याकडे होता असें म्हणण्यास हरकत नाही. इसवी सनाच्या पहिल्या शतकाचे शेवटीं सूत्रकारांमधील हा मतभेद नाहींसा होऊन, समाजामध्येंही रजोदर्शनापूर्वी विवाह करण्याची प्रथा निश्चितपणे पडली. उपनयनाची चाल मोडलीच होती व मुलीना शिक्षण पद्धतवार कोठलेंच दिलें जात नव्हते. तेव्हां उगीच पंधरा-सोळावर्षांपर्यंत मुलीना अविवाहित ठेवण्यांत कांही अर्थच नव्हता. शिवाय स्त्रीच्या पावित्र्याला या सुमारास फारच मान आल्यामुळे मुलगी आठ वर्षांची असतांच विवाह उरकून घेणें फार सुरक्षितपणाचें होतें. मोक्षाचें साधन जी पुत्रप्राप्ति ती शक्य तितक्या लौकर होण्याच्या दृष्टीनेंही शक्य तितक्या लौकर विवाह करून देणे, सोयींचे होतें. इ. स. २०० च्या सुमारास लिहिलेल्या आपल्या ग्रंथांत याज्ञवल्क्य म्हणतो,

**अमयच्छन् समाप्नोति भ्रूणहत्यामृतौ ऋतौ ।**

(रजोदर्शनापूर्वी पित्यानें मुलीचे लग्न करून दिलें नाही, तर मुलीच्या प्रत्येक ऋतुकालीं भ्रूणहत्येचें पातक पित्याला लागतें.)

इ. स. ६०० चे सुमारास लिहिणारा यम म्हणतो,

**दद्यात्गुणवते कन्यां नग्निकां ब्रह्मचारिणे ।**
**अपि वा गुणहीनाय नोपरुन्ध्याद्रजस्वलाम् ।।**

(योग्य नवरा नाही मिळाला तरी चालेल; पण रजस्वला मुलगी अविवाहित ठेवूं नये.)

म्हणजे मनूच्याही पुढे एक पाऊल या सुमारास टाकलें गेलें. मनूचें मत,

**कामया मरणात्तिष्ठद्गृहे कन्यर्तुमत्यपि ।**
**न चैवेनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ।।**

(आजन्म अविवाहित राहिली तरी चालेल; पण मुलगी नालायकाला देऊं नये.) असें होतें.

रजोदर्शनाची, म्हणजे सुमारे बारा वर्षांची मर्यादा, इ. स. ५०० ते १००० पर्यंतच्या स्मृतिकारांनीं आणखी आखडण्याचा उपक्रम चालवला.

**अष्टवर्षा भवेद् गौरी नववर्षा तु रोहिणी।**
**दशवर्षा भवेत्कन्या अत ऊर्ध्वं रजस्वला ॥**
**प्राप्ते तु दशमे वर्षे यस्तु कन्यां न यच्छति।**
**मासि मासि रजस्तस्याः पिता पिबति शोणितम् ॥** —बृहद्यम

या प्रसिद्ध उक्तीप्रमाणें, आठ वर्षांची मुलगी लग्नाला योग्य समजली जाऊं लागली. हा नियम मात्र फक्त ब्राह्मणच पाळीत. क्षत्रियांच्या मुली १६।१७ वर्षांच्या होईपर्यंत अविवाहित राहात, असें इ. स. ३०० ते १२०० पर्यंतच्या संस्कृत वाङ्मयावरून दिसते. इतिहासांतसुद्धां क्षत्रिय कन्यांच्या प्रौढ विवाहाचीं पुष्कळ उदाहरणें आढळतात. पण ब्राह्मणांनीं मात्र उत्तरोत्तर विवाहयोग्य वय कमी करण्याचा सपाटा चालविला. ब्रह्मपुराणांत चौथ्या वर्षा-पासून दहाव्या वर्षापर्यंत लग्न करावे असे म्हटलें आहे. मुलीचे पैसे घेणाऱ्या खालच्या वर्गांतील आईबापांनी, या उक्तीचा फायदा घेण्यास तावडतोब सुरुवात केली. हळुहळू वरच्या थरांतही हे बालविवाह पसरले. जातिउप-जातींच्या ब्रह्मघोटाळ्यांत मुलीला स्वकीय जातींत योग्य नवरा मिळणें मोठे दुर्घट होऊन बसले; व म्हणून, योग्य स्थळ आढळतांच, मुलगी कितीही लहान असली तरी तिचे लग्न उरकून टाकण्याचा सपाटा सुरू झाला. एकत्र कुटुंबपद्धतीमुळें मुलगा कितीही लहान असला तरी त्याचे लग्न करण्यास हरकत नसे. कारण त्याच्या वाढत्या संसाराचा बोजा, घरांतील इतर वडील पुरुष उचलण्यास तयार असतच. लहानपणींच मुलगी सासरीं गेली म्हणजे सासरचें वळण तिला लागते ही समजूत दृढ झाली. बालविधवांच्या भवि-तव्याचा प्रश्न कुणीं विचारांत घेतलाच नाही, किंवा घेतला तरी " ही नशिबाची गोष्ट आहे," म्हणून तो तावडतोब निकालांत काढला जाई.

इंग्रजी अंमल सुरू होण्याचे सुमारास विवाहाची मर्यादा आठ ते नऊ वर्षे होती. बदलत्या परिस्थितीनें बालविवाहाच्या संस्थेवर आघात करण्यास सुरुवात केली. एकत्र कुटुंबपद्धति दिवसेंदिवस विस्कळीत होत चालली; जीवनकलह उत्तरोत्तर बिकट होत चालला; स्त्रीशिक्षणाची जरूरी, पाश्चात्य संस्कृतीच्या सहवासानें भासूं लागली व शहरांतून, सुशिक्षित मध्यम वर्गात, विवाहयोग्य

वयाची मर्यादा हळुहळू पुढें सरकूं लागली. या सुधारणेचें श्रेय, बदलत्या परिस्थितीबरोबर, प्रांताप्रांतांतून समाजसुधारकांनीं, बालविवाहाविरुद्ध केलेल्या प्रचंड आंदोलनालाही दिलें पाहिजे.

बालविवाह-प्रतिबंधक चळवळ सुमारें साठ वर्षांपासून हिंदुस्थानांत सुरू आहे. स्वामी दयानंद सरस्वती, राजा राममोहन रॉय, बाबू केशवचंद्र सेन, प्रा. रघुनाथराव मुदलियार, मद्रासचे न्यायमूर्ति मुथुस्वामी अय्यर, कलकत्त्याचे मलिक, माधवराव, मलबारी, तेलंग, रानडे वगैरे अनेक पुढारी बालविवाहाचे अनिष्ट परिणाम प्रतीत होऊन, ही रूढि मोडून काढण्यास पुढें सरसावले. जवळजवळ दीडदोन हजार वर्षे, "अष्टवर्षा भवेत्गौरी" हा महामंत्र जपणाऱ्या सनातनी हिंदूंनीं, या समाजाग्रणींवर निषेधाची, बहिष्काराची आग पाखडली; पण या वीरांनीं माघार न घेतां, नाना उपायांनी आपला विरोध जागृत ठेवला. बालविवाह हा वेदास कसा संमत नाहीं, हें वरीलप्रमाणें शास्त्र-वचनें काढून, त्यांनी सिद्ध करण्याचा प्रयत्न केला, पण वैदिक म्हणविणारे हिंदूही स्मृतिकारांनाच प्रमाण मानण्याचा हट्ट सोडीनात. तेव्हां सरकारकरवीं बालविवाहाविरुद्ध नियंत्रक कायदा पास करून घेतल्याशिवाय, तो बंद पडणार नाहीं, असें वाटून सुधारकांनीं त्या दिशेनें चळवळ करावयास सुरुवात केली. त्यांच्या खटपटीनें १८७३ मध्यें विवाहविषयक एक कायदा सरकारनें पास केला. त्याअन्वयें मुलांच्या बाबतींत अठरा, व मुलींच्या बाबतीत बारा, अशी विवाहयोग्य वयाची किमान मर्यादा ठरविण्यांत आली. परंतु, कायद्यानें बाल-विवाहाला आळा पडेल, हा सुधारकांचा अजमास मात्र साफ चुकला. कारण हा कायदा नियंत्रक (Restrictive) स्वरूपाचा नसून, केवळ अनुमोदक (Permissive) शिफारशीच्या स्वरूपाचा होता. १८५७ च्या बंडानें हात पोळल्यापासून हिंदुस्थानांत धार्मिक बाबतीत ढवळाढवळ न करण्याची सरकारनें शपथ घेतली होती. त्यामुळे नियत्रक स्वरूपाचे कायदे करण्याचें सरकारनें नाकारलें; कारण विवाह ही हिंदूंच्या हिशेबीं एक धार्मिक बाबच आहे.

नुसत्या उपदेशासारख्या कायद्यांनीं समाजांतील धार्मिक समजल्या जाणाऱ्या रूढी नाहींशा होणें शक्यच नव्हतें. सरकारचा वरील कायदा, यामुळें कागदोंपत्रींच पडून राहिला. सरकारकडून हवी तशी मदत मिळण्याची आशा नाहीं हें पाहून, समाजसुधारकांनीं पुन्हां नवनव्या मार्गांनीं लोक-

जागृतीच करण्यास सुरुवात केली. वरील समाजसुधारक पुरुषांच्या बरोबरीनें, त्यांच्या तालमीत वाढलेल्या रमाबाई रानडे, पंडिता रमाबाई, मिस् सोराबजी-सारख्या स्त्रियाही, स्त्रीसमाजांत जागृति करण्याचें पवित्र कार्य करावयास कळकळीने पुढें सरसावल्या. बालविवाह व त्यामुळें अल्पवयांत मुलींना येणारें मातृपद, यामुळे स्त्रियांचा केवढा भयंकर संहार होत आहे व हिंदु समाज कसा कमकुवत होत चालला आहे, हें, वर्षोवर्षींच्या शिरोगणतीतील आंकड्यांनीं वारंवार समाजापुढे सिद्ध करून दाखवण्यांत येऊं लागलें. वेळोवेळीं नेमण्यांत आलेल्या संमतिवयाच्या कमेटीसारख्या कमेट्यांच्या अहवालांतूनही, हीच गोष्ट वरचेवर समाजापुढें ठेवली जाऊं लागली.

बालविवाहाचे प्रचंड स्वरूप व स्त्रीमृत्यूंची अफाट संख्या, या अहवालां-वरून डोळ्यापुढें ढळढळीत दिसते. शहरांमध्ये राहणाऱ्या लोकांना, बालविवाह आतां अगदीं कमी झाला आहे, किंबहुना अजिबात नाहींसा झाला आहे, असें प्रत्यहीं हजारांनीं हायस्कूलमध्ये जाणाऱ्या कुमारिकांकडे पाहून वाटतें. परंतु, शहरांतील हा देखावा फसगत करणारा आहे. मूठभर शहरांत दिसणाऱ्या वाढत्या स्त्रीशिक्षणावरून साऱ्या हिंदुस्थानांतील सुधारणेचा अजमास करणें चुकीचें ठरेल. हिंदुस्थानांतील लाखोगणति खेड्यांपाड्यांतून बालविवाह सर्रहा सुरू आहेत हे आंकड्यांवरून स्पष्ट दिसून येते.

१९२१ सालच्या संमतिवयाच्या कमेटीला, १९२१ सालच्या शिरोगणती-वरून असे दिसून आलें की पंधरा वर्षांखालच्या मुलींपैकीं शेंकडा ४२·२ मुली विवाहित किंवा लग्न आज ना उद्यां होऊं घातलेल्या अशा असतात. १९३१ सालची शिरोगणति पाहतां, या आंकड्यांत कांहीच आशाजनक फरक झालेला दिसत नाही. एकपासून पंधरा वर्षे याच्या दरम्यान वयाच्या हजारो मुली विवाहित किंवा विधवा असलेल्या आढळतात. सुधारणेच्या ऐवजी उलट १९३१ सालच्या शिरोगणतींत बालविवाहांची संख्या फुगलेली आढळते. याचें तात्कालिक कारण म्हणजे, १९३० सालच्या सारडा कायद्यानें सहा महिन्यांची ठेवलेली पळवाट. (याचें विस्तृत विवेचन पुढें येईलच.) या पळवाटीमुळें, किती तरी अर्भकांचीं लग्नें उरकून टाकण्यांत आली. १९२१ सालच्या अह-वालांत पांच ते दहा वर्षांच्या मुलींपैकीं शेंकडा ९·२ मुली विवाहित आढळतात. तेंच प्रमाण १९३१ च्या अहवालांत १९·३ पर्यंत फुगलेलें आढळतें.

प्रांतोप्रांतीं अर्थात् हें प्रमाण कमीजास्त होतें. ढोबळ मानानें असें म्हणतां येईल कीं, मध्यप्रांत-वऱ्हाड, बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांत बालविवाह जास्त प्रमाणांत आढळून येतात. संयुक्त प्रांतांतही, हिंदु व मुसलमान या दोन्ही वर्गामध्यें, बालविवाहाचें प्रमाण भरपूर सांपडतें. सरहद्दीवरील प्रांत या बाबतीत तरी बराच पुढारलेला म्हटला पाहिजे; कारण १९२१ सालीं पंधरा वर्षांच्या आंतील विवाहित मुलींचें प्रमाण, तेथें फक्त शेकडा १२·६ एवढेंच होतें. पंजाब, मद्रास व आसाम हे प्रांतही पहिल्यानें नमूद केलेल्या प्रांतांइतके, या बाबतींत मागसलेले नाहींत. मद्रास व आसाममध्यें मुसलमान व ब्राह्मणेतर, आपल्या मुलींना रजोदर्शनापर्यंत अविवाहित ठेवतांना सर्रास आढळतात. पंजाबमध्यें बालविवाहांचे प्रस्थ कमी झाल्याचें श्रेय स्वामी दयानंदजी व आर्यसमाज यांच्या स्तुत्य चळवळीला दिलें पाहिजे.

वरील आंकड्यांवरून बालविवाह हिंदु समाजांत सर्वच प्रांतांत किती फैलावला आहे, हें दिसून येईल. याचा परिणाम म्हणजे स्त्रियांच्या मृत्यूची भीतिजनक वाढती संख्या. फक्त संयुक्त प्रांतांतच १९२१ सालीं दर हजार पुरुषांमागें वीस ते तीस वर्षांच्या दरम्यानच्या वयाच्या स्त्रिया १०४४ मृत्युमुखी पडल्या तर १९३१ सालीं हे प्रमाण १०७० पर्यंत वाढलें. तीस ते चाळीस वर्षांच्या स्त्रियांमधील मृत्यूचें प्रमाण, वरील प्रमाणापेक्षां बरेंच कमी आहे. यावरून हें उघड दिसतें कीं मातृपदाच्या काळांत स्त्रिया, सध्यांच्या हिंदु समाजांत फार मोठ्या प्रमाणांत मरण पावत आहेत. बालविवाहानें, अपरिपक्व वयांत माता होण्याचा प्रसंग येत असल्यामुळें हिंदु स्त्रियांचा असा हा संहार चालला आहे.

स्त्रियांच्या मृत्यूचे हे आंकडे गोळा करून सुधारक मंडळींनी समाजापुढें ठेवले. स्मृतिकारांनी विहित म्हणून सांगितलेला बालविवाह, धार्मिक सनातनी सोडून देण्यास तयार नाहींत हे पाहून, या प्रश्नाचा शारीरशास्त्राच्या दृष्टीनें विचार व्हावा, असा युक्तिवाद सुधारक करूं लागले. बाबू केशवचंद्र सेनसारख्या मंडळींनीं प्रमुख नऊ डॉक्टरांकडून या विषयावर मतें मागवून ती प्रसिद्ध केलीं. त्यांत बहुमतानें सोळा हें विवाहयोग्य वय डॉक्टरांनीं ठरवलें. मुलीला रजोदर्शन झालें, तरी त्या वेळेला कांही तिची पूर्ण वाढ झालेली नसते. रजोदर्शन ही फक्त तारुण्यांत प्रवेश झाल्याची खूण आहे.

हिंदुस्थानसारख्या उष्ण कटिबंधांतल्या देशांत मुलींना रजोदर्शन, तेराव्या किंवा क्वचित् बाराव्या वर्षी सुद्धां होते. पण त्या वयांत ती मातृपदाची जबाबदारी घेण्याला समर्थ असते, असे मानणें शुद्ध वेडेपणा होय. वैद्यराज सुश्रुत म्हणतो,

**ऊनषोडश वर्षायामप्राप्तः पञ्चविंशतिम् ।**
**यद्याधत्ते पुमान् गर्भं कुक्षिस्थः स विपद्यते ॥**
**जातो वा न चिरं जीवेज्जीवेद्वा दुर्बलेन्द्रियः ।**
**तस्मादत्यन्तबालायां गर्भाधानं न कारयेत् ॥**

(पंचवीसहून कमी अशा पुरुषानें सोळाहून लहान मुलीशी शरीरसंबंध केला व गर्भ राहिला, तर तो गर्भांतच मरण पावतो; उपजलाच तर फार दिवस जगत नाही; व जगलाच तर अतिशय दुबळा होऊन जातो. म्हणून अतिशय लहान मुलींचे ठिकाणी गर्भाधान करूं नये.)

शारीरशास्त्रज्ञांचे मत हें असें आहे. पण आमच्या धर्मशास्त्राप्रमाणें तर गर्भाधानसंस्कार रजोदर्शनानंतर सोळा दिवसांचे आंत झालाच पाहिजे. आतां धर्मशास्त्र पाळावें, तर बाराव्या तेराव्या वर्षींच माता होण्याचा प्रसंग स्त्रियांवर ओढवून, त्यांच्या प्रकृतीची व भावी संततीची हानि होते. तेव्हां बालविवाहाचा प्रश्न धर्मशास्त्राच्या दृष्टीने न सोडवतां शारीरशास्त्राच्या दृष्टीनें सोडवावा, असा युक्तिवाद सुधारक करूं लागले. एक तर बालविवाहासंबंधानें उलटसुलट वचनें खुद्द मनुस्मृतींत व इतर सूत्रांत वगैरे आढळतात. तेव्हां असा दुटप्पी व गुळमुळीत शास्त्राधार बाजूला सारून समाजाच्या आरोग्याच्या दृष्टीनें बाल-विवाह त्याज्य ठरवणें वाजवी नाहीं काय? नाही तरी वेदशास्त्रोपनिषदांत सांगितलेले सारेच नियम व विधि आपण कुठे पाळीत आहों? वर्णाश्रमसंस्था सनातनी हिंदूंत सुद्धां कितपत पाळली जाते? आपल्या सोयीसाठीं कांहीं ना कांहीं पळवाट सनातनीसुद्धां प्रत्येक संस्कारांत काढतातच. सोडमुंजीचा विधि उदाहरणार्थ घ्या. पूर्वी उपनयनानंतर मुलगा गुरुगृही जाई. शिक्षण संपल्यावर वैराग्य उत्पन्न होऊन एकादे वेळेस संन्यासाश्रम स्वीकारावयाच्या विचारानें तो काशीस जावयास निघे, तेव्हां त्याचे नातलग त्याला अडवून, त्याचें मन वळवून त्याला गृहस्थाश्रमांत परत आणीत. आतांशा उपनयनानंतर तिसऱ्या किंवा चौथ्याच दिवशीं भटजी सोडमुंजीला मुहूर्त काढून देतात. दोनतीन

शिध्याच्या पुरचुंडया बांधून घेऊन चिमकुला बटु शेजारच्या एकाद्या देवळांत जाऊन बसतो. नंतर मुलाचा मामा "मी माझी मुलगी तुला देतों," असें सांगून त्याला घरी घेऊन येतो. झाली सोडमुंज. काय ही धार्मिक संस्काराची थट्टा! ही सनातनींना चालते, आणि बालविवाह मात्र मनुस्मृतीतील वचनाप्रमाणें आठव्या वर्षीच व्हावा लागतो. हा न्याय कुठला?

बरें, रजोदर्शनानंतर सोळा दिवसाच्या आंत फलशोभन व्हावें, एवढा 'शास्त्रशुद्ध' नियम जरी समाजांत पाळला जाता तरी पुष्कळ अल्पवयी मुलींची दुर्दशा टळली असती. परंतु पुष्कळ वेळां रजोदर्शनाच्या वयापर्यंत सुद्धां वाट पाहण्यांत येत नाही. मिस् मेयोच्या '*Mother India*' तील हकीकती कांहींशा अतिशयोक्तिपूर्ण व हॉस्पिटलमधल्या केसेसूवरच आधारलेल्या जरी असल्या तरी त्यांवरून हिंदु समाजांतल्या एकंदर मुलींच्या स्थितीवर कांहीच प्रकाश पडत नाही असें म्हणणें वस्तुस्थितीला धरून होणार नाही, ही गोष्ट वर उल्लेखिलेल्या सुधारकांच्या लक्षांत आली. बालविवाहविषयक केलेला कायदा सरकारी दप्तरांतच पडून राहिला हे वर आलेच आहे. तेव्हां बालविवाहानें कोवळ्या मुलीवर येणारे अनैसर्गिक प्रसंग टाळण्यासाठी, 'संमतिवयाचा' कायदा पास करून घेण्याची खटपट पुढाऱ्यांनी चालविली. सनातनी लोकांनीं अर्थातच सुधारकांवर गहजब केला. हिंदवासीयांच्या खाजगी, दैनंदिन, धार्मिक व पवित्र जीवनांत ढवळाढवळ करण्याबद्दल सरकारविरुद्ध खूप ओरड केली. पण सनातनीचा विरोध व्यर्थ होऊन संमतिवयाचा कायदा १८६० मध्यें पास झाला. या कायद्यान्वये दहा वर्षांखालील मुलीशी शरीरसंबंध ठेवणें गुन्हा ठरविला गेला. पण दुर्दैवानें या कायद्याचाही उपयोग व्हावा तसा, किंबहुना मुळीच झाला नाही. कायद्यांतील गुन्ह्याचे स्वरूप अगदीच खाजगी व नाजूक असल्यामुळे असल्या केसची तक्रार सरकारकडे होणे अशक्य होऊन बसलें. मुलगी किंवा तिचे आईबाप अशा स्वरूपाची फिर्याद तिच्या पतीवर करतील हे स्वप्नांतही शक्य नव्हते. तरी पण, शक्य तेवढी कागदोपत्री तरी सुधारणा सुधारक करीतच होते. १८९२ मध्यें संमतिवयाचा कायदा आणखी सुधारून वयाची मर्यादा दहावरून बारावर नेण्यांत आली. १९२५ मध्ये बारावरून तेरापर्यंत संमतीचे वय वाढवण्यांत आलें.

१९२१ सालीं समतिवयाच्या बिलाचा विचार करण्यासाठी जी जोशी

कमिटी नेमिली गेली, तिच्या अहवालावरून ( यांतील उल्लेख व आंकडे वर आलेच आहेत. ) बालविवाहाच्या भीषण रूढीवर व तिच्या अघोर परिणामांवर पुष्कळच प्रकाश पडला, व बालविवाहप्रतिबंधक नियंत्रक कायदा पास करून घेण्याकडे पुन्हां समाजसुधारकांनीं लक्ष वळवले. मलबारीसारख्या पुढाऱ्यांनीं अनेक वर्षे केलेल्या चळवळीचें दृश्य फल, १९२७ सालच्या रायसाहेब हर-बिलास सारडा यांच्या हिंदुबालविवाहप्रतिबंधक बिलाच्या रूपानें प्रकट झालें. मुलीचें विवाहयोग्य वय चौदा असावे व या वयाखालील मुलींचे विवाह बेकायदेशीर ठरावे अशी सारडांची मागणी होती. त्या वेळच्या विधिमंडळाने नेहमीच्या कालहरणपद्धतीनें एक शेलकी समिति नेमून तिच्याकडे लोकमत अजमावण्याचे व जरूर ते आंकडे व माहिती गोळा करण्याचे सोपवले. समितीचें काम सुरू झाल्याबरोबर सारा सनातनी हिंदु समाज एकदम खडबडून जागा झाला व त्याने नेहमीच्या पद्धतीने नेहमीच्या ' धार्मिक जीवनाची बाबत ' या सबबीवर प्रचंड विरोध करण्यास सुरुवात केली. प्रसिद्ध ' शारदा ' या देवलांच्या बालवृद्धविवाहावरील नाटकाच्या नामसादृश्याने, सारडाचे ' शारदा ' बनलेले हे बिल फार गाजले. पण शेवटी व्हायचे तेच झाले. समितीच्या चाळणीतून महत्त्वाची कलमें वरच राहून निसःत्त्व व बेगरूळ बनून, सारडा कायदा १९२९ साली बाहेर पडला. चौदा वर्षांच्या आंतील मुलीच्या लग्नाच्या कायदेशीरपणाला या कायद्याने कांहीच बाध येणार नव्हता. कायदा तोडणा-राला फक्त गुळमुळीत शिक्षा सांगितली होती. अठरा ते एकवीस वर्षांच्या सज्ञान मुलाशी जर चौदापेक्षां कमी वर्षांच्या मुलीचे लग्न होईल, तर मुलाला एक हजार रुपये दंड भरावा लागेल. एकवीस वर्षांपेक्षां मुलगा वयाने जास्त असेल तर त्याला वरील परिस्थितीत कैदेची शिक्षा होईल.

या कायद्यांत अनेक दोष आहेत हे सकृद्दर्शनीच ध्यानांत येईल. एक तर कायद्याचें स्वरूप नियंत्रक असले तरी त्या नियंत्रणाची जबाबदारी सरकारने आपल्यावर घेतलेली नाही. गुन्हा घडून आल्यावर त्याचा रिपोर्ट सरकारकडे कुणीं केला, तर मग सरकार गुन्हेगाराविरुद्ध इलाज करणार. या रिपोर्ट करणारावर सुद्धां शंभर रुपये अनामत किंवा शंभर रुपयांचा जामीन देण्याची अट आहेच! शिवाय कुठे खेडगांवीं गुन्हा घडला तर त्याची तक्रार तेथल्या तेथे होऊं शकत नाहीं; ती प्रेसिडेन्सी कोर्टांत किंवा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या

कोर्टांत जाऊन केली पाहिजे. एवढा खर्च व उपद्व्याप करून रिपोर्ट कोण करणार? बरे, रिपोर्ट करून गुन्हा शाबित झाला तरी विवाह वज्रलेप झाला तो झालाच. हजार रुपये दंडाची जरब कितीशी बसणार? उलट ही वाढलेली रक्कम हुंडेवजा समजून वधूपिते आनंदानें भरतील व एकदांची गळ्याला लागलेली मुलगी उजवून घेतील. याशिवाय या कायद्यांतले दुसरे दोषार्ह कलम म्हणजे सहा महिन्यांची, कायदा लागू होण्यापूर्वी दिलेली मुदत. या मुदतीच्या पळवाटेचा गैरफायदा हजारो लाखो लोकांनी घेऊन आपल्या कोवळ्या मुली उजवल्या व अनत बालविधवांचे बली तयार करून ठेवले.

वर उल्लेखिलेल्या 'शारदा' कायद्यांतील दोषांमुळे या कायद्याचा बालविवाह थांबविण्याला फारसा उपयोग झालेला दिसत नाहीं. खेडोपाडीं सहस्रावधि बालविवाह प्रत्यही होत आहेत. त्यांचा रिपोर्ट सरकारकडे करण्याच्या भानगडीत अर्थातच कोणी पडत नाहीं, व क्षुल्लक दंडाची सुद्धां शिक्षा बालविवाह घडवून आणणाराला होत नाही. मात्र अलीकडे अखिल भारतीय महिला परिषदेने या बाबतीत कळकळीने लक्ष घालण्यास सुरुवात केली आहे. या परिषदेने ठिकठिकाणी Vigilance Committees म्हणजे टेहळणी करणारे सघ स्थापन केले आहेत. हे सघ खेडोंपाडींच्या बालविवाहांचा रिपोर्ट जामीन भरून योग्य कोर्टांत करतात व केस पुढे शेवटपर्यंत भिडवून गुन्हेगारांना शिक्षा देववतात. या योजनेमुळे बालविवाहांना थोडासा आळा बसेल. पण इष्ट ती सुधारणा घडून येण्यास खुद्द कायद्यांतच पुढीलप्रमाणें कांही सुधारणा केल्या पाहिजेत.

प्रथम तर कायद्याचे पालन होत आहे किंवा नाही हें पाहण्याची खबरदारी इतर कायद्यांप्रमाणे खुद्द सरकारने घेतली पाहिजे. गुन्हेगार शोधून काढून त्यांना जाचक व जबर शिक्षा ठोठावली पाहिजे व झालेला बालविवाह बेकायदेशीर व रद्द ठरला पाहिजे. त्याशिवाय बालविवाह बंद पडणार नाहींत. या स्वरूपाच्या सुधारणांची मागणी अखिल भारतीय महिला परिषदेनें वरचे वर केली आहे व तिला मान मिळणें अत्यंत जरूर आहे. श्रीयुत दास यांनी मध्यवर्ती विधिमंडळांत एक बिल पास करून घेऊन या कायद्यांतील कांहीं दोष दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रथम ज्या कोर्टांत बालविवाहाविरुद्ध रिपोर्ट होऊं शकतो अशा कोर्टाला रिपोर्टानंतर बालविवाहाविरुद्ध मनाईहुकूम

मुलीच्या पालकावर बजावतां येतो. दुसरें म्हणजे रिपोर्ट करणारावरील जामीन देण्याची अट काढून टाकण्यांत आली. मुलगी विवाहयोग्य वयाची होईपर्यंत पतीनें तिच्या स्वतंत्र राहण्याची व योगक्षेमाची व्यवस्था करावी असा हुकूम सोडण्याचा हक्क कोर्टाला मिळाला.

बालविवाहप्रतिबंधाची चळवळ, या टप्प्यापर्यंत येऊन ठेपली आहे. पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावाखाली आलेल्या साऱ्या सुबुद्ध हिंदी समाजाला प्रौढविवाहाचे महत्त्व आतां पटूं लागलें आहे. आर्थिक मंदी व बेकारीमुळें जीवनकलह बिकट होऊन मुलांचे विवाहयोग्य वय पुढें ढकलले जात आहे व त्यामुळें विवाहयोग्य मुलींचे वयही हळूहळूं पुढें सरकत आहे. तरीही प्रौढ-विवाहाला विरोध करणारे सनातनी जागोजाग आहेतच. मद्रासच्या वर्णाश्रम परिषदेने १९३७ साली आपल्या अधिवेशनांत सारडा कायद्याचा निषेध केला होता. यावरून अद्यापि समाजांत किती जागृति व्हावयास पाहिजे हे लक्षात येईल. समाजांतील सुशिक्षित स्त्रीपुरुषांवर विशेषतः स्त्रियांवर ही जागृति शिक्षणप्रसारादि उपायाने करण्याची जबाबदारी आहे. अर्थात् सुधारकाच्या प्रयत्नांच्या जोडीला सरकारचे साहाय्य हवेच. प्रांतोप्रांती आतां लोकशाही व 'स्वराज्य' होणार असल्यामुळें सरकारी साहाय्य हमखास मिळून बाल-विवाहाची रूढि लवकरच स्मृतिशेष होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

---

प्रकरण ३ रें : : :

## .... .... गतभर्तृकांचा प्रश्न

हिंदु स्त्रियांच्या स्वातंत्र्यमार्गावरील एका मोठ्या अडचणीचा मागील प्रकरणांत विचार केला. हिंदु स्त्रियांच्या स्वातंत्र्याला अडथळा करणारी दुसरी मोठी धोंड म्हणजे वैधव्य. वैधव्यामध्यें हिंदु स्त्रियांसारखी दीन-वाणी, परावलंबी व लाजिरवाणी अवस्था दुसऱ्या कुठल्याही देशांत व धर्मांत

होत नसेल. पति मृत होण्याचे वेळीं मुलगी कितीही लहान असली तरी तिला पुनर्लग्नाची परवानगी नाहीं. स्वतंत्रपणें जीवन व्यतीत करण्याइतका तिचा वारसा हक्क आपल्या पतीच्या मालमत्तेवर पोचत नाही. शिक्षण नसल्यामुळें स्वतंत्रपणें अर्थोपार्जन करण्याची व स्वतंत्रपणें राहण्याची धमक अगांत नसते. लटके वैराग्य अंगी आणून, दीराजावांच्या संसाराचे काबाड-कष्ट उपशीत, भूमीला भार म्हणून तिला जगायची वेळ येते.

असे दुःखमय जीवन घालवणाऱ्या हिंदु विधवांची प्रचंड संख्या सालोसालच्या शिरोगणतीवरून पाहिली, की अंगावर कांटा येतो. चार किंवा त्याहूनही कमीच अशा वयाच्या मुलीचे बालविवाह ज्या समाजांत होतात, त्या समाजांत अगदी कोवळया वयाच्या विधवांची संख्या साहजिकच फुगलेली आढळणार. १९११ च्या शिरोगणतीवरून एकंदर स्त्रियांपैकी शेकडा सतरा स्त्रिया वैधव्य भोगतांना आढळतात. इतर देशांतून हे प्रमाण पुष्कळच कमी असलेलें आढळतें. पश्चिम युरोपांत शेकडा फक्त नऊच स्त्रिया विधवा असतात. शिवाय पश्चिम युरोपातील या विधवांपैकी फक्त शेकडा सात चाळीशीच्या आंत असतात; तर हिंदुस्थानांत शेंकडा अठ्ठावीस असतात. शेंकडा १·३ विधवा पंधराच्या आंतील वयाच्या असतात. म्हणजे जवळजवळ पधरा वर्षांच्या आंतील अडीच लाख मुली वैधव्याच्या आगीत होरपळतांना १९११ त दिसतात. यांपैकी सतरा हजार मुली तर पांच वर्षांच्या आंतल्या आहेत. १९३१ सालच्या शिरोगणतीप्रमाणे वीस ते पंचवीस वयाच्या साडे-आठ लक्ष, पंधरा ते वीस वर्षांच्या पांच लक्ष, पंधरा वर्षांच्या सवातीन लक्ष, एक ते पाच वर्षांच्या दरम्यानच्या तीस हजार व एकाच्याही आंतील दीडहजार बालविधवा हिंदुस्थानांत आहेत.

या असंख्य बालविधवांची स्थिति किती अनुकंपनीय आहे, हे हजारों कवींनी व सुधारकांनी आजपर्यंत अनेकवार कंठ फोडून वर्णिले आहे. वेदकालीं व पुराणकाली विधवा, अर्थात् होत असत, पण त्यांची स्थिति आजकालच्या बालविधवांप्रमाणें केविलवाणी खास नसे. एक तर, वैदिक कालीं मुलगी विवाहाच्या वेळी चांगली प्रौढ असे व सुशिक्षित असे; यामुळें लग्न झाल्यावर कांहीं कालानें तिचा नवरा मृत झाला तरी तिला संसारसुखाचा थोडासा तरी संस्कार झालेला असेच; मूलबाळही एकादें असे; व त्याचे प्रतिपालांत ती

आपला काळ घालवूं शके. शिवाय, पुनर्लग्नाची परवानगी विधवेस वेदकालीं होतीच. त्यामुळे जरूर वाटल्यास, तिला पुन्हां संसार थाटण्याचीही सोय असे. पुनर्लग्नाचा रस्ता विधवेला बंद झाल्यापासून, तिच्या दुर्दशेला सुरुवात झाली आहे. हा दरवाजा केव्हां व कसा बद झाला त्याचा इतिहास थोडक्यांत बघू:

वेदकाली पुनर्लग्न विधवांना विहित होतें, हे अथर्ववेदांतल्या 'या पूर्वं पतिं वित्त्वा' या श्लोकावरून उघड दिसते. धर्मसूत्रांच्या काळांतही (इ. स. पूर्वी ४०० वर्षें ते इ. स. १०० पर्यंत) केवळ विधवांनाच नव्हे तर ज्यांच्या पतींचें अस्तित्व संशयात्मक आहे अशा स्त्रियांनाही पुनर्लग्नाची परवानगी होती. वशिष्ठाच्या मताप्रमाणे जिचा पति प्रवासाला गेला आहे अशा स्त्रीने त्याची फक्त पांच वर्षें वाट पाहावी. नंतर तिची स्वतः त्याच्याकडे जायची इच्छा नसेल, तर तिने त्याच्या एकाद्या जवळच्या नातेवाइकाशी पुनर्लग्न करावें. मात्र होतां होईतोपर्यंत कुलाबाहेर विवाह करू नये. कौटिल्य व नारद यांचेंही मत असेंच आहे. मात्र धर्मसूत्रांत पौनर्भवाला (पुनर्लग्नापासून झालेल्या मुलाला) वारसा हक्कदारांचे यादीत पुष्कळ खालचे स्थान दिले आहे.

इसवी सनाच्या पहिल्या शतकानंतर विधवाविवाहाला हळूहळू गौण स्वरूप प्राप्त होऊं लागले. वैराग्याच्या व पारमार्थिक कल्याणाच्या तत्त्वावर, हिंदु समाजांत जसजसा जास्त जोर देण्यांत येऊं लागला, तसतसे विधवांनी पुनर्लग्न करूं नये, अशा मताची लाट पुढेपुढे सरकूं लागली. विष्णुस्मृतीत विधवेला ब्रह्मचर्याचा उपदेश केला आहे. मनुस्मृतीत पति मेल्यावर पुनर्लग्नाचे नांवही स्त्रीने मनांत आणूं नये, असे म्हटले आहे. नारद एके ठिकाणी "मुलीचा विवाह एकदांच होऊ शकतो," असे म्हणतो तर दुसरे ठिकाणीं नवरा मृत झाल्यास, बैरागी झाल्यास, किंवा लांबच्या प्रवासाला गेलेला असल्यास स्त्रीनें पुनर्विवाह करावा असे म्हणतो. पराशराचा

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**

हा श्लोक प्रसिद्धच आहे. स्मृतींतील या परस्परविरोधी वचनांवरून असे अनुमान बांधण्यास हरकत नाहीं की, या सुमारास ब्राह्मण समाजांत पुनर्विवाह निषिद्ध मानला जात होता. पण ब्राह्मणेतर समाजांत तो सर्रास चालू होता, पुढेंपुढें बालविवाहाचे प्राबल्य जसजसें वाढत चाललें, व बालविधवांचा प्रश्न

समाजापुढें आ वासून उभा राहिला, तसतसा अगदीं लहान मुलींनाच फक्त पुनर्विवाहाची परवानगी देण्याकडे शास्त्रकारांचा कल झुकूं लागला. महाभारत, वशिष्ठस्मृति व लघुशतपथ या ग्रंथांमध्यें, 'अक्षतयोनि' बालविधवेला तिनें संसारसुखाची गोडी अगदींच न चाखल्यामुळे, पुनर्विवाहाची सवलत दिलेली आहे.

इसवी सनाच्या सातव्या शतकापासून मात्र विधवापुनर्विवाहावर शास्त्रकारांनी करडी नजर रोखली. या कालांतील स्मृतिकार पुनर्विवाहाचा स्पष्ट निषेध करूं लागले. पूर्वीच्या धर्मग्रंथांतील पुनर्लग्नाला अनुकूल उक्तीचे ओढून ताणून प्रतिकूल अर्थ लावण्यांत येऊं लागले.

**युगान्तरे स धर्मः स्यात् कलौ निन्द्य इति स्मृतः।**

पूर्वी पुनर्विवाह धर्मविहित असला तरी कलियुगांत तो निंद्यच आहे, असे आदित्यपुराण, लघु आश्वलायन, माधव इ. ग्रंथ व ग्रंथकार प्रतिपादूं लागले. इ. सनाच्या अकराव्या शतकापासून 'अक्षतयोनि' बालविधवेला मिळालेली पुनर्लग्नाची परवानगीही काढून घेण्यांत आली, व इ. स. ११०० पासून विधवाविवाहाचा समाजांतून पूर्णपणे अस्त झाला. पुनर्लग्नाच्या बंदीच्या दुःखाला जोड म्हणूनच की काय, इ. स. १२०० चे सुमारास विधवांच्या केशवपनाची ओंगळ व लाजिरवाणी रूढि सुरू झाली होती. वेदोपनिषदांत या किळसवाण्या रूढीचा मुळीच उल्लेख नाही. मध्यंतरी देशभर उसळलेल्या बौद्ध धर्माच्या लाटेने हिंदु समाजाला चिकटलेले हे लेणे (!) असावें. श्रीशंकराचार्यांसारख्या नेत्यांनी बौद्ध धर्माला टक्कर देण्यासाठी, हिंदु धर्मात ज्या नवीन गोष्टी आणल्या त्यांपैकी ही एक होय. बौद्ध भिक्षुणीप्रमाणे, हिंदु विधवेने केशवपन करून नतर तिला धार्मिक व आध्यात्मिक मार्गात प्रवेश देण्याची टूम निघाली. या मेहेरबानीनें हिंदु विधवांचे आध्यात्मिक कल्याण कितपत झाले, कोण जाणें! पण आधीच काळतोंडे ठरलेले रूप जास्तच विरूप केले गेल्यामुळें, अंधारांत खुपसलेले हिंदु विधवेचे डोकें कदापि वर होण्याची आशा राहिली नाहीं.

वेदस्मृतिपुराणांत नसलेली पण रूढिप्रिय हिंदु समाजाने हिंदु विधवांवर लादलेली दुसरी अमानुष व निर्घृण रूढि सतीची होय. सतीची चाल युरोपांत स्थायिक झालेल्या कांही आद्य आर्य वंशांत होती, असे दिसतें. ट्युटॉनिक आणि अनार्य सीथिअन लोकांतही ती असावीशी वाटते. पण, आर्य लोकांच्या

एका शाखेनें, हिंदुस्थानांत आल्यानंतर ही चाल मोडून टाकली असावी. ऋग्वेदांतील मृताचे और्ध्वदेहिकाचे वेळी म्हणावयाच्या मंत्रांत सतीचा उल्लेख नाही. मात्र, अथर्ववेदांतील 'उदीर्ष्व नार्यभिजीव लोक' या श्लोकावरून एके काळीं आर्यवंशांत ही चाल रूढ होती, व नंतर ती लुप्त झाली असावी असे दिसतें. ब्राह्मणकालांतील (इ. स. पूर्वी १५०० वर्षे ते इ. स. पूर्वी ७०० वर्षें) वाङ्मयांतही सतीचा कुठे उल्लेख नाही. गृह्यसूत्रे व तैत्तिरीय आरण्यकांतील और्ध्वदेहिकाच्या मंत्रांवरून विधवेला पतीच्या चितेवरून उठवून आणावें असेच उल्लेख आहेत. धर्मसूत्रे (इ. स. पूर्वी ४०० वर्षे ते इ. स. १००) व मनुयाज्ञवल्क्यादिकांच्या स्मृतीतूनही (इ. स. १०० ते इ. स. ३००) सतीचा उल्लेख नाही.

इ. स. ४०० चे सुमारास पुराणांतून एकाददुसऱ्या सतीचा उल्लेख सांपडतो. महाभारतांतील माद्रीचा उल्लेख प्रसिद्धच आहे. यावरून इ. स. ४०० चे सुमारास ही चाल हळुहळू प्रचारांत येऊं लागली असे दिसते. क्षत्रियांत प्रथम हिचा फार प्रचार झाला. वात्स्यायन व भास-कालिदास-शूद्रकादिकांच्या वाङ्मयांतून सतीचे उल्लेख आढळतात. बाणासारखा एकादा अधिकारी पुरुष सतीचा आवेशाने निषेध करतांना आढळतो. (कादंबरींतील, 'यदेतदनुमरणं नाम तदतिनिष्फलम्। वगैरे भाग.) पण एकंदरीनें इ. स. ७०० पासून सतीचा जोरानें सार्वत्रिक पुरस्कार होण्यास सुरुवात झाली. इ. स. ७०० ते इ. स. ११०० मध्ये अनेक स्त्रिया उत्तर हिंदुस्थानांत व विशेषतः काश्मिरांत सती गेल्या. क्षत्रियांतून ब्राह्मणांत ही चाल इ. स. १००० चे सुमारास आली. अनुगमनाचा निषेध करणाऱ्या पूर्वीच्या मंत्रांचा अर्थ ओढून ताणून अनुकूल करण्यांत येऊं लागला. रजपूत व मराठे लोकांत सतीचा फैलाव फारच झाला.

ब्रिटिशांचा अंमल सुरू होण्याचे सुमारास हिंदु समाजांत ही चाल अगदीं दृढमूल होऊन बसली होती. सती जाणें हें उत्तम पातिव्रत्याचें लक्षण समजलें जाऊं लागले. सती जाणारी स्त्री, पतित पतीचा अधोगतीपासून उद्धार करून त्यासह स्वर्गांत क्रोडोगणति वर्षें सुखांत राहते अशी समजूत प्रचलित झाल्यामुळें, हजारों स्त्रिया आनंदानें व हट्टानें सती जाऊं लागल्या. सती जाण्यास नाखूष असलेल्या स्त्रीस समाजांत अस्पृश्याप्रमाणे वागवलें जाई.

यामुळें साहजिकच विधवा जगण्यापेक्षां मरण बरें समजत. एकादी मूढ स्त्री चितेवरून पळून जाण्यासाठीं धडपड करूं लागली तर तिच्या कल्याणाची व ‘मोक्षाची’ काळजी बाळगणारे तिचे नातलग व उपाध्याय तिला लांब काठ्यांनीं चितेवर दाबून धरीत व तिचा आक्रोश वाद्यांच्या व मंत्रांच्या घोषांत बुडवून टाकीत असें सांगतात. बंगालमध्यें या चालीचा फारच जोर होता. दरसालीं ६०० पासून ८०० हिंदु विधवा बंगाल्यांतील ब्रिटिश मुलुखांत सहगमन करीत असें मार्क्विस् ऑफ हेस्टिंग्जच्या लॉर्ड बेंटिंकला लिहिलेल्या पत्रावरून दिसतें. मुंबई व मद्रास इलाख्यांत सतींचें प्रमाण कमी होतें.

हिंदुस्थानच्या इंग्रज राज्यकर्त्यांचें अंतःकरण या अमानुष संहारानें थरारलें व हिंदूंच्या धर्मांत व रूढींत ढवळाढवळ न करण्याचा आपला नियम मोडून लॉर्ड वुइल्यम बेंटिंकनें १८२९ मध्यें, ही चाल कायद्यानें बंद केली. समाजांत या कायद्याविरुद्ध विशेष ओरड झाली नाही, यावरून समाजाला या चालीचे अघोरत्व पटलें होते, पण नेहमीच्या आलस्यामुळें तिच्याविरुद्ध चळवळ झाली नव्हती असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. अगदीं बुरसलेल्या सनातनींनी निषेधाचे शस्त्र उगारले नाहीं असे नाही. आठशें सह्यांचा एक अर्ज हा कायदा मागे घेण्याबद्दल प्रीव्ही कौन्सिलकडे पाठवण्यांत आला. पण प्रसिद्ध सुधारक राजा राममोहन रॉय यांनीं प्रीव्ही कौन्सिलपुढे सुबुद्ध हिंदु समाजाचें मत सतीविरुद्धच असल्याचें प्रतिपादलें व सनातनींचा अर्ज नामंजूर झाला.

याप्रमाणे उच्च संस्कृतीचें बिरुद मिरवणाऱ्या हिंदु धर्मावरील सतीचा रानटी कलंक धुतला गेला व हजारो विधवांची दारुण चितेपासून सुटका झाली.

पण पुढें काय? चितेवरून खालीं उतरलेल्या हिंदु विधवेपुढें काय वाढून ठेवलें होतें? नंतरच्या हिंदु विधवांच्या इतिहासावरून, त्या केवळ सतीच्या मरणाच्या आगीतून अपमानाच्या व दुःखाच्या फुपाट्यांत येऊन पडल्या असे म्हटलें पाहिजे. धर्मानें व कायद्यानें पुनर्लग्नाची परवानगी नसल्यामुळें अगदीं कोवळ्या मुलीलाही नवरा मेल्याबरोबर संसारसुखाचा दरवाजा कायमचा बंद होई. सक्तीचा संन्यास घेऊन, लटक्या वैराग्यांत काळ कंठणें हें तिचें भवितव्य असे. तिचें अस्तित्व व मुखावलोकनही अमंगल ठरूं लागलें. शिवाय दुःखाच्या जोडीला परावलंबित्वाच्या डागण्या सोसाव्या लागत. लाखोपतीची गृहलक्ष्मी नवरा मरतांच एकत्र कुटुंबांत रस्त्यावरच्या भिकार-

णीच्या लायकीची ठरे. मरणांतिक कष्ट करून, दीरदायादांनी तोंडावर फेकलेले पोटगीचे तोडगे तुकडे, अपमानाच्या अश्रूंशी खाणें तिच्या नशिबीं येई. तिचे हातपाय थकल्यावर तर तिचे हाल कुत्राही खात नसे.

हिंदु विधवांच्या या शोचनीय स्थितीनें अंतःकरण द्रवून पाश्चात्य सस्कृतीनें उदारमतवादी झालेल्या सुधारकांनीं विधवांच्या अंधारमय आयुष्यात दोनतीन बाजूंनी प्रकाशकिरण आणण्याचा प्रयत्न केला. विधवापुनर्विवाहाचा वेदसंमत कायदा पास करून घेणें, विधवांत शिक्षणप्रसार करून त्यांना आर्थिक स्वातंत्र्य मिळवून देणें, केशवपनाची चाल बंद करणें, हिंदु विधवांना वारसा-हक्क जास्त प्रमाणांत मिळवून देणें हे ते उपाय होत. यांपैकी पहिल्याचा प्रथम विचार करूं.

विधवापुनर्विवाहाच्या आंदोलनाचे जनक म्हणून पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांचा प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल. वर उल्लेखिलेली व तत्सम अनेक विधवाविवाहाला अनुकूल अशी शास्त्रवचनें विद्यासागरांनीं शोधून काढून समाजापुढें ठेवली. हिंदु विधवांचे पुनर्लग्न या विषयावर एक छोटेंसें पत्रक १८५५ मध्यें त्यांनीं प्रसिद्ध केलें. पाराशरस्मृतीतील वादविषय झालेल्या 'नष्टे मृते प्रव्रजिते' या प्रसिद्ध श्लोकावर त्यांनी आपला युक्तिवाद आधारला होता. विद्यासागरांसारख्या थोर विद्वानांच्या या सप्रमाण लेखानें हिंदु समा-जांत मोठी खळबळ उडवून दिली. साऱ्या देशभर अनुकूल प्रतिकूल मत प्रतिपादणाऱ्या मोठमोठ्या सभा भरविल्या गेल्या. महाराष्ट्रांतही या विषयाला बरीच चालना मिळाली. १८३७ त व नंतर या विषयावर दोनतीन चांगली मराठी पुस्तके लिहिलीं गेलीं. त्यांपैकी एका पुस्तकांत परशुरामभाऊ पटवर्धन यांनी आपल्या बालवयांत विधवा झालेल्या मुलीच्या पुनर्लग्नाला काशीहून बड्या बड्या पंडितांची समति आणवली असा उल्लेख आहे पण, शेवटी मुलीच्या आईच्या विरोधामुळें पुनर्लग्न राहिलेंच! शास्त्र व कायदा अनुकूल असून केवळ अंद्धश्रद्धेनें पडलेल्या रूढीमुळें सुधारणेचे पाऊल मागें ओढलें गेल्याचें हिंदु समाजांत कांही हें एकाकीच उदाहरण नाही. आजसुद्धां या वेड्या धर्मभोळेपणामुळें हिंदु समाज मागें पडला आहे. असो.

रे० बाबा पदमनजी यांनीं 'कुटुंबसुधारणा' व 'यमुना-पर्यटन' अशीं दोन पुस्तकें लिहून विधवाविवाहाचा पुरस्कार केला. न्या. मू. महादेव गोविंद

रानडे यांनींही विधवाविवाहाच्या पुरस्कारार्थ पुष्कळ लिहिलें. पण पुढें त्यांच्या कृतीनें त्यांच्या सर्व लिखाणावर पाणी फिरलें. या सर्व देशभर फैलावलेल्या चळवळीनें जागृत होऊन सरकारनें १८५६ साली विधवापुनर्विवाहाला अनुमोदक असा कायदा पास करून, 'पुनरुद्वाह' वेदकालाप्रमाणे कायदेशीर ठरवला. या कायद्याविरुद्ध साठ हजार लोकांच्या सह्यांचे चाळीस अर्ज सरकारांत गुदरले गेले होते. अनुकूल अर्ज फक्त पंचवीस असून त्यांवर पाच हजारच सह्या होत्या; पण या प्रचंड विरोधाला न जुमानतां सरकारनें कायदा पास केला. या कायद्याअन्वये प्रत्येक हिंदु विधवेला पुनर्लग्नाचा हक्क मिळाला व तिची पुनर्विवाहापासून झालेली संतति औरस समजली जाऊं लागली. मात्र पुनर्लग्न झाल्यानंतर प्रथमपतीच्या मालमत्तेवरील तिचा उपभोगाचा किंवा पोटगी हक्क उडून जाई, व मग तिच्या प्रथमलग्नापासून झालेल्या संततीवरील तिचा पालकत्वाचा हक्क तिच्या नातलगांना उडवून देतां येई.

याप्रमाणें हा कायदा तर एकदांचा पास झाला; पण पुनर्विवाहाबद्दलची अढी मात्र समाजाच्या मनांतून अजून गेली नव्हती. पुनर्विवाहित दांपत्यांना समाज वाळीत टाकी. त्यांच्या अपत्यांचीं लग्नें होण्याची पंचाईत पडे. हरी नारायण आपटे यांच्या 'भयंकर दिव्य' या कादंबरीत पुनर्विवाहित दांपत्य व त्यांची सतति याविषयी समाजांत किती दूषित ग्रह असतात याचें जें सुंदर चित्र रेखाटलें आहे ते पूर्णपणे वस्तुस्थितिनिदर्शक आहे. समाजाच्या या बहिष्काराला तोंड देण्याचे मानसिक व नैतिक धैर्य साहजिकच फारच थोडे स्त्रीपुरुष दाखवतात व मोठ्यामोठ्यांची पुनर्विवाहामुळे समाजांत होणारी दुर्दशा पाहून होतकरू तरुण पिढी कच खाते. अशा परिस्थितींत नुसता कागदोपत्रीं कायदा पास करून विधवाविवाहाच्या सुधारणेचे पाऊल पुढें पडणें शक्य नाहीं, हें पाहून समाजसुधारकांनीं समाजाचें मन जास्त जास्त युक्तिवादाने वळवण्यास व तरुण पिढींत जास्त जास्त पुनर्विवाह वैयक्तिक उत्तेजन देऊन घडवून आणण्यास सुरुवात केली. १८६६ मध्ये मुंबईस विधवाविवाह मंडळ स्थापन झालें. विष्णुशास्त्री पंडित, बाळ मगेश वागळे, तेलंग, रानडे, गोपाळराव देशमुख वगैरे तरुण, उत्साही व नामांकित मंडळी या मंडळाचे सदस्य होते. पुनर्विवाहाचे विरोधकही कांहीं गप्प बसले नव्हते. वरील मंडळाच्या तोडीस तोड म्हणून विठोबा अण्णा दप्तरदार व नीलकंठराव

जोशी यांनीं ठाकुरद्वारीं हिंदुधर्म व्यवस्थापक मंडळी विधवाविवाहविरोधासाठीं स्थापन केली. या परस्परविरोधी मंडळांची झक्काझक्की हा मुंबईकरांना त्या काळीं अनेक दिवस एक मोठा करमणुकीचा विषय होऊन राहिला होता. विष्णुशास्त्री पंडित यांनी विधवाविवाहाचा मोठ्या विद्वत्तापूर्ण रीतीनें व कळकळीनें पुरस्कार केला. कित्येक दिवस विष्णुशास्त्री व पुनर्विवाह हे दोन शब्द समानार्थी होऊन बसले होते. पुण्याला व नाशिकला अनेक व्याख्यानें देऊन विठोबा अण्णांचीं मतें त्यांनी खोडून काढली. तसेंच पुण्याला श्री. पां. वि. करमरकर व वेणूताई परांजपे यांचा फार गाजलेला पुनर्विवाह त्यांनीं घडवून आणला. या गोष्टीवर कित्येक दिवसपर्यंत बहिष्काराची व वादप्रतिवादाचीं रणें माजलीं होतीं. शेवटीं पुण्यामध्यें पुनर्विवाहावर एक प्रचंड वाद करण्याचे ठरलें. त्या वेळीं विष्णुशास्त्री, रानडयांच्या मदतीने विधवाविवाहाचा पुरस्कार करणार होते; नारायणाचार्य गजेंद्रगडकर, विठोबा अण्णांच्या मदतीने विधवाविवाहाचें खंडन करणार होते.

श्री शंकराचार्यांच्या अध्यक्षतेखाली हा जंगी वाद झाला. कृष्णशास्त्री चिपळूणकर, रावजीशास्त्री आगाशे, भिकुशास्त्री गोडबोले, अप्पाशास्त्री खळदीकर यांसारखी बडीबडी धेंडे पंच नेमले होते. १८७० च्या मार्चमध्ये हा वाद सुरू झाला. नऊ दिवस वाद चालून पंचांचीं मते घेण्यांत आलीं. आपण जिंकूं असा सुधारकांचा कयास होता. पण आयत्या वेळीं एका मताचा घोटाळा होऊन शेवटीं विधवाविवाह दोन मतांनीं खंडित झाला. या बाबतींत नंतर अनेक फिर्यादी वगैरे झाल्या, पण त्यांशीं आपणांस कांही कर्तव्य नाही. पण एकंदरींत या वादानें लोकमताला खूप चालना मिळाली यांत शंका नाही.

महाराष्ट्राप्रमाणेंच इतर प्रांतांतही विधवाविवाहांची खटपट सुरू होतीच. गुजराथ प्रथम बरेच दिवस तटस्थ होता, पण नंतर अहमदाबादला पुनर्विवाह मंडळ स्थापन झालें. व एक दोन नाणावलेल्या कुटुंबांत पुनर्विवाहही झाले. मद्रासच्या बाजूला मलबारी, दिवाणबहादूर रघुनाथराव, रावबहादूर वीरेशलिंगम् पंतुलु वगैरे मंडळींनीं लोकजागृति चालवलीच होती. बंगालनें तर पंडित ईश्वरचंद्रांच्या रूपानें या प्रश्नांत पुढाकारच घेतला होता.

दिवसांनुदिवस या सर्व सुधारकांच्या खटपटींनें पुनर्विवाहांची संख्या हिंदुस्थानांत हळुहळू वाढत आहे. पुनर्विवाहित कुटुंबावरील सामाजिक

बहिष्काराचें स्वरूपही हळुहळूं सौम्य होत चालले आहे. बैरामजी मलबारी यांनीं १८८४ सालीं सरकारला पाठवलेल्या पत्रकांत विधवाविवाहाच्या कायद्यांत ज्या सुधारणा सुचविल्या होत्या त्या पुढील प्रगतीच्या दृष्टीनें आजसुद्धां विचारणीय आहेत. मलबारींनीं हिंदु विधवेला तिच्या धर्मश्रद्धेनें अंध झालेल्या नातलगापासून व रूढींपासून संरक्षण मागितलें होतें. पत्रकांतील खालील कलमांचा प्रामुख्यानें निर्देश करतां येईल.

(१) हिंदु विधवेवर तिच्या इच्छेविरुद्ध सक्तीचें वैधव्य लादण्यांत येऊं नये. (२) संशयित केसमध्यें सरकारनें विधवेवर वैधव्याची जबरदस्ती केली जात आहे की काय, याबद्दल चौकशी करावी. (३) प्रत्येक विधवेला आपल्यावर होत असलेल्या जुलूमजबरदस्तीविरुद्ध सरकारकडे तक्रार करण्याचा अधिकार असावा; व सरकारने तिला फुकट कायदेशीर सल्ला, स्टॅंपफीची माफी वगैरे सवलती देऊन कोर्टांत दाद मागण्याचा तिचा मार्ग सोपा करावा. (४) भिक्षुकवर्गाला पुनर्विवाहित दांपत्यावर किंवा त्यांच्या कुटुंबीयांवर बहिष्कार घालण्याची मनाई असावी.

कित्येक वेळां इच्छा असूनही नातेवाइकांच्या गैरवाजवी दडपणानें किंवा सामाजिक बहिष्काराच्या भीतीनें हिंदु विधवा पुनर्विवाह करण्यास धजत नाहींत हें लक्षांत येऊन मलबारी यांनी वरील सूचना सरकारला केल्या होत्या; पण सरकारनें या बाबतीत ढवळाढवळ करण्याचें नाकारलें, व विधवांचें भवितव्य शेवटीं समाजाच्या लहरीवर व मेहेरबानीवरच अवलंबून राहिलें. अज्ञान व अंधश्रद्धा यांनीं पीडलेल्या हिंदु समाजांतच जागृति झाल्याशिवाय हिंदु विधवांचें जीवन सुखी होणार नाहीं. समाजांत शिक्षणाचा प्रसार हें हिंदुस्थानच्या इतर बहात्तर रोगांप्रमाणें या रोगावरही एकच रामबाण औषध आहे.

हें झालें पुनर्विवाहाविषयी. पुन्हां संसार थाटण्याची इच्छा असलेल्या बाल किंवा प्रौढ विधवांना तो मार्ग खुला व सुखाचा करून ठेवणें हें सुधारणेचें एक अंग झालें. आतां कधी कधी हिंदु विधवा या स्वतःच पुनर्विवाह करण्यास राजी नसतात. एकपतिव्रतावरच्या दृढश्रध्देनें किंवा जवळच्या नातलगांचें मन दुखूं नये म्हणून त्या संन्यस्त वृत्तींत आयुष्य कंठण्याचें पत्करतात. सध्यांच्या परिस्थितींत अशा विधवांचें आयुष्य निरर्थक काबाडकष्टांत व्यर्थ व

कष्टमय होतें. दाबून ठेवलेल्या मनोवृत्ती कधी अनाचाराच्या मार्गें उसळी मारून बाहेर पडतात, तर कधी विधवेचा स्वभाव कायमचा कुरठा व सुखविन्मुख बनवून सोडतात. अनाचाराचीं फळें पढरपूरच्या अनाथाश्रमाच्या रूपानें समाजापुढें उघडीच आहेत; या अनाचाराला कधी 'गुरुभक्ती'ची जोड मिळते. 'बुवाबाजी' विधवांच्या भोळसरपणाचा फायदा घेऊन त्यांना जगांतून कसे उठवून लावते हें सर्वांना कांही दिवसांपूर्वी या विषयावर प्रसिद्ध झालेल्या लिखाणांनी कळून चुकलेच आहे.

हिंदु विधवा अशा आडमार्गांत शिरण्याचें कारण उघड आहे. त्यांच्या कर्तृत्वशक्तीला व अंतःकरणाच्या भुकेला योग्य वाव न मिळाल्यामुळें ती अशी विकृत होऊन फुकट जाते; कांहीं सरळ मार्गांत राहिलेल्या विधवा आपल्या शक्तींचा उपयोग शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या अडीअडचणींत मदत करण्यांत करतात; यापेक्षां विस्तृत क्षेत्रांत त्यांची कर्तृत्वशक्ति सध्यां कामीं येत नाही. कारण मोठया क्षेत्रांत उपयोगी पडेल अशी कोठलीही कामगिरी करण्याचें त्यांना शिक्षणच मिळालेलें नसतें. तेव्हां विधवांच्या कर्तृत्वशक्तीला योग्य अवसर मिळून त्याचा विस्तृत क्षेत्रांत उपयोग होण्याचा उपाय म्हणजे शिक्षणप्रसार होय.

विधवांना शिक्षण देऊन, त्यांना निरनिराळया धंद्यांचें ज्ञान देण्यानें, विधवांचा फायदा होईल, व समाजाचाही होईल. हिंदु विधवा ही स्वतः आर्थिक स्वातंत्र्य मिळाल्यामुळें मानाचे व सुखाचें जीवन जगूं शकेल; व समाजाचाही इतके दिवस फुकट जाणारी ही प्रचंड शक्ति कामाला आल्यानें फायदा होईल. सध्यांच्या हिंदुस्थानाच्या मागासलेल्या स्थितींत फारसा आर्थिक फायदा न पाहतां तनमनधनांत झटणाऱ्या किती तरी स्वयंसेविकांची जरूरी आहे. शिक्षणप्रसार, आरोग्य, यांसारख्या बाबतीत शहरांतून सुधारणेचे पाऊल पुढें पडलेलें दिसले तरी, असंख्य खेडयांतून या गोष्टीचा गंधही अजून लोकांना नाहीं. कित्येक वेळां शहरांतून काम करणारे लोक आर्थिक फायदा कमी म्हणून, रोजचा आयुष्यक्रम नीरस असतो म्हणून, खेडयांतून जाण्यास कबूल नसतात; हिंदु विधवा योग्य शिक्षण मिळाल्यास, खेडयांतील दीनदुबळयांच्या संसाराला खात्रीनें धांवून जातील; कारण जाणूनबुजून विरागी जीवन कंठण्याची त्यांनीं शपथच घेतलेली असते; जास्त आर्थिक फायदा ज्यांच्यासाठीं इच्छावयाचा असे पाशही

त्यांच्यामागे नसतात. सेवा हे त्यांच्या आयुष्याचे ध्येय त्यांनी ठरविलेलें असतें व जेथें सेवेची जास्त जरूरी पण कमी अनुकूलता अशा ठिकाणीं दयेच्या देवी बनून त्या खात्रीनें धांवून जातील.

मात्र त्यांची सेवा सार्थकी लागण्यासाठी त्यांना उत्तम शिक्षण मिळणें जरूर आहे. अध्यापन, रुग्णपरिचर्या, वैद्यकी, निरनिराळे हस्तव्यवसाय वगैरेंचें शिक्षण हिंदु विधवेला समाजांत फार उपयोगी पडेल. हिंदु विधवांच्या हितासाठी आमरण तळमळणाऱ्या स्वर्गस्थ रमाबाई रानडे यांनी पुण्यास या कामासाठीं 'सेवासदन' ही आदर्श संस्था काढली आहे. कै. देवधरांनीं ती नांवारूपाला आणली व सध्यांही ती चांगले काम करीत आहे. हजारों विधवा सेवासदनांतून शिक्षण घेऊन आज पोटाला लागल्या आहेत व समाजाला उपयोगी पडत आहेत. प्रो. धों. के. कर्वे यांचा 'अनाथ बालिकाश्रम' ही दुसरी एक नमुनेदार संस्था आहे. पंडिता रमाबाई यांचे 'शारदासदन' 'मुक्तिसदन' झालें नसतें, तर त्या संस्थेलाही आज, विधवांचा आत्मोद्धार करणारी म्हणून वरचे स्थान मिळालें असते. पण आधीच सुधारणा व सुधारक यांकडे संशयित दृष्टीनें पाहणारा समाज पंडिताबाईंच्या बाप्तिस्म्याने बिचकला व हिंदु विधवांना 'मुक्तिसदना'चा मार्ग बंद झाला. महाराष्ट्राप्रमाणे मद्रास, कलकत्ता वगैरे ठिकाणींही सेवासदन, नारीशिक्षासमितीसारख्या आदर्श शिक्षणसंस्था आहेत; अशा शिक्षणसंस्थांची सख्या जसजशी वाढेल व त्यांचा प्रसार देशभर जसजसा होईल, तसतसा विधवांचा उद्धारकाल जवळ येईल यांत शंका नाहीं.

---

## .... .... स्त्रियांचा शारीरिक ऱ्हास

हिंदु समाजांत बालविवाहाची दुष्ट रूढि पडल्यामुळे पंधरा वर्षांच्या आंतल्या लहानलहान अर्भकांना वैधव्यदशा प्राप्त होऊन त्यांच्या साऱ्या आयुष्याचा सत्यानाश होतो, हे आपण मागील प्रकरणांत पाहिलें. पण सुदैवानें ज्या आपल्या पतीबरोबर अनेक वर्षें संसार करूं शकल्या, अशा स्त्रियांनाही बालविवाहामुळे कांहीं थोडे अनिष्ट परिणाम भोगावे लागतात असें नाही. बालवयांत एकदां मुलीचें लग्न लागलें कीं, त्या क्षणापासून तिच्या शारीरिक ऱ्हासास आरंभ होतो. ज्या बालवयांत आईबाप व भावंडांच्या प्रेमळ व खेळीमेळीच्या सावलींत मनाची व शरीराची मोकळेपणी वाढ व्हावयाची त्या वयांत, ती एकत्र कुटुंबाच्या पिळून काढणाऱ्या चक्रांत सांपडते. नवरा तिच्याप्रमाणेंच 'बाल' असल्यामुळे व एकत्र कुटुंबावर ती दोघे चरितार्था साठीं अवलंबून असल्यामुळे, सासुरवाशीण ही घरांतील साऱ्या लहानमोठ्या मंडळींचा हक्कानें विकत घेतलेला गुलाम बनते. कृत्रिम बंधनें, सहानुभूतीचा अभाव, दोषैकदृष्टि यांनीं भरलेल्या वातावरणांत तिच्या मनाचा कोंडमारा होतो. भीतीनें ( fear ) मुलांच्या निरोगी अंतःकरणप्रवृत्तींच्या वाढीला विकृत वळण लागतें असें बालमानसशास्त्रज्ञ म्हणतात; ही भीति बिचाऱ्या बालवधूच्या बोकांडी सासरचा उंबरठा ओलांडल्याबरोबर येऊन बसते. म्हणच आहे की. "सासरच्या कुत्र्यास सुद्धां भिऊन वागावें लागतें." चूलबोळक्यांनीं निर्भ्रांत पणें खेळण्याच्या वयांत, तिला दहा माणसांचे काबाडकष्ट काढावे लागतात. एवढे कुवतीबाहेर शारीरिक श्रम करून शेवटीं त्याचे बक्षीस काय तर क्षुल्लक चुकीवरून अपमान, अवहेलना, तिरस्कार व माहेरच्या प्रिय माणसांच्या नांवाचा उद्धार! याप्रमाणें तिच्या शारीरिक वाढीवर वाईट परिणाम होत असतां, उष्ण कटिबंधांतील निसर्गाच्या दंडकाप्रमाणें बालवयांतच तिला रजो-दर्शन होतें; हा मुलीला प्रजाजननाच्या कार्याला जुंपण्याचा निसर्गाचा आदेशच समजून घरांतील वडीलधारीं माणसें मोठ्या साक्षेपानें तिचा संसार सुरू करून देतात. कोंवळया वयाच्या पित्याचा व मातेचा शारीरिक ऱ्हास सुरू होतो. निसर्ग

मोठा कठोर आहे; चौदा वर्षांच्या बालेला सुद्धां तो मातृपद देण्याला कचरत नाहीं. याप्रमाणें बालवयांत आई व्हावें लागल्यामुळें मुलीची शक्ति, तारुण्य व जोम अर्धाअधिक खचतो, आणि नंतरही वर्षादीडवर्षाला सारखा पाळणा हलत राहून, प्रत्येक नवीन मुलाबरोबर ती हळुहळू आपलें तारुण्य व कुवत कायमची गमावून बसते; शेवटीं आपल्या कच्च्याबच्च्यांना पोरकीं करून, व नवऱ्याला 'पुन्हां एकदां प्रयत्न करून पाहण्याची' मोकळीक देऊन, ती अकालीं मृत्युमुखीं पडते.

काय ही केविलवाणी कहाणी! जिची लुटुपुटीची भातुकली पुरी खेळून झाली नाहीं, अशा पोरीचें सारें आयुष्य गर्भारपण, बाळंतपण, तान्हेंपारोठें, करतां करतांच अकालीं संपून जावें ना! संसार व संसारसुख म्हणजे काय याची अंधुक कल्पना येण्यापूर्वींच तिला संसाराचा पट उधळून जावें लागतें. पूर्णविकसित तारुण्याचा बहर उमलण्यापूर्वींच तिचें तारुण्य वठून संपूनही जातें. अशा मातेची प्रजाही तिच्यासारखीच निःसत्त्व, उत्साहहीन व रोगट निपजली व बालमृत्यूंची संख्या सालोसाल फुगतच गेली, तर त्यांत काय आश्चर्य! बालिकांपासून निर्माण झालेले हे 'बालिश' नागरिक राष्ट्राला तरी कितपत उपयोगीं पडणार? ही सगळी अनर्थमालिका डोळ्यांपुढें ढळढळीत दिसत असूनही शारदा कायद्याला विरोध करणारे हरीचे लाल पुढें सरसावतातच आहेत, हें पाहून कुणाला विस्मय, खेद व संताप आल्याशिवाय राहील?

हिंदुस्थानांतील बालमातांच्या व एकंदरीनें मातांच्या संहाराची कहाणी फारच हृदयद्रावक आहे. बालविवाहामुळें बालमाता व त्यांचीं कमजोर अर्भकें यांची मृत्युसंख्या सालोसाल कशी झपाट्यानें वाढत आहे यांची आंकडेवार माहिती जोशी कमिटीनें आपल्या अहवालांत प्रथम जगापुढें आणली. डॉक्टरांनीं या कमिटीपुढें या विषयाबाबतींत दिलेल्या साक्षी वाचवत नाहींत इतक्या करुण व भीषण आहेत. इंग्लंडांत दरहजारीं चार बायका बाळंतपणांत मरतात तर हिंदुस्थानांत शंभर मरतात. सर जॉन मेगॉंच्या अजमासाप्रमाणें दरवर्षी दोन लाख स्त्रिया बाळंतपणांत किंवा बाळंतपणामुळें जडलेल्या रोगांनीं मृत्युमुखीं पडतात. याचा परिणाम म्हणजे हिंदुस्थानांत स्त्रियांची संख्या वर्षानुवर्षें घटत चालली आहे. १८८१ ते १९३१ च्या दरम्यानच्या शिरोगणतींकडे पाहिलें असतां ही गोष्ट स्पष्ट दिसते. डॉ. हटन १९३१ च्या

लोकसंख्येच्या रिपोर्टांत म्हणतात, "स्त्रियांची संख्या आज तीस वर्षे सारखी कमी होत चालली आहे. वैद्यकीय शास्त्रदृष्टया तान्ही मुलगी ही तान्ह्या मुलापेक्षां जास्त चिवट व प्रतिकारक्षम असते. पण निसर्गाची ही देणगी पुढें अकालीं व अविरत प्रजाधारणानें पार उधळली जाते." निसर्ग मुलगे व मुली ही सारख्या प्रमाणांत निर्माण होतील अशी दक्षता नेहमींच बाळगीत असतो. व्यवहारांत सुद्धां "हें वर्ष मुलांचें आहे बरं का; यंदा सगळ्यांना मुलगेच झाले; गेल्या वर्षी सगळ्यांना मुलीच होत होत्या." असे वृद्ध बायकांना म्हणतांना आपण ऐकतों. बायकांच्या वर प्रौढावस्थेंत येऊन पडणारी प्रजाधारणा व पोषणाची जबाबदारी लक्षांत घेऊनच की काय, निसर्ग मुलींच्या अंगीं जास्त काटकपणा व जास्त रोगप्रतिबंधक शक्ति ठेवतो; पण आपण माणसें मात्र निसर्गाच्या धोरणी शहाणपणावर पाणी फिरवतों.

हिंदुस्थानांत मातांची मृत्युसंख्या एवढी अफाट असण्याची अनेक कारणें आहेत. बालवयांत माता होणे, वरचेवर मुलें होणें, प्रसूतीच्या वेळीं योग्य वैद्यकीय मदत न मिळणें, साध्या आरोग्याचे सुद्धां नियम माहीत नसणें, प्रजाजननशास्त्राविषयी मातांचे व समाजांतील सर्वच माणसांचे अज्ञान व औदासीन्य इत्यादि अनेक कारणांना माता बळी पडतात. यांपैकीं एकेक गोष्ट घेऊन तिच्यावर काय उपाय योजतां येतील तें पाहूं.

जोशी कमिटीनें आपल्या अहवालांत वर उल्लेखिलेल्या मातांच्या मृत्यूच्या कारणमालिकेत बालविवाहाला अग्रेसरत्व देऊन स्पष्ट म्हटलें आहे कीं, "विवाहानंतर लवकर ऋतुशांति होणे व त्यामुळें बालवयांत मूल होणें या गोष्टीला कायद्यानें आळा बसला पाहिजे. लग्नाची मर्यादा चौदा व संमतिवयाची पंधरा ठरवून टाकली पाहिजे." पण जोशी कमिटीची ही सूचना त्या वेळीं निवळ अरण्यरुदनच ठरली. नंतर सारडा कायदा पास झाला; पण पूर्वी नमूद केल्याप्रमाणे त्याचें स्वरूप निवळ अनुमोदक पद्धतीचे असल्यामुळें त्यानें बालविवाहाला आळा पडला नाहीं व बालमातांच्या व बालकांच्या मृत्यूंच्या संख्येची कमान चढतीच राहिली. नियंत्रक स्वरूपाचा बालविवाह प्रतिबंधक कायदा झाल्याशिवाय या अनिष्ट गोष्टीला टक्कर देतां येणार नाहीं. त्यासाठीं पुन्हां प्रचंड वावटळ व लोकजागृति सुशिक्षित स्त्रीपुरुषांनीं केली पाहिजे. १९३७ च्या नागपूरच्या अधिवेशनांत अखिल भारतीय महिला परि-

षदेनें मुलींच्या विवाहाचें किमान वय अठरा असावे अशी मागणी केली आहे व ती योग्यच आहे. नव्या जमान्यांत विधिमंडळें जवळ जवळ पूर्ण लोकप्रातिनिधिक स्वरूपाचीं झालीं आहेत. स्त्रियांच्या हिताविषयीं कळकळ बाळगणाऱ्या उदारमतवादी लोकप्रतिनिधींची सख्याही बरीच आहे. शिवाय अनेक स्त्रिया खुद्द विधिमडळांत बसूं लागल्या असून कांहीं ठिकाणीं तर त्यांना प्रधानपदही प्राप्त झालें आहे. अशा वेळीं स्त्रियांना हितकारक असा कायदा करून घेणें जड जाऊं नये.

अर्थात् नुसता कायदा करून भागणार नाहीं. तो खरोखरी उपयुक्त होण्यासाठी काय काय गोष्टी केल्या पाहिजेत याबद्दल कांही सूचना संमतिवय कमिटीनें आपल्या अहवालांत केल्या होत्या. त्या वेळीं या सूचना सरकारनें अव्यवहार्य व आपल्या कक्षेबाहेरच्या म्हणून अवमानल्या; पण त्या ग्राह्य नाहींत असें कोण म्हणेल?

प्रथम म्हणजे पास झालेल्या नवीन कायद्याला अगदी लहान खेडेगांवांपर्यंत उत्तम प्रसिद्धि देणे. नाहीं तर सध्यां खेडोपाडी अडाणी लोकांना शारदा या नांवाचा एक कायदा झाला आहे याची दादही नाही असे दिसून येईल. हिंदु माणूस हा स्वभावतः जसा धर्मभीरु तसाच कायद्यालाही भिणारा आहे. शारदा कायदा लागूं होण्यापूर्वीच्या सहा महिन्यांत अनंत बालविवाह लागले याचें कारण ही कायदा मोडण्याबद्दलची नाखुषीच होय. पण जर कायदाच लोकांना माहीत नसला किंवा तो गाफील आहे असें लोकांना आढळून आलें तर ते त्याची पर्वा कशाला करतील? तेव्हां जरब बसेल असे कायदे करणें व त्यांना उत्तम प्रसिद्धि देणे प्रथम अत्यंत आवश्यक आहे.

कमिटीची दुसरी सूचना म्हणजे प्रत्येक विवाह नोंदण्याविषयी सक्ति. सरकारी कामदाराकडे धडधडीत बेकायदेशीर लग्न नोंदवण्यास जाण्यास साहजिकच लोक कचरतील; एकाद्यानें तसा धीटपणा केलाच तर रजिस्ट्रारला ताबडतोब सरकारकडे रिपोर्ट करतां येईल. बडोदा सरकारनें विवाह-नोंदणी नुकतीच कायद्यानें सक्तीची केली आहे. तिसरी सूचना जननाच्या नोंदणीविषयीं. ही नोंद शहरांतून व विशेषतः खेडयांपाडयांतून जास्त पद्धतशीर व सक्तीची केली पाहिजे. जन्माचे दाखले मुलाच्या नांवनिशीसह आईबापास देण्यांत यावे; म्हणजे मुलामुलींचें वय निश्चितपणें ठरवणें सोपें जाईल. सध्यां

जननाच्या नोंदणीची जी पद्धत चालू आहे, ती अपुरी व असमाधानकारक आहे. जननाच्या व लग्नाच्या अशा पद्धतशीर व बिनचूक नोंदणीनें कायद्याचें काम सोपें जाईल. हल्लीं ज्या कांहीं थोड्या फिर्यादी रिपोर्टावरून न्यायासनापुढे येतात त्यांत मुलामुलीचें खरें वय नक्की सिद्ध करणें फार कठिण जातें व कांहीं ठिकाणी तर लग्न लावल्याचाही पुरावा उभा करणें जड जातें.

याप्रमाणें सरकारनें कायदा पास करून तो अमलांत आणण्याबद्दल खबरदारी राखली व सुबुद्ध व सुशिक्षित स्त्रीपुरुषांनीं सरकारशीं सहकार्य केलें तर बालविवाह अजिबात बंद पडून बालमातांची मृत्युसंख्या खालीं येण्यास वेळ लागणार नाही.

कोवळ्या वयांत मातृपद आल्यामुळें जितक्या मुली मृत्युमुखी पडतात तितक्याच प्रमाणांत वरचेवर बाळंतपणाचा प्रसग आल्यामुळें अशक्त झालेल्या बायका मरण पावतात. आंकड्यांवरून ही गोष्ट सिद्ध करतां येईल. १८९१ ते १९३१ चे लोकसख्येचे रिपोर्ट पाहिले तर, सर्वसाधारणपणें असें दिसून येईल की, १ ते ५ या वयांच्या दरम्यान मुलीची संख्या मुलांपेक्षां जास्त असते. पण पुढे मात्र मुलींची सख्या मुलांपेक्षां झपाट्यानें कमी होत जाते. मुलें होण्याच्या काळानंतर म्हणजे चाळीसाच्या पुढे स्त्रीमृत्यूंची सख्या त्या वयाच्या पुरुषांच्या मृत्युसंख्येपेक्षां पुष्कळच कमी असलेली आढळते. यावरून प्रकृतीवर प्रजाजननाचा ताण वाजवीपेक्षां फाजील पडल्याने स्त्रिया अशक्त होऊन त्यांना Sepsis, Toxaemia सारखे रोग जडतात व त्यांमुळें त्यांची मृत्युसंख्या फुगत जाते, हे उघड दिसतें. क्षय हा फार मोठ्या प्रमाणांत बायकांना जडणारा रोग कुवतीबाहेर प्रकृतीवर भार पडल्याने जडतो, असें वैद्यकीय मत आहे. क्षयानें स्त्रियांचा कसा सहार चालवला आहे, हें लेडी लिनूलिथगो यांचा क्षयनिवारक फंड निघाल्यापासून पुष्कळांनी आंकड्यांवरून दाखवून दिलें आहे. अशा रोगांवर स्वतंत्र इस्पितळें काढण्यापेक्षां संततिनियमन करून, त्याचें मुळच नाहींसें करणें केव्हांही जास्त श्रेयस्कर ठरेल; पण या प्रश्नाची चर्चा पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत करूं.

बालविवाह बंद करून संततिनियमनाचें शास्त्र लोकप्रिय करण्याने स्त्रिया व मुलें यांच्या मृत्युसंख्येस बराच आळा पडेल. याशिवाय शिक्षणाचा प्रसार करून सर्वसाधारण जनतेस व विशेषतः मातांस शारीरशास्त्र, प्रजाजननशास्त्र,

प्रसूतिशास्त्र, बालसंगोपन व बालमानसशास्त्र यांविषयीं माहिती देण्याची व्यवस्था केल्यास बऱ्याच मातांचे व बालकांचे प्राण वांचतील.

बालसंगोपनशास्त्र व मातेनें स्वतःच्या प्रकृतीविषयीं गर्भारपणीं, बाळंतपणीं व मूल अंगावर पीत असेपर्यंत घ्यावयाची काळजी, या विषयासंबंधीं आपल्या हिंदु समाजांत एकंदर फार बेफिकिरी आढळते. शिंपी, न्हावी, चांभार असले बारीकसारीक धंदे सुद्धां, ते ते कसब शिकून घेतल्याशिवाय चांगल्या रीतीनें करतां येणार नाहींत हे लोकांना पटतें; पण आईच्या अतिशय अवघड, नाजूक व जोखमीच्या कामासाठीं मात्र कांहीं विशेष शिक्षणाची जरूर आहे, असे कोणाही स्त्रीच्या किंवा पुरुषाच्या डोक्यांत येत नाही. आईची जबाबदारी 'अनुभवानें' प्रत्येक स्त्री पार पाडू शकेल, 'अंगावर पडलें कीं आपोआप येऊं लागतें' असा घरांतील प्रौढ मंडळींस विश्वास वाटतो. आतां अनुभवानें व सरावानें ज्ञान येईल खरें; पण तें केव्हां? प्रयोग करतां करतां दोनचार कोवळया जीवांचा बळी पडेल तेव्हां! "I have buried seven; I guess, I know how to bring up children by this time." (आपल्या हातानें सात मुलांवर माती लोटली आहे मी; अजून मला मुलें कशीं वाढवावीं, तें काय शिकायला का हवें?); अशी शेखी मिरवणाऱ्या बाईला हंसावें, की तिची कीव करावी, की तिच्या उलटया काळजाबद्दल विस्मय करावा हेंच समजत नाही. "दहा खेपा झाल्या माझ्या; मला काय सांगतां तुम्ही मुलांना वाढवायच्या गोष्टी!" असे अभिमानानें सांगून आपल्या ज्ञानाचा डौल मिरवणाऱ्या बाईला, जाग्यावर किती मुलें आहेत हे विचारावें म्हणजे तिच्या अगाध ज्ञानाच्या भ्रमाचा भोपळा ताबडतोब फुटेल. इंग्लंडमध्यें दर हजारीं फक्त साठ मुलें मरतात; तर हिंदुस्थानांत दरहजारी १८१ मुले व कुठे कुठें तर ४०० मुलें मरतात; या एकाच गोष्टीवरून केवळ अनुभवावर भिस्त ठेवणाऱ्या अडाणी मातांच्या अज्ञानाचीं फळें बिचाऱ्या अर्भकांना किती मोठया प्रमाणांत भोगावीं लागतात, ते दिसून येईल.

याला उपाय म्हणजे, मातृपद हें प्रत्येक स्त्रीच्या आयुष्यांतलें एक अत्यत जोखमीचें, महत्त्वाचें व पवित्र कार्य आहे, व तें कार्य उत्तम रीतीनें पार पाडण्यासाठीं प्रत्येक स्त्रीनें अत्यंत कसोशीनें पूर्वतयारी केली पाहिजे, हें समाजाच्या मनावर बिंबवलें पाहिजे. प्रत्येक मुलीला दुय्यम शिक्षणाच्या काळांत

इतर विषयांच्या बरोबरीने शारीरशास्त्र, बालसंगोपनशास्त्र इत्यादि मातेला उपयोगीं पडणारे विषय शिकवले पाहिजेत. अर्थात् केवळ पुस्तकी ज्ञान न देतां व्यवहारांत उपयोगी पडेल व विशेषतः गरीब व मध्यम स्थितींतील कुटुंबास शक्य होईल, अशीच शिकवण दिली पाहिजे; नाही तर शाळेत मुली शारीरशास्त्र शिकतात म्हणजे नुसती हाडांची रुक्ष मोजदाद पोपटपंचीनें करतात. पण पुढें स्वतःची किंवा मुलांची प्रकृति सदृढ राखण्याकडे त्या ज्ञानाचा कसा उपयोग करावा याची मात्र त्यांना कांहींच कल्पना नसते. तसेंच बालसगोपनशास्त्र इंग्रजी सचित्र, सुंदर पुस्तकांवरून शिकतांना प्रत्येक मुलाला एक 'नर्सरी' (स्वतंत्र खोली) असावी, तिच्या भिंतीवर व जमिनीवर अमुक प्रकारचीं चित्रें असावीं, एक Kicking Pen असावे, वगैरे पढिक बडबड आमच्या मुलींना शिकवून काय उपयोग ? हिंदुस्थानांत मध्यम वस्तीच्या लोकांना चार खोल्यांचें घर सुद्धां मिळायची मुष्कील. मुंबईच्या चाळीत तर एकाच खोलींत स्वयंपाकघर, न्हाणीघर, दिवाणखाना, बाळंतिणीची खोली, अशा थाटाचा संसार सजवावा लागतो; तेथे शाळेत शिकलेल्या नर्सरीच्या गप्पांचा काय उपयोग ? घरांत रोगी तापाने भाजत असला तरी ताप मोजून पाहायला जेथे थर्मामीटर घरांत मिळायची पंचाईत, तेथें मुलांच्या आंघोळीच्या पाण्याचे उष्णतामान थर्मामीटरनें पाहायची फॅशन कशाला पाहिजे ? तेव्हां एकंदरीनें सांगण्याचा सारांश असा की व्यवहार्य असे शिक्षण मुलींना या विषयांतून दिलें पाहिजे. तसेंच त्यांची शरीरप्रकृति भावी जबाबदारी पार पाडण्यास योग्य अशी सुदृढ होण्यासाटी सक्तीचे शारीरिक शिक्षण, प्रत्येक मुलीस शाळाकॉलेजांतून दिलें पाहिजे. अखिल भारतीय स्त्री परिषदेनें याविषयीं मागणी वर्षोवर्षी चालविली आहे. मुंबई युनिव्हर्सिटीस जोडलेल्या पुष्कळ कॉलेजांतून आतांशा मुलींना सक्तीचे शारीरिक शिक्षण देण्याचा उपक्रम हळूहळू होऊं लागला आहे. इतर प्रांतांतही ही सुधारणा सरकारने प्रोत्साहन देऊन केली पाहिजे.

दुसरी गोष्ट म्हणजे ज्या मुलींना शाळांतून असे शिक्षण घेण्याची संधि मिळाली नाहीं त्यांना माता होण्याची वेळ येईल तेव्हां स्वतःच्या प्रकृतीची काळजी कशी घ्यावी व मुलाच्या जन्मानंतर त्याचें संगोपन कसे करावें हें समजून देण्यासाठीं शहरोंशहरीं व विशेषतः खेड्यांतून Ante-natal व

Post-natal clinics काढणें. अशा आरोग्यकेंद्रांचा फायदा घेणाऱ्या स्त्रियांची सुलभप्रसूति फार मोठ्या प्रमाणांत होते, हें कोठल्याही हॉस्पिटलचें रजिस्टर उघडून त्यांतील केंद्राचा फायदा घेणाऱ्या व न घेणाऱ्या बायकांच्या केसेसूची तुलना केल्यानें समजेल. अशीं आरोग्यकेंद्रें व (Child-welfare Centres) बालहितसंरक्षक संस्था ठिकठिकाणीं उघडणें व या दिशेनें होणाऱ्या खाजगी प्रयत्नांस मदत देणें हें प्रांतोप्रांतांच्या सरकारचें कर्तव्य आहे. या बाबतींत आतांपर्यंत काय काम झालें आहे, व काय दिशेनें आणखी प्रयत्न व्हावयास पाहिजेत हें पाहूं.

बालहितसंरक्षक संस्था उघडण्याची कल्पना सुमारें २०।२२ वर्षांपूर्वीपासून हिंदुस्थानांत आलेली दिसते. सध्यां अजमासे सहाशें अशीं केंद्रें संबंध हिंदुस्थान मिळून असावीत. खेडेगांवी अजूनपर्यंत अशा केंद्रांचा जवळजवळ पूर्णपणें अभावच आहे असें म्हणण्यास हरकत नाही. बालमृत्यूंच्या संख्येस आळा घालणें हा या केंद्रांचा मूळ उद्देश. परंतु पुढें अर्थातच अशा केंद्रांना कांहीसें शैक्षणिक स्वरूप येतें. गर्भारपणी स्वतःच्या प्रकृतीविषयी कशी काळजी घ्यावी व पुढें मुलांची जोपासना कशी करावी याविषयीं माहिती हीं केंद्रें मातांना देतात. अर्थात बालमृत्यु थांबवण्याला हे पूर्वस्थितिविषयक ज्ञान (Ante-natal) अत्यंत जरूर आहे. पहिल्या महिन्यांतच मृत्युमुखीं पडणाऱ्या बालकांच्या मृत्यूचें कारण आईनें गर्भारपणी अज्ञानाने आपल्या प्रकृतीची केलेली हयगय हेंच होय. बाळंतपणांतून सुटका होतेवेळींही मुलाला इजा होऊन त्याचा ताबडतोब किंवा एक महिन्याचे आंत मृत्यु घडण्याचा संभव असतो. तेव्हां गरोदरावस्था व प्रसूति यांवर देखरेख ठेवणें ही बालहितसंरक्षक केंद्रांची मुख्य अंगे होऊन बसणारच. नंतरही मूल चालूं बोलूं लागून, पुढें शाळेंत जाण्याजोगें होईपर्यंत त्याच्या प्रकृतीवर केंद्रानें लक्ष ठेवणें जरूर असतें. कारण याच वयांत योग्य अन्न मिळून पोषण न झाल्यामुळें किंवा अस्वच्छतेच्या सवयीमुळे मुलांना अनेक रोग जडून त्यांची प्रकृति कायमची खालावण्याचा संभव असतो. शाळांतून मुलांची वैद्यकीय तपासणी करतांना ही गोष्ट अनेक वेळां तज्ज्ञांच्या नजरेस आली आहे. पुढें शाळांतून वरचेवर मुलांच्या वैद्यकीय तपासणी होणें व मुलांच्या साध्या रोगांवर उपचार करण्यासाठीं शाळेला जोडून एक आरोग्यकेंद्र (School clinic) असणें हेंही मुलांच्या आरोग्याच्या

दृष्टीनें अत्यंत जरूर आहे. अखिल भारतीय महिला परिषदेनें सरकारचें लक्ष या विषयाकडे वेधण्याचा वरचेवर प्रयत्न केलेला आहे.

पण अगदी थोड्या प्रमाणांत काढलेल्या या बालहितसंरक्षक केंद्रांनीं अफाट हिंदुस्थानांतील अचाट बालमृत्युसंख्येस आळा बसेल ही आशाच करणें व्यर्थ आहे. सहाशेंच्या जागीं निदान साठ हजार केंद्रे तरी उघडलीं गेली पाहिजेत. समाजसेवकांनी या विषयांत लक्ष घातल्याशिवाय हा मुलांचा अमानुष संहार थांबणार नाही. इंग्लंडमध्यें सरकारच्या आधीं खाजगी समाज-सेवकांनींच या कार्याला सुरुवात केली. फारसे शिक्षण न घेतलेले लोक सुद्धां अशीं केंद्रें यशस्वी रीतीनें चालवून दाखवीत. एक कवडी मोबदला न घेतां हौसेनें अविरत मेहनत करून या समाजसेवकांनी बालमृत्युसंख्येचा आंकडा खालीं आणला. मुलांना न्हाऊं घालणें, त्यांचे दर आठवडा वजन करून नोंदून ठेवणें, आईला मुलांच्या खाण्यापिण्याबाबत सल्ला देणे, गर्भवती व अंगावर मूल पाजणाऱ्या मातांना व तरण्या मुलांना योग्य तें जेवण देणें व विशेषतः घरोघर हिंडून आयांची व मुलांची परिचर्या करणें वगैरे कामें हे स्वयंसेवक करीत. हिंदुस्थानांतही ही अशी किरकोळ दिसणारी पण परिणामी अतिशय महत्त्वाची समाजसेवा करण्याला सुबुद्ध स्त्रीपुरुष पुढें आले पाहिजेत. खेड्यांतून नुसती केंद्रें उघडून ठेवून भागणार नाही; कारण हिंदुस्थानच्या ग्रामीण जनतेला आधुनिक बालसंगोपनशास्त्राचें महत्त्व अजून पटलेलें नाही. लोक आपण होऊन केंद्रांचा फायदा घेण्यास कधीच येणार नाहींत. घरोघर हिंडून, गोड बोलून, लालूच दाखवून, खेळीमेळीनें राहून, लोकप्रिय होऊन, जरूर ती मदत आई व मूल यांना हौशी व कळकळीच्या समाजसेवकांनी पोंचवली पाहिजे. शहरांतून सेवासदनसारख्या संस्था ही कामे करीत आहेत. खेडेगांवांत मात्र अजून या चळवळीचें लोण पोंचले नाहीं. सध्यां गाजत असलेल्या ग्रामोद्धार चळवळीचें हें एक प्रमुख अंग समजून हजारों कर्तृत्ववान् स्वयंसेवकांनीं स्वार्थत्यागपूर्वक हें काम करण्यास पुढें सरसावलें पाहिजे.

*'Our Cause'* या पुस्तकांत Child Welfare या लेखामध्यें अशीं खाजगी केंद्रें चालविण्याविषयींची माहिती श्री. भवानी नटराजन् यांनीं दिली आहे. केंद्र काढण्याला जागा खेडेगांवांत हवी तेवढी मिळेल. दोनतीन खोल्या अगदीं नांवापुरत्या भाड्यानें सहज मिळूं शकतील. तीनचार

स्वयंसेवक किंवा सेविका एका खेडयाला पुरेशा होतील. एक केंद्र चालवण्यास महिना तीस रुपयांपेक्षां जास्त खर्च येणार नाहीं. उपकरणेंही प्रारंभीं अगदीं थोडीं पुरतील. साबण, टॉवेल, डोळे धुण्याचें लोशन व ड्रॉप्स्, मलमें, कोयनेल आणि खोकल्याचें औषध एवढा दवाखाना पहिल्यानें गरज भागवील. खेडेगांवांत खराब डोळे व खरजीसारख्या कातडीच्या रोगांनीं पीडलेलींच मुलें जास्त आढळतात; एवढ्या दोन रोगांवर उपचार झाला तरी मुलांचें व आयांचें कोटकल्याण होईल. औषधें देत असतां स्वयंसेविकांनी सर्वसाधारण आरोग्य व स्वच्छता यांविषयींही माहिती नेहमी सांगत असावें. डोळ्यांची व दांतांची काळजी कशी घ्यावी, एकंदर शरीराची स्वच्छता रोज कशी राखावी, कोठा साफ असणें, मोकळी हवा, सूर्यप्रकाश या गोष्टींचें महत्त्व सोप्या शब्दांत नेहमीं पटवून देत असावें. पहिल्या पहिल्यांदा या गोष्टी खेडेगांवांतल्या आया हंसण्यावारी घालवतील. पण सतत कानी कपाळी तेंच पडत गेलें, आरोग्य-केंद्रानें मुलाच्या प्रकृतीवर इष्ट परिणाम होऊं लागला, स्वयंसेविकांविषयी आदर व आपलेपणा उत्पन्न होऊं लागला की, हळुहळू सुधारणा झाल्याशिवाय राहणार नाहीं. कधीं कधी मॅजिक लॅंटर्नच्या मदतीनें ही माहिती द्यावी म्हणजे ती मनोरंजक होऊन निरक्षर जनतेच्या मनावर जास्त चांगली बिंबेल. केंद्राला जोडून हौशी स्वयंसेविकांना उपयुक्त कपडे शिवण्याचे, विणण्याचे व लिहा-वाचावयास शिकवण्याचे वर्गही चालवितां येतील.

याप्रमाणें सरकारी मदत व खाजगी प्रयत्न यांनी सघटित प्रयत्न करून बालमृत्यूचा आंकडा कमी केला पाहिजे. इंग्लंडमध्ये १८९६ ते १९०० पर्यंत हजारी १५६ असलेला आंकडा तद्विषयक आंदोलनांत १९३४ सालीं एकुण-साठ झाला. हिंदुस्थानमध्यें समाजसेवकांच्या मार्गांत किती अडचणी आहेत हें सर्वांस ठाऊकच आहे; निरक्षरता, अज्ञान, दारिद्र्य, पोटभर अन्न व अंगभर कपडयाची भ्रांत, गलिच्छ, कोंदट, अपुरी राहावयाची जागा, पडदा, बालविवाहासारख्या दुष्ट रूढी या सर्वांनीं दुर्दैवी हिंदुस्थानास घेरून टाकले आहे. तरी पण वरील दिशेनें खटपट झाल्यास थोडी तरी सुधारणा झाल्या-शिवाय राहणार नाही. मात्र वर्षांतून एकदां बेबीवुइक पाळणें किंवा गरीब मुलांना नुसतें पावशेर दूध फुकट रोज पुरवणें एवढयानें कांहींच फायदा होणार नाहीं. बालसप्ताहामध्यें स्वयंसेवक व जनता यांमध्यें आशाजनक असा उत्साह

खूप संचारलेला दिसतो; पण पुढें वर्षभर सगळें थंड असतें. तसेंच स्वच्छता, आरोग्य वगैरेची माहिती प्रात्यक्षिक पद्धतीने दिल्याशिवाय नुसतें निर्भेळ दूध वाटून काय मिळणार? असो.

बालहितसंरक्षक संस्थाप्रमाणे मातृहितसरक्षक केंद्रेंही (Maternity Welfare Centres) निघाली पाहिजेत. जे मातांचे आरोग्य तेंच बालकांचे; माता प्रसूतीपूर्वी व नंतर निरोगी, धडधाकट राहील तर आपल्या बालकांना पोसून धडधाकट व निरोगी बनवील. नाही तर दारिद्र्य, अस्वच्छता, अज्ञान यांच्या जोडीला आणखी पोरकेपणा हिंदी मुलांच्या नशिबी आला तर मग त्यांच्यासारखी दुर्दैवी तीच. स्त्रियांच्या प्रसूतीसमयी त्यांना वैद्यकीय मदत देण्याबद्दल आमचा हिंदु समाज पूर्णपणें उदासीन आहे. बुरसलेल्या ज्ञानाच्या घरांतील व शेजारच्या वृद्ध आयाबाया व खालच्या वर्गांतील स्वच्छतेचा ओनामाही माहीत नसलेल्या, गलिच्छ व अडाणी सुईणी यांवर ही अत्यंत नाजूक जबाबदारी टाकून, आमचा हिंदु समाज स्वस्थ बसतो; व नंतर माता किंवा मूल दगावलें की, 'आलें देवाजीच्या मना, तेथें कोणाचें चालेना,' किंवा 'नशिबीं असेल तें भोगलें पाहिजे,' असे म्हणून कपाळाला हात लावतो.

सरकारही या बाबतींत प्रथम कांही दिवस पूर्णपणें उदासीन होतें; नंतर असे म्हणतात की, व्हिक्टोरिया राणीच्या कानीं, योग्य वैद्यकीय सल्ला व मदत न मिळाल्यामुळें, हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या होत असलेल्या संहाराची हकीकत गेली. तेव्हां राणीसाहेबांनीं व्हॉइसरॉयची पत्नी या नात्यानें तेव्हां हिंदुस्थानांत यावयास निघालेल्या काउन्टेस ऑफ डफरिनना या बाबतीत लक्ष घालावयास सांगितलें. लेडी डफरीन यांनी हिंदुस्थानांत आल्याबरोबर लाखांनी फंड जमवून स्त्रियांना वैद्यकीय मदत देण्याच्या स्तुत्य उद्देशाने, एक नॅशनल असोसिएशन स्थापन केलें. असोसिएशनच्या फंडाची रक्कम हिंदुस्थानांतील राजेमहाराजांनीं उदारपणें हातभार लावून ११॥ लाखांवर नेली. या असोसिएशननें स्त्रियांसाठी वैद्यकीय शिक्षण घेण्यासाठीं सुखसोयी उपलब्ध केल्या, व प्रत्यक्ष वैद्यकीय मदत देण्यासाठीं ठिकठिकाणीं स्त्रियांसाठी स्वतंत्र, इस्पितळें उघडलीं. या इस्पितळांनीं अभेद्य पडद्यामागें खितपत पडलेल्या हिंदी स्त्रियांपर्यंत वैद्यकीय मदत पोंचवली. या दुर्दैवी बायकांना डॉक्टरांकडून तपासणी शक्यच नव्हती. जर अगदीं प्राणावरच बेतलें, तर

चिकाच्या पडद्याआड बसून फक्त हात बाहेर काढून, डॉक्टरकडून तपासून घेणाऱ्या या स्त्रियांना प्रसूतीसमयीं, पुरुष-डॉक्टर काय मदत देऊं शकणार? वरील असोसिएशननें खास बायकांसाठी व फक्त बायकांनीं चालविलेलीं अशीं इस्पितळें बारा लाख रुपये खर्चून ठिकठिकाणी उघडली. लाखो बायकांनी या इस्पितळांचा फायदा घेतला. असोसिएशननें आपल्या शंभर शाखा जिल्हो-जिल्ही स्थापन केल्या. स्वतः स्कॉलर्शिप्स् देऊन उच्च शिक्षण देवविलेल्या स्त्रीडॉक्टर या इस्पितळांवर मुख्याधिकारी नेमल्या जात. अनेक नर्सेस् व मिडवाइव्ज् यांना योग्य तें ट्रेनिंग देण्याची सोय असोसिएशन करी. जेथें स्वतंत्र इस्पितळ उघडणें शक्य किंवा जरूर नाही अशा ठिकाणीं पुरुषांसाठी काढलेल्या सरकारी इस्पितळांत बायकांसाठी एक वॉर्ड असोसिएशन चालवी. लहान गांवांतून किंवा खाजगी घरांतून मागणी आली असतां, ट्रेण्ड् सुईणी व परिचारिका पाठविण्याचाही उपक्रम असोसिएशननें केला.

अलीकडे अनेक खाजगी संस्था फंड, व उदार, दयाळू दाते, नवीन नवीन इस्पितळें व प्रसूतिगृहें उघडीत आहेत. सरकार व समाजसेवक यांनीं सहकार्य करून मातांच्या संहाराला टक्कर दिली पाहिजे. प्रत्येक इस्पितळाला एक Ante-natal Clinic ( गर्भवतींचे आरोग्यकेंद्र ) उघडलें पाहिजे. सबंध देशभर विशेषतः खेडयापाडयांतून, प्रसूतिगृहे उघडलीं पाहिजेत. प्रथम प्रथम अशा इस्पितळांत जाण्यास लोक नाखूष असतील, पण हळुहळू त्यांना इस्पितळांत जाणें जास्त सुखाचे व सोयीचे वाटूं लागेल. अलीकडे शहरांतून पहिले दहा दिवसांचें बाळंतपण एकाद्या इस्पितळांत करण्याची सर्रास पद्धत पडत चालली आहे. घरीं बाळंतपणाची बारीकसारीक तयारी करण्याची खटपट वांचून, जोखीम व काळजी किती तरी कमी होते, म्हणून इस्पितळ हें घरच्या एकट्या व अननुभवी बायकांना फारच आरामाचें वाटूं लागले आहे. त्याचप्रमाणें खेडेगांवांतही इस्पितळे हळुहळू लोकप्रिय होतील. अगदी लहान खेडयांतून इस्पितळे उघडणें अशक्य असल्यास जवळच्या गांवांतील इस्पितळांतून शिक्षित सुईणी पाठवण्याची पद्धतशीर व्यवस्था झाली पाहिजे. अशिक्षित, शिक्षण न घेतलेल्या सुईणींची प्रॅक्टिस कायद्यानें बंद झाली पाहिजे. त्यांच्या घाणेरडया व बोंगाडया परिचर्येनें लाखों बायका व मुलें आजपावेतों प्राणास मुकलीं असतील. निदान अशा सुईणींना आधुनिक तऱ्हेचीं उपकरणें मोफत

पुरवणें, त्यांच्या सामानाची व नखांची वगैरे तपासणी, गोड बोलून, बक्षिसाची लालूच दाखवून करणें, त्यांना आधुनिक प्रसूतिशास्त्राची माहिती फुकट देणें, त्यांच्या प्रत्यक्ष कामावर देखरेख करणें, हीं कामें केलीं पाहिजेत.

हिंदुस्थानांतील अफाट लोकसंख्येला पुरतील इतक्या सुईणी शिक्षण देऊन लवकर तयार करणें प्रथमदर्शनीं कठिण वाटते. सुईणीचें काम हलकें व अस्वच्छ समजण्यांत येतें. पण खेडेगांवांतल्या पुष्कळ सुखवस्तु कुटुंबांतल्या सुद्धां स्त्रिया हौशीनें परोपकार म्हणून हें काम करतात. परस्परांना मदत करण्याची, शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या अडीअडचणी भागवण्याची खेडेगांवांतल्या पोक्त बायकांना हौस असते; पुरेसें ज्ञान मात्र नसते. ते युक्तीनें दिल्यास पुष्कळ गरजू बायकांचा फायदा होईल. तसेंच बेकार म्हणून रिकामपणीं भटकणारे सुशिक्षित वा अर्धशिक्षित तरुण, शहरांतील चैनी जीवनाचा मोह सोडून खेडेगांवांत राहावयास तयार होतील तर त्यांचीही ददात मिटेल, व खेडेगांवांतील लोकांचाही फायदा होईल. अशा तरुणांनीं शाळा काढून मुलांमुलींना शिकवावें; शहरांत वाढलेल्या त्यांच्या सुबुद्ध सुजाण बायका सुईणीस उपयोगी पडणारें जुजबी शिक्षण घेऊन, गांवांतील बायकांच्या उपयोगी पडूं शकतील. दोघांना मिळून, गांवांत बालहितसंरक्षक संस्था चालवतां येईल. शहरांतून वैद्यकीय मदत बायकामुलांना देण्याचे किती तरी चांगले प्रयत्न अनेक बाजूनीं आजकाल होत आहेत. लेडी चेम्सफर्ड यांनीं १९२० त काढलेल्या All-India League for Maternity and Child Welfare या संस्थेनें Health Schools, Health Centres आणि Propaganda असें आपले कार्यक्षेत्र आखून, हेल्थ व्हिझिटर्स् तयार करण्यासाठीं दिल्ली, कलकत्ता, मुंबई, मद्रास, लाहोर या पांच ठिकाणीं Health Schools उघडलीं. Health Centres मध्यें ठिकठिकाणच्या मातृहित व बालहितसंरक्षक केंद्रांवर देखरेख करणें, सुईणींना शिक्षण देणें वगैरे कामें होतीं. Propaganda मध्यें सभा, प्रदर्शनें भरवणे, सालोसाल बालदिन करणें, आरोग्यविषयक लहानमोठीं पत्रकें प्रसिद्ध करणें वगैरे लोकजागृतीचीं कामें होतीं. बडोदें, त्रावणकोर, हैदराबाद, ग्वाल्हेरसारख्या पुढारलेल्या संस्थानांतूनही या बाबतींत चांगली कामगिरी होत आहे. बडोद्यांतील बालहितसंरक्षक केंद्र अत्यंत महत्त्वाची व उपयुक्त कामगिरी बजावीत आहे. 'रेडक्रॉस' सोसायटीनेंही या बाबतींत शहरांतून पुष्कळ काम केलें

आहे. ख्रिश्चन मिशनऱ्यांचे शैक्षणिक व वैद्यकीय क्षेत्रांत हिंदुस्थानांतील बायका, मुली व मुलें यांवर अनंत उपकार झाले आहेत. अखिल भारतीय महिला परिषदेनें अनेक वेळां ठराव पास करून त्यांचे या मदतीबद्दल आभार मानले आहेत.

या सर्व संस्थांच्या मदतीने हिंदुस्थानांतील शहरांतून पुष्कळच सुधारणा झालेली दिसून येते. आजकाल किती तरी स्त्रिया हिंदुस्थानांतील व परदेशांतील वैद्यकीय पदवी मिळवून, प्रॅक्टिस थाटीत आहेत. शहारांतून गल्लोगल्ली सुईणीच्या पाट्या झळकत आहेत. या सर्व शिक्षित भगिनींनीं स्वतःच्या योगक्षेमाप्रमाणेच इतर अज्ञ गरजू भगिनीच्या हिताचाही विचार करून खेड-गांवीं जाण्याचे मनावर घेतलें तर दुर्दैवी हिंदुस्थानचे डोके वर होण्याची कांहीं तरी आशा आहे. खेडेगांवांतील मातांना वैद्यकीय मदत मिळेल तर त्या निरोगी व सुदृढ होऊन, आपल्या बालकांनाही आरोग्याची देणगी जन्मतःच मिळवून देतील. बालसंगोपनाची माहिती त्यांना मिळाल्यास हिंदुस्थानची पुढली पिढी तेजस्वी व कणखर निपजेल. स्त्रियांची व बालकांची मृत्युसंख्या कमी होऊन राष्ट्राच्या बलाला लागलेली गळती थांबेल. स्त्रियांच्या अनेक दैन्यांपैकीं प्रकृतीच्या ऱ्हासाचें व अकाली मृत्यूचे एक दैन्य तरी फिटेल व स्वतःच्या उद्धारासाठी प्रयत्न करण्यास त्या समर्थ होतील.

---

प्रकरण ५ वें : : :

## .... .... संततिनियमन

संततिनियमन हा विषय अलीकडे निदान शहरांतून तरी सुबुद्ध व सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या समाजांत तीव्र चर्चेचा होऊन राहिला आहे. मागील प्रकरणांत पाहिल्याप्रमाणे संततीच्या संख्येस आळा, नियम, घालणे स्त्रियांच्या प्रकृतीच्या दृष्टीनें अत्यंत जरूर आहे; पण संतति-नियमन, हें कृत्रिम व अनैतिक आहे, असे म्हणून त्याचा निषेध करणारेही

अनेक लोक आहेत. पुण्याच्या अग्निहोत्र मंदिरांतील ज्ञानसत्रांत या प्रश्नाव अनेकदां धुमश्चक्री उडाली आहे. मद्रासच्या वर्णाश्रम धर्मपरिषदेसारख्य सनातनी संस्था या अनाचारी चळवळीबद्दल पूर्ण नापसंति दर्शवीत आहेत मात्र प्रत्येक महिला परिषद व महिला समाज संततिनियमनाच्या ठरावाव अनुकूल मत प्रदर्शित करून त्याची साधने स्वस्त सुखप्राप्त व्हावींत म्हणू जोराची मागणी करीत आहे. या विषयावर सर्वसाधारणपणें पूर्वपक्ष उत्तरपक्ष कसा केला जातो याची थोडक्यांत रूपरेषा काढू.

सनातनी व धार्मिक लोकांचा संततिनियमनाविरुद्ध पहिला महत्त्वाच मुद्दा म्हणजे त्यांची 'कर्मावर, पूर्वजन्मीच्या संचितावर' अंध श्रद्धा; नशिबं असेल तें भोगलेंच पाहिजे, या मूळ पदावर त्यांचा खरा संसार उभारलेल असतो. गरिबीच्या संसारांत वर्षास पोर पाठीस लागल्यामुळे पैशाची ओढा ताण होते, आईची व मुलांची प्रकृति दुबळी होते, इतक्या पोरांच्या भविष्य कालाबद्दल आईबापांना दारुण चिंता लागून राहते. भविष्यकालांतले सुखं जीवन तर बाजूलाच राहो. वर्तमानकालींही सगळ्या मुलांना नुसत्या साध्य जीवनाच्या गरजा, अंगभर वस्त्र व पोटभर अन्न, मिळण्याची भ्रांत असते. य सर्व गोष्टी ढळढळीत डोळ्यांपुढे दिसत असूनही "या सर्व नशिबाच्य गोष्टी आहेत; जसा योगायोग असेल तसें होईल. ललाटींचा लेख फिरवण्याच प्रयत्न करणें फुकट व मूर्खपणाचें आहे" असा मंत्र सनातनी जपीत बसतात शिवाय संततीचे नियमन करणे म्हणजे भ्रूणहत्येचे पातक पदरांत घेणें अशीहं सनातनी लोकांची प्रामाणिक समजूत असते. बाकी रजस्वला कुमारिक अविवाहित स्थितींत पित्याच्या घरीं राहिली तर पित्याला दर ऋतुकालीं भ्रूण हत्येचें पातक लागते, असें समजणारा सनातनी संततिनियमनाला अमर्या भ्रूणहत्या समजेल त्यांत आश्चर्य तें काय?

वरील नशिबाच्या मुद्यावर असा उत्तरपक्ष करतां येईल कीं, संसारांती बाकीच्या सर्व गोष्टींत तुम्ही देवावर हवाला ठेवून स्वस्थ बसतां काय? मूल आजारी झालें तर नशिबीं असेल तें कसें टळणार म्हणून हात जोडून बसत का? "असेल माझा हरी तर देईल खाटल्यावरी" असें म्हणून स्वयंपाक पाणी, बाजारहाट, नोकरीधंदा वगैरे सोडून दिलें आहे काय? गांवांत देवी प्लेगची साथ आली म्हणजे सनातनीसुद्धां नशिबाच्या गप्पा बाजूला ठेवून

प्रतिबंधक लस टोचून घेतात. प्रत्येक बाबतींत आपणांस शक्य तितका प्रयत्न करून मग नशिबीं असेल तें होईल म्हणून परिणामाविषयी समाधानी राहणें हा सुवर्णमध्य बहुतेक सुज्ञ सनातनी गांठतात. मग संततीच्या बाबतींतही नुसत्या नशिबावर हवाला न देतां, इष्टार्थसिद्धीसाठीं प्रयत्न कां करूं नये? मूल व्हावें म्हणून शेंकडों नवससायास केले तर चालतात मग मूल नको असल्यास तसा प्रयत्न करणें कां गैर समजावें? आपल्या संसाराचा पसारा आपल्या शक्ति व ऐपतीबाहेर वाढूं नये म्हणून सावधगिरी राखणें पातक कां समजावें? अर्थात् महात्मा गांधीसारखा एक पक्ष असें म्हणतो की संतति नको असल्यास संयम करणें हें जास्त योग्य आहे; कृत्रिम उपकरणें वापरणें गैर आहे. संयम हें जर पाप ठरत नाही तर उपकरणें वापरणें पाप कां ठरावें? कारण दोहींचा उद्देश संततीला आळा घालणें हाच आहे! दुसरी गोष्ट म्हणजे संयम हा व्यवहार्य, सर्वसाधारण जनतेस जमेल असा उपाय नव्हे; आणि संततिनियमन हें सर्वसाधारण जनतेच्या संसारांतच हवें असतें. मोठमोठ्यांना न झेंपणारा संयम सर्वसाधारण संसारी मनुष्यास आचरतां येणें फार कठिण, किंबहुना अशक्यच आहे. जे मोठमोठ्या संशोधनादि कार्यांत गढून गेलेले विद्वान् आहेत, ज्यांच्या उत्पादनशक्तीस बौद्धिक क्षेत्रांत पुरेसा वाव मिळतो अशा लोकांस इंद्रियनियमन कठिण नाही. तसेंच ज्यांना रोजचा नित्य व्यवसाय झाल्यानंतर श्रमपरिहारासाठीं व करमणुकीसाठी अनेक सुखसोयी उपलब्ध असतात, अशांनाही एका विशिष्ट बाबतींत इंद्रियदमन सहज करतां येईल; पण ज्यांचें रोजचें जीवन नीरस, बेचव व हमालीवजा आहे व ज्यांना मन रिझविण्यास स्वतःचा छोटा संसार, बायकोमुलें यांखेरीज दुसरी साधनेंच मिळूं शकत नाहींत, त्यांना संयमाच्या गोष्टी सांगून काय फायदा? नाहीं तरी बौद्धिक क्षेत्रांत ज्यांचा व्यासंग फार आहे अशा बुद्धिप्रधान माणसांची प्रजोत्पादनशक्ति, फक्त शारीरिक काबाडकष्ट करणाऱ्या माणसांपेक्षां कमी असते हा प्रजाजननशास्त्राचा एक सिद्धांतच आहे. व्यवहारांत सुद्धां सुखासीन व बुद्धिजीवि मध्यम व श्रीमंत वर्गापेक्षां श्रमजीवि लोकांना संतति जास्त होते हें आपण नित्य पाहतों. याचें कारण अर्थात् बौद्धिक श्रम करणाऱ्या लोकांच्या उत्पादनशक्तीला भरपूर वाव इतर क्षेत्रांत मिळाल्यामुळें त्यांना मुलें कमी होतात, श्रमजीवि लोकांची सृजनशक्ति इतर कुठल्याच

क्षेत्रांत न गुंतल्यामुळें तिचा व्यय प्रजोत्पादनाकडेच होतो. अशा परिस्थितींत सर्वसामान्य माणसांनी, संयमाचा उपदेश करणे अव्यवहार्य आहे हें लक्षांत येईल. तेव्हां संततिनियमनाची उपयुक्तता ज्यांना पटली आहे, त्यांनीं संयमाच्या गोष्टी न करतां आचरणीय असे दुसरे उपाय शोधण्याचा व ते सुलभ करण्याचा प्रयत्न करावा.

शिवाय संयमाचा एक तोटाही मानसशास्त्रज्ञ दाखवतात. फ्राइडसारखे अंतःमनःप्रवृत्तींचा सूक्ष्म अभ्यास केलेले लोक असे म्हणतात कीं, नैसर्गिक इंद्रियविषयक वासना जबरदस्तीनें दाबून ठेवल्या तर, अनेक मानसिक व शारीरिक विकृती मनुष्याला जडतात. तेव्हां आधीच आचरण्याला कठिण व आभासपूर्वक अवलंबिला असतां, फायद्याच्या दुप्पट चौपट तोटा करणारा संयम न आचरणेंच योग्य नाही काय ?

आतां सनातनींना भेडावणाऱ्या भ्रूणहत्येच्या पातकाचा विचार करू. आपण हिंदु लोक प्रत्यक्ष व अप्रत्यक्षही हिंसेला फार भितों. गृहस्थाला रोजच्या व्यवहारांत कळत वा न कळत होणाऱ्या बारीकसारीक हिंसेसाठीं प्रायश्चित्त म्हणून पंचमहायज्ञ करण्यास स्मृतिकार सांगतात. बौद्ध धर्माला टक्कर देण्यासाठीं त्यांतल्याच प्रमुख तत्त्वांवर हिंदु धर्माचे पुनरुज्जीवन श्रीशंकराचार्यांनीं केल्यापासून तर, हिंदूंनीं हिंसेची फारच धास्ती घेतल्यासारखो दिसते. अशा परिस्थितीत सनातन्यांनी संततिनियमनासारख्या, भ्रूणहत्येच्या पातकाचा मुद्दा पुढें करावा यांत कांहींच आश्चर्य वाटण्याजोगें नाहीं. ' अहिंसा परमो धर्मः । ' असा दृढविश्वास बाळगणाऱ्या आपण, देवानें निर्मू घातलेल्या अनेक बीजमय जीवांचा घात संततिनियमनाच्या उपकरणांनीं करण्यास तयार व्हावें काय ?

यावर असें उत्तर देतां येईल की, भ्रूणहत्येचें पाप संततिनियमनानें पदरी येते असें क्षणभर मानलें तरी दुसऱ्या अनेक हत्या टाळण्यासाठीं जर हे पाप आपण पदरांत घेतलें तर, तें दोषार्ह ठरणार नाही. संततिनियमनानें हिंदुस्थानांत सालोसाल वाढत चाललेली बालमृत्यूंची व स्त्रियांच्या मृत्यूंची संख्या खात्रीनें कमी कमी होत जाईल. तेव्हां एका भ्रूणहत्येनें तुम्ही एका गृहलक्ष्मीचा—दहांच्या पालनकर्तीचा जीव बचावल्याचें श्रेय घेतल्यासारखें होईल. ' सर्वनाशे समुत्पन्नेऽर्धं त्यजति पण्डितः । ' या म्हणीच्या अक्षरशः अर्थाप्रमाणें साडेतीन हात मातेचा देह वांचवण्यासाठीं भ्रूणाचा, नुसत्या बीजमय जीवाचा नाश करणें शहाणपणाचें

व धर्माचें काम नाही काय ? वरचे वर बाळंतपणाचा प्रसंग आल्यानें स्त्रियांची कुवत कमी कमी होत जाते, त्यांना क्षय, रक्ताभावासारखे रोग जडतात व त्यामुळे संसाराच्या ऐन उमेदीत, तीसचाळीस वर्षांच्या दरम्यान हजारों बायका मृत्यु पावतात हें मागील प्रकरणांत आपण पाहिलेच. तेव्हां भ्रूण-हत्येचें पातक वांचवावयास जाऊन संततिनियमन टाळल्यास पापाची केवढी रास डोक्यावर चढते पहा. बहुप्रसवत्वामुळे माता दुबळी व अशक्त होते. रोजचे संसाराचे काम व मुलांचे संगोपन तिच्या हातून नीट पार पडत नाही. आधी अशक्त आईची मुलें जन्मतः अशक्त असायचीच; पुढे त्यांची जोपासनाही नीट न झाल्यामुळे ती जास्त जास्तच कमकुवत होत जायची. एकटा मिळवता; घरांत अनेक तोंडे खाणारी व भरीला गृहलक्ष्मीची व गृहस्थाचीं रोजची दुखणी या सर्व चिंतांनी बापही दिवसेंदिवस खचत जातो. मुलांना शरीराच्या प्राथमिक गरजाही—पोटभर अन्न व अंगभर वस्त्र नीटपणे अशा संसारांत मिळणे कठिण. मग पुढे त्यांच्या बौद्धिक कुवतीला साजेशा उद्योग-धंद्याच्या योग्य शिक्षणाची व्यवस्था होण्याचे तर नांवच नको. मग काय प्रत्येक दुबळ्या प्रकृतीचा मुलगा तुटपुंजे शिक्षण घेऊन त्याच्या आधारावर दुसरा एक दुबळा व दरिद्री संसार थाटतो व आणखी अनेक दुबळ्या जीवांची त्यांच्या भविष्यकाळाचा विचार न करतां पैदास करूं लागतो. तसेच दुबळी मुलगी माता होऊन अनेक कमकुवत जीवांना जन्म देते. काय हे केविलवाणें व भीषण दृश्य ! आणि या सगळ्या दुबळ्या देहाच्या, अपुऱ्या शिक्षणाच्या, कंगाल जीवनाच्या तरुणतरुणीना उद्देशून, आमचे देशभक्त हिंदुस्थानच्या उद्धाराच्या गप्पांनी भरलेली लंबीचौडी व्याख्यानें झोडतात ! विचारी भारत-माता या हृदयद्रावक व भेसूर देखाव्याकडे पाहून खात्रीनें उद्वेगाची व निराशेची टिपें गाळीत असेल! असो.

तेव्हां सांगण्याचा सारांश असा की, पुढील घोर अनर्थ टाळण्यासाठीं प्राथमिक भ्रूणहत्येचें पातक पत्करणे जास्त शहाणपणाचें व परिणामीं हिताचें ठरेल. 'जिच्या हाती पाळण्याची दोरी, ती जगा उद्धरी' असे नेहमीं आपण अभिमानानें म्हणतो; पण मातेचा हात जर पाळण्याची दोरी सारखी हलवून कांचून गेला तर मग ती आपल्या मुलांना कुलदीपक व राष्ट्रभूषणें कसें बनवणार ? तेच संतति जर मातेच्या प्रकृतीला व पित्याच्या पैशांना झेपेल

इतकीच असली तर संसार सुखाचे होऊन पुढची पिढी जोमदार होईल. ज्या आईबापांची प्रकृति धडधाकट असून दहाबारा मुलांना योग्य रीतीनें पोसण्याची सांपत्तिक उमेदही आहे, अशा आईबापांनीं खुशाल घराचें गोकुळ बनवावे. अशा आईबापांची धष्टपुष्ट, कर्तृत्ववान् संतति जितकी जास्त वाढेल तितकी देशाला हवीच आहे. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा प्रेमळ आशीर्वाद सद्गदित स्वरानें जेव्हां वडील माणसें नववधूला व प्रत्येक पुत्रवतीला देतात, तेव्हां अष्टपुत्र भीमार्जुनासारखे बलवान्, धर्मासारखे ज्ञानी, सहदेवनकुलासारखे दर्शनीय व कर्णासारखे महानुभाव निपजतील, अशीच त्यांना उमेद असते. पण ही अपेक्षा पूर्ण न होतां, नुसती शिरोगणति वाढवायला आधार, खायला काळ आणि भुईला भार, अशी प्रजा उत्पन्न होऊं लागली तर राष्ट्राच्या हिताकडे लक्ष देऊन तिला आळा घालणें, व भ्रूणहत्येचें पातक खुशाल पदरांत घेणेंच इष्ट नाहीं काय ?

सनातनींखेरीज संततिनियमनाविरुद्ध कांहीं प्रामाणिक आक्षेप घेणारेही विचारवत लोक आहेत. संततिनियमनानें लोकसंख्या वाढत जाऊन, इटली-जर्मनीसारख्या पाश्चात्य देशांपुढें जो प्रश्न आज येऊन पडला आहे तोच उद्यां हिंदुस्थानपुढेही उभा राहील, अशी या लोकांना भीति वाटते. या आक्षेपालाही वरील उत्तरच उपयोगी पडेल. नुसती शिरोगणतीनें लोकसंख्या वाढून कुठल्या देशाचा उद्धार झाला आहे ? संततीची नुसती सख्या न वाढतां तिचा गुणोत्कर्ष झाला पाहिजे. निदान सध्यां तरी हिंदुस्थानाला जास्त संततीची जरूरी नसून, संततींत जास्त कर्तृत्वशक्ति असण्याची जरूरी आहे. जर्मनी-इटलीला त्यांचें साम्राज्य वाढवणाऱ्या लढाया लढायला नुसती लोकसंख्याच वाढायला हवी आहे. तोफांच्या तोडीं द्यायला कसेही डोके चालतें ! मात्र एक पडल्यावर दुसरें तावडतोब त्याच्या जागीं हजर व्हावयास हवें. म्हणून निवळ लोकसंख्या वाढवण्यासाठीं तिकडे विवाहांना, प्रजोत्पादनाला, फार भाव आला आहे.

खायला पुष्कळ, ऐषआरामाची रेलचेल पण ते उपभोगण्यालाच पुढें कुणी नाही म्हणून रडणाऱ्या श्रीमंत कुटुंबांप्रमाणें त्या राष्ट्रांची अवस्था झाली आहे. लोकसंख्या वाढली तर राहायला जागा नाहीं, वसाहती मिळवाव्या तर लढायला माणसें नाहींत, अशा कांहीं चमत्कारिक चक्रव्यूहांत ते सांपडले आहेत; या

परिस्थितीवर उपाय म्हणजे निवळ लोकसंख्या वाढवणे असे त्यांना दिसून आलें आहे. पण हिंदुस्थानचे प्रश्न त्यांच्या पुढील प्रश्नांपेक्षां अगदीं मूलतःच निराळे आहेत. हिंदुस्थानच्या लोकांना आधीं पोटभर खायला तर मिळूं द्या; त्यांच्या मनाचा व बुद्धीचा शिक्षणानें विकास व्हायला अवसर मिळूं द्या; स्वतःच्या बाहुबलानें व बुद्धिबलानें स्वतःच्या देशाचा अंतर्गत कारभार चालवण्याचें सामर्थ्य त्यांना येऊ द्या; मग पुढें जेव्हां लढाया लढण्याची वेळ येईल, परचक्रें खेळवण्यासाटीं फौजा वाढविण्याचा प्रश्न येईल, तेव्हां संततिनियमनासारख्या कल्पना खुळ्या ठरवून त्या टाकून देतां येतील. हिंदुस्थानांत सुद्धां मध्ययुगीन कालांत अशा लढाया लढण्यासाठींच जास्त पुत्र लोक मागत; पण आजच्या लढाया हिंदुस्थानांत तरी निराळ्या स्वरूपाच्या आहेत. आज हिंदी जनतेपुढें दुसऱ्यांना कसे लवकर व किती जास्त प्रमाणांत मारतां येईल, हा प्रश्न नसून, स्वतः कसें पुष्कळ दिवस व किती चांगल्या परिस्थितींत जगतां येईल हा प्रश्न आहे; व यावर सुचणाऱ्या अनेक उपायांपैकी संततिनियमन करून कुटुंबें सुटसुटीत, निरोगी व सुखी बनवून भावी पिढीचा शारीरिक व बौद्धिक विकास होण्यास योग्य अवसर मिळेल अशी परिस्थिति निर्माण करणें हा एक मार्ग निर्विवाद इष्टार्थसिद्धीकडे नेणारा आहे.

संततिनियमनावरचा आणखी एक विचारांत घेण्याजोगा आक्षेप म्हणजे सध्यां हिंदुस्थानांत जे कांहो थोडया प्रमाणांत संततिनियमन केलें जातें, त्याने वर उल्लेखिलेले फायदे समाजास न होतां उलट पुढच्या पिढीचा तोटाच होत आहे. तेव्हां हा मार्ग थोडया अनुभवाने शहाणे होऊन वेळेवर सोडून द्यावा हें बरें; सध्यां संततिनियमन हिंदु समाजांत मूठभर सुशिक्षित, व सुबुद्ध लोक तेवढे करतात. ज्यांना पांचसहा मुले उत्तम रीतीनें पोसण्याचें सामर्थ्य आहे असे लोक व्यक्तिगत सुखसोय बघून, एकदोन मुलांची सुटसुटीत कुटुंबें थाटून आहेत. यामुळे बुद्धिमान्, सुसंस्कृत आईबापांच्या कर्तृत्ववान् निपजणाऱ्या मुलांना समाज व देश अंतरतो. उलटपक्षीं अडाणी, अशिक्षित, दरिद्री वर्ग संततिनियमनाच्या शास्त्राविषयी अज्ञानामुळे पूर्ण उदासीन असून दुबळया जीवांची पैदास वाढवीत आहे.

हा विलक्षण देखावा सध्यां समाजांत दिसत आहे खरा, व त्यामुळे संततिनियमनाच्या अंतिम उपयुक्ततेविषयीं मन साशंक होतें खरेंच, पण

मला वाटतें, याला जबाबदार परिस्थिति आहे व हा दोष कालमानानें दूर होईल. हल्लीच्या संक्रमणाच्या काळामध्यें संततिनियमनाच्या शास्त्राचें महत्त्व व माहिती फक्त मूठभरच जाणत्या सुशिक्षित लोकांस अवगत आहे. पण जसजसा शिक्षणाचा प्रसार खेडोपाडी स्त्रीपुरुषांत वाढेल; Antenatal Clinics सारख्या सोयी जसजशा अधिकाधिक होत जातील तसतसा संततिनियमनाच्या शास्त्राचा प्रचार सार्वत्रिक होईल व नालायक प्रजेची उपज थांबून वरील आक्षेप दूर होतील. आक्षेप घेणारे जाणते लोक जर या शास्त्राची माहिती अडाणी व गरीब लोकांना देण्याला सुरुवात करतील तर ते स्वतःच आपल्या आक्षेपाचें निरसन अगदी थोडया काळात करू शकतील.

दुसरें म्हणजे संततिनियमनाचीं साधनें महाग व वापरण्यास जरा भानगडीचीं असतात; त्यामुळे फक्त सुखवस्तु कुटुंबांनाच ती परवडतात. यामुळे ज्यांना मोठें कुटुंब पोसण्याचें सामर्थ्य आहे, अशा संपन्न मंडळीचीं कुटुंबें छोटीं व ज्यांना मोठं कुटुंब पोसण्याची ऐपत नाही अशा लोकांचीं संततिनियमनाचीं उपकरणें सतत वापरणें आहाराबाहेर आहे, म्हणूनच कुटुंब मोठी असा विपरीत प्रकार नजरेस पडतो. पण याला उपाय संततिनियमनाचा अजिबात त्याग करणें हा मात्र नव्हे. जाणत्या व सुबुद्ध लोकांनी संशोधन करून संततिनियमनाचीं साधनें स्वस्त व सुलभ केल्यास सर्व दोष दूर होतील. दिवसेंदिवस शास्त्रीय ज्ञानाची प्रगति होत असलेली पाहून असे शोध लागणे फार कठिण नाही असें वाटतें. जास्त मोठया प्रमाणावर व जास्त माणसें झटपट कशी मारावींत याचे शोध शास्त्रज्ञांचे सुपीक मेंदू भराभर लावीत आहेत. मातेच्या उदराबाहेर जीव निर्माण करण्याची खटपट कित्येक लोक करीत आहेत. सकृद्दर्शनी अशक्य वाटणाऱ्या गोष्टीसुद्धां साध्य करण्यासाठी प्रयत्न चालले आहेत, मग वर उल्लेखलेली सुधारणा अगदीच किरकोळ स्वरूपाची व सोपी असल्यामुळें ती लवकरच होईल अशी आशा करण्यास हरकत नाही. मात्र थोडी वाट पाहण्याची तयारी पाहिजे. संक्रमणाच्या कालांत थोडे हाल, थोडी गैरसोय, थोडे विपरीत प्रकार प्रत्येक समाजाला सोसावे लागणारच. झारशाहीचें निर्दालन करून समानदर्शी राष्ट्र निर्माण करीपर्यंत रशियांतील लोकांना थोडया का विपत्ती सोसाव्या लागल्या असतील? त्याचप्रमाणें संततिनियमन हे शास्त्र अद्यापि बाल्यावस्थेत असल्यामुळें व आमचा समाज

अज्ञ व दरिद्री असल्यामुळे, या शास्त्रापासून व्हावे तसे फायदे प्रथम होणार नाहीत; उलट अनिष्ट परिणाम होतातसे वाटेल; पण धैर्यानें हे तोटे कांहीं काल सोसल्यास कांहीं दिवसांनी शास्त्रज्ञांच्या संशोधनाने व समाजसेवकांच्या परिश्रमानें इष्ट फायदे होऊं लागतील. मात्र घायकुतेपणानें प्रारंभीच्या विपरीत प्रकारांनी कच खाऊन हिंदुस्थानला सध्यां अत्यंत जरूर असलेल्या या सुधारणेचा अविचाराने त्याग करतां कामा नये.

संततिनियमनाविरुद्ध सनातनीचा एक भरीव आक्षेप अजून बाकी आहे. तो म्हणजे संततिनियमनाच्या ज्ञानाचा सर्वत्र प्रसार झाला, त्याचीं साधनें सुलभ व स्वस्त झाली तर समाजांत जिकडे तिकडे परिणामाची भीति नसल्या-मुळे स्वैराचार माजेल. या प्रथमदृष्टया निरुत्तर वाटणाऱ्या आक्षेपाला दोनतीन उत्तरे सुचवितां येतील. प्रथम म्हणजे संततिनियमनापासून राष्ट्राचा कसा व किती फायदा होतो हे वर दाखविल्याप्रमाणे जर तुम्हांला खरोखर पटले असेल तर एवढया फायद्यासाठी एकादा तोटा तुम्ही सोसण्यास तयार असलें पाहिजे. मानवी समाजांतील कोठली गोष्ट वा संस्था पूर्ण व सर्व-गुणसंपन्न आहे? अग्नीचा आमच्या पूर्वजांना जेव्हां प्रथम शोध लागला तेव्हां समाजाची केवढी सोय झाली असेल! शीतनिवारण, पाकसिद्धि वगैरे अनेक उपयुक्त क्रिया अग्नीच्या योगें होतात हे पाहून आमच्या पूर्वजांनी अग्नि प्रज्वलित करण्याच्या शास्त्राचा प्रसार करण्यास सुरुवात केली असेल. त्या काळीही अर्थात् लोककल्याणाची कळकळ बाळगणारे कांही महात्मे पुढे येऊन लोकांना विनवून सांगत असतील की, "बाबांनो, हा अग्नि तुम्हांला मोठा मोहक वाटतो खरा; पण फार भयंकर आहे बरं तो! अहो, त्याच्यायोगें नुसती सुदर पाकसिद्धि होते. ऊब येते, म्हणून हुरळून जाऊं नका. हा सर्वभक्षक भयकर प्राणी तुमचा व तुमच्या साऱ्या मालमत्तेचा एकादे वेळेस विध्वंस करून टाकील एका क्षणांत. तेव्हां प्रथम कसेही करून या अग्नीचा नाश करून टाका; मग तुम्हांला कुडकुडत राहावे लागलें, कच्चे अन्न खाऊन तुमची प्रकृति खराब झाली तरी हरकत नाही." या भरीव आक्षेपावर आमच्या पूर्वजांनीं खात्रीनें असा युक्तिवाद लढवला असेल की, "पंडितहो, तुम्ही म्हणतां तशी भीति या विस्तवापासून आहे खरी. पण याचे उपयोग इतके पुष्कळ आहेत कीं, कधी तरी हा विध्वंस करील, या भीतीनें रोज उपयोगीं

पडणाऱ्या याला सोडून देण्यास आम्ही मुळीच तयार नाही." आणि खरोखर, विध्वंसापेक्षां रोजच्या व्यवहारांत अग्नीपासून जास्त फायदेच आजपर्यंत जगांत झालेले आढळतात. त्याचप्रमाणें संततिनियमनाचे कैवारी असें म्हणतील की, या नवीन शास्त्रानें आमचें व्यक्तिशः कुटुंबांत, समाजांत व राष्ट्रांत किती तरी कल्याण होणार आहे. मग केवळ कांहीं विकृत मनोवृत्तीचे लोक या शास्त्राचा दुरुपयोग करून, स्वैराचार करतील, म्हणून सर्वच कुटुंबांना, साऱ्या राष्ट्राला, दैन्याची व दौर्बल्याची शिक्षा ठोठावणें, न्याय्य आहे का? अनुभवांतीं खात्रीनें आढळून येईल कीं, या शास्त्रापासून राष्ट्राचा तोटयापेक्षां जास्त फायदाच होणार आहे. कारण संतति होण्याची भीति नाहींशी झाली की, प्रत्येक स्त्री सारखी स्वैराचार करीत सुटेल असें वाटण्याला मानव्याविषयीं फारच हीन व विकृत कल्पना असली पाहिजे. शिवाय ज्या स्त्रियांना स्वैराचाराची आवडच आहे त्या तो करणारच. संततिनियमनाच्या साधनांची त्या वाट पाहात बसणार नाहींत. स्वैराचाराच्या जोडीला बालहत्येचें पातक जोडून ठेवतील, म्हणजे झालें. सततिनियमनानें ही उघड उघड होणारी बालहत्या तरी वांचेल असें म्हणण्यास काय हरकत आहे? दुसरें, पुरुषांना स्वैराचाराची मुभा निसर्गानेच दिली आहे. त्यांना परिणामाची, संततीची भीति नसते. म्हणून सारेच पुरुष स्वैराचारी बनले आहेत काय? ज्यांना स्वतःच्या शरीराच्या व मनाच्या पावित्र्याची चाड आहे, कुटुंबाच्या स्वास्थ्याची ज्यांना कळकळ आहे असे पुरुष नीतीचीं बंधनें पाळतांना आढळतातच ना? मग सततिनियमनाचा प्रचार झाल्यावर स्त्रिया मात्र साऱ्याच स्वैराचारी होतील असें म्हणण्याला काय आधार आहे? आतां पुराणस्मृतिकारांप्रमाणें,

**स्थलं नास्ति क्षणं नास्ति नास्ति प्रार्थयिता नरः ।**
**तेन नारद नारीणां सतीत्वमुपजायते ।।** —पद्मपुराण

स्त्रिया या स्वभावतःच पापाच्या खाणी आहेत असा ग्रह करून बसलेल्यांना कांहींच सांगायची सोय नाहीं! जो पक्ष स्त्री ही शरीरानें, मनानें, बुद्धीनें, शीलानें पुरुषापेक्षां हीन असते असें धरून चालतो, त्या पक्षापुढें हे प्रश्न चर्चेला काढण्याचें कारणच नाही. स्त्री ही सर्वसाधारणपणें 'मानवकोटींत' धरण्याजोगी आहे (Humanity of woman) हें ज्याला किमानपक्षीं कबूल आहे त्याच्याच पुढें हे वाद करण्यांत कांहीं अर्थ आहे.

यात्रमाणें संततिनियमनानें स्त्रिया स्वैराचारी बनतील या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं हें आपण बघितलें. शिवाय आणखी असें म्हणतां येईल कीं, समाजहिताविषयीं कळकळ बाळगणारांनीं, पुरुषांच्या स्वैराचाराला कांहीं बंधन घालण्याचा कधीं विचार किंवा प्रयत्न केला आहे काय? उलट पुरुष हा स्वभावतःच बहुपत्नीक असतो असे मानसशास्त्राचे संरक्षण पुरुषांना देण्यांत येतें व त्यांच्या स्वैराचारापासून त्यांचे, त्यांच्या कुटुंबाचें व समाजाचें शक्य तितके कमी नुकसान व्हावें म्हणून समाज खटपट करीत असतो. कुलीन स्त्रियांना पुरुषांच्या स्वैराचाराची झळ लागू नये व पुरुषांची तर सोय व्हावी, म्हणून वेश्याव्यवसायाला राजरोस संमति, समाज व सरकार देतें. (हा प्रकार किती अन्यायी व स्त्री-जातीला शरम आणणारा आहे, याचें विवेचन पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत येईलच.) स्वैराचारामुळें, समाजाच्या या आधारस्तंभांना गुप्त रोगांची बाधा होऊं नये म्हणून वेश्यागृहांची व वेश्यांची कडक शारीरिक तपासणी करणें, गुप्तरोगप्रतिबंधक ज्ञानाचा व साधनांचा प्रसार करणे, असे उपाय समाज व सरकार योजितें. पुरुषांच्या स्वैराचाराला याप्रमाणें बंधन घालण्याचें बाजूलाच सारून, तो जास्त निर्वेध व सुखकारक होण्याची योजना समाज करतो. मग स्त्रिया मात्र संततिनियमनाने कदाचित् स्वैराचारी होतील या काल्पनिक भीतीनें घाबरून जाऊन, संततिनियमन त्याज्य ठरवणें व स्त्रियांना प्रजाधारण व पोषण याच्या कधी न थांबणाऱ्या चक्रावर डांबून ठेवून त्यांची शारीरिक दुर्दशा करणे, न्याय्य व निःपक्षपातीपणाचे आहे काय? स्त्रियांच्या काल्पनिक स्वैराचाराने समाजशास्त्रज्ञांचे धाबे दणाणते; मग पुरुषांचा स्वैराचार कसा चालतो त्यांना? पुरुषाला रुचिवैचित्र्य असते; मग स्त्रीलाही तें कशावरून नसतें? त्या विनयानें मौन स्वीकारतात, याचा फायदा तुम्ही दोन्ही बाजूंनी घेणार काय? मानसशास्त्रज्ञ म्हणणार की, स्त्री ही स्वभावतःच एकनिष्ठ असते. तिला विषयसुखाची फारशी किंमत वाटत नसून, संतति मात्र हवी असते. पण पुरुष हा विषयप्रिय आहे. तेव्हां त्याच्या अंतःप्रवृत्तींना खुलें द्वार करून देऊन त्याच्या स्वैराचाराची सोय करून दिली पाहिजे, नाहीं तर त्या प्रवृत्तींना विकृत वळण लागून वाईट परिणाम होईल. बरे, दुसऱ्या बाजूनें सनातनी वळणाचे समाजशास्त्रज्ञ म्हणणार कीं, "स्त्री ही विषयलोलुप आहे. तिला संतति होण्याची भीति आहे, म्हणून ती पवित्र मार्गावर राहते. एकदां संतति-

नियमनाचा प्रसार होऊं द्या म्हणजे स्त्रिया स्वैराचाराचा धुमाकुळ घालतील." एकूण, अनेक युक्तिप्रयुक्तींनी स्त्रियांच्या स्वैराचारावर व स्वातंत्र्यावर दाब ठेवायला सर्व जण टपून बसले आहेत, असें कां? सर्व शास्त्रकार, स्मृतिकार व आधुनिक समाजशास्त्रज्ञही पुरुषजातीचे असल्यामुळे हा पक्षपात चालला असावा. हा पक्षपात पाहून एकादी ज्वलज्जहाल मतांची स्त्रीस्वातंत्र्यवादिनी (feminist) जर म्हणूं लागली की, "स्त्रियांना जसे नागरिकत्व, वारसाहक्क वगैरे बाबतीत समान हक्क पाहिजेत, तसे नैतिक बंधनांच्या बाबतींतही पाहिजेत. पुरुषांच्या स्वैराचाराला निसर्गानें बंधन घातलें नाही म्हणून त्यांना जो स्वैराचाराचा हक्क मिळाला आहे, तो आम्ही स्त्रियांनी संततिनियमन आचरून कां मिळवूं नये? पुरुषांना नैतिक बंधनें नाहीत, मग ती आमच्यावरच तेवढी कां लादली जावीत?" तर तिला फारसा दोष देतां येणार नाही.

अर्थात् ही विचारसरणी आततायीपणाची, अविचारी व समाजस्वास्थ्यास विघातक अशी आहे. पुरुष गाय मारतात म्हणून स्त्रियांनी वासरू मारावें, म्हणजे त्यांनी समान हक्क मिळवल्यासारखें होईल हा पोरकटपणाचा युक्तिवाद, जे स्त्रियांना हीन मनःप्रवृत्तीचे लेखतात व स्त्रिया स्वैराचारी होतील म्हणून संततिनियमनाविरुद्ध ओरड करतात त्यांनाच देण्यापुरता आहे. न्याय्य रीतीनें समानदर्शी भूमिकेवरून वाद करणाराला द्यावयाचें उत्तर वर दिलेंच आहे. ते म्हणजे हेच की, संततिनियमनापासून दुसरे अनेक श्रेष्ठ फायदे होत असल्यामुळे कांही विकृत मनोवृत्तीच्या स्त्रिया त्याचा दुरुपयोग करतील म्हणून त्याचा अव्हेर करणें योग्य नाही.

स्वैराचाराखेरीज आणखी एक भीति सनातनीच्या मनांत, संततिनियमनाला विरोध करतांना वावरत असते. ज्या स्त्रिया संततिनियमन करतात किंवा करूं इच्छितात त्यांच्या अंगी वात्सल्य कमी असतें, व मुलांची जोपासना करण्याविषयीं त्या बेफिकीर व उदासीन असतात असे त्यांना वाटतें. पण पाश्चात्य देशांत व आपल्याकडेही प्रत्यक्ष व्यवहारांत याच्या उलट अनुभव येतांना दिसेल. आधुनिक माता ही मातृपदाच्या जबाबदारीची पूर्ण जाणीव असलेली, त्या जबाबदारीला आपण पात्र व्हावें म्हणून प्रयत्न करणारी व नंतर ती जबाबदारी अत्यंत कर्तबगारपणें पार पाडणारी अशी

असते. मातृपद हें अत्यत पवित्र व अपूर्व असे स्त्रीजातीचें भूषण आहे, हें ती ओळखून असते, व म्हणूनच तिची शरीरानें व मनानें ज्या वेळीं ते पद स्वीकारण्याची पूर्ण तयारी असेल, त्याच वेळीं ती खुषीने माता होते व आपल्या मुलांचे हौशीनें उत्तम संगोपन करते. उलटपक्षी संततिनियमन माहीत नसलेली स्त्री निसर्गाला वाटेल तेव्हां, तिची प्रकृति खालावलेली असेल तेव्हां सुद्धां, अचानकपणें माता होते. प्रकृति बरी नसल्यामुळे व आधी बऱ्याच मुलांच्या खस्ता खाऊन कटाळलेली असल्यामुळे गरोदरपण म्हणजे स्त्रीला मोठे सकट ओढवल्यासारखे वाटतें. पुष्कळ वेळां त्राग्यानें ती आपल्या प्रकृतीची हयगय करते. कधीं कधी तर मूल नको असलेल्या स्त्रिया गर्भपात होण्यासाठी आयाबायांची, वैदूंची वगैरे वेडीवांकडी औषधें घेतात; (कारण कायद्यानें डॉक्टरांना गर्भपातासाठीं वैद्यकीय सल्ला देण्याची कांही विशिष्ट परिस्थिति सोडून बंदी आहे.) या औषधांनी गर्भपात तर होत नाहींच, पण आईला व गर्भाला इजा मात्र होते. नंतर तिच्या इच्छेविरुद्ध पूर्ण वाढ होऊन मुलानें जन्म घेतल्यावर ती त्याचा राग रागच करते. अशा परिस्थितींत भावी पिढीचें योग्य संगोपन कसें व्हावे व बालमृत्यूंचे व मातांच्या मृत्यूंचें प्रमाण कमी कसें व्हावें? तेव्हां सततिनियमनाच्या ज्ञानाच्या प्रसारानें स्त्रियांची वात्सल्यबुद्धि व मातेचें कर्तृत्व कमी न होतां हवे तेव्हांच मातृपद येत असल्यामुळे जास्त हौसेनें व शास्त्रीय पद्धतीनें मुलांचे संगोपन होईल, हे लक्षांत घेऊन सनातनींनीं सुद्धां संततिनियमनाच्या चळवळीला पाठिंबा दिला पाहिजे.

स्त्रियांना मातृपद स्वेच्छेनें स्वीकारण्याचा हक्क असणें हे त्यांच्या व परिणामी राष्ट्राच्याही फायद्याचें आहे, ही गोष्ट पाश्चात्य राष्ट्रांनीं ओळखून संततिनियमनाच्या ज्ञानाचा व साधनांचा प्रसार झपाट्यानें चालवला आहे. रशियानें तर १९२० सालीं संततिनियमनाच्याही पुढे एक पाऊल टाकून, स्त्रियांना हा हक्क मिळवून दिला. तेव्हां रशियामध्यें संततिनियमनाची साधनें महाग व दुर्मिळ होती. शिवाय ते शास्त्र बाल्यावस्थेत असल्यामुळे कधीं कधी तें यशस्वीही होत नसे. रशियामध्यें तर प्रत्येक स्त्रीला आपली माता होण्याची वेळ निश्चित करतां येणे अत्यंत जरूर आहे. कारण रशियन स्त्रियांचा वेळ त्यांच्या व राष्ट्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा असतो. त्या पुरुषांच्या बरोबरीनें यःकश्चित स्क्रू बनवण्याच्या कारखान्यापासून तों महत्त्वाचे शोध लावणाऱ्या

रासायनिक प्रचंड प्रयोगशाळेपर्यंत, शेतांत फिरणाऱ्या निरुपद्रवी नांगरापासून तों रणांगणांत गरजणाऱ्या मशीनगन्सूपर्यंत प्रत्येक लहानमोठ्या क्षेत्रांत कामें करीत आहेत. अर्थात् वाटेल तेव्हां हातांतलें काम सोडून जाणें त्यांना पुरुषाप्रमाणेंच शक्य नाही. तेव्हां स्त्रीची आपल्या सवडीवर, स्वातंत्र्यावर पुरुषाप्रमाणेंच हुकमत चालणे अत्यंत जरूर आहे. स्त्रीला उसंत असेल, आपलें काम कांहीं दिवस बाजूला सारण्यास सवड असेल अशाच वेळीं मूल झालें पाहिजे. वाटेल तेव्हां अनपेक्षित रीत्या बाळंतपणाची वेळ येऊन तीनचार महिने घरांत निकामी व दुबळें होऊन बसणें तिला व राष्ट्राला परवडणार नाहीं. कारण स्त्री ही पुरुषाइतकें काम करूं शकते; तिचे बौद्धिक सामर्थ्य पुरुषाच्या बरोबरीनें आहे, हें स्त्रियांनी रशियांत सिद्ध करून दाखवलें आहे. असा एकही धंदा रशियांत नाहीं कीं, जिथें स्त्रियांनीं प्रवेश करून घेतला नाही, मग तो शारीरिक कष्टाचा असो वा बौद्धिक कौशल्याचा असो. या गोष्टीवर अविश्वास दाखवून कांही लोक असें प्रतिपादतात की, "कांहीं झालें तरी शारीरिक सामर्थ्यांत स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने टिकूं शकणार नाहीत; कारण निसर्गानेंच त्यांचें शरीर नाजूक हातानें घडवलें आहे." पण यावर असें उत्तर देतां येईल कीं, निवळ शारीरिक पाशवी बलाचें माहात्म्य या यांत्रिक युगांत झपाट्यानें मागे पडत आहे. रणांगणांत काय, कारखान्यांत काय किंवा शेतांत काय हल्लींच्या शास्त्रीय नवनव्या शोधांच्या काळांत, निवळ शक्तीपेक्षां युक्ति, नुसत्या दणकट हातापायांपेक्षां चलाख डोकें, जास्त उपयोगी असल्याचें दिसून येईल, व ही युक्ति व बुद्धि स्त्रियांना पुरुषांइतकीच असते असें आतां सिद्ध झालें आहे. (एके काळी अशी समजूत होती की, स्त्रियांचा मेंदू पुरुषांच्या मेंदूपेक्षां लहान असतो व म्हणून त्या पुरुषांपेक्षां बुद्धीनें कमी; पण त्यांत कांहीं अर्थ नाही हे सर्वपक्षीं आतां पटलें आहे.) हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या बुद्धीचा योग्य विकास होण्याला संधि मिळत नसल्यामुळें "बायकांची अक्कल चुलीपुरती" असें म्हणून तिला कमी लेखण्यांत येतें. पाश्चात्य राष्ट्रांत योग्य संधि मिळाल्यामुळें स्त्रियांचें बुद्धितेज चमकूं लागलें आहे; व त्यायोगें कुठलेंही काम पुरुषांप्रमाणेंच त्या करूं शकत आहेत; मात्र निसर्गनियमांप्रमाणें त्यांच्या कर्तृत्वशक्तीला बांध पडण्याचा प्रसंग मधून मधून येतो; तो म्हणजे प्रजाधारणाचा व पोषणाचा

काळ. या कार्यावर व त्याच्या कालावर त्या नियंत्रण घालूं शकल्या तर मग पुरुषाप्रमाणेंच त्या राष्ट्राच्या आधारस्तभ बनतील. अर्थात् अजिबात प्रजानिर्मिति थांबवणें वंशवृद्धीच्या दृष्टीनें इष्ट नाहीं. जोंवर कृत्रिम उपायांनीं मुलें निर्माण करण्याचा (Test tube babies) शोध यशस्वी झाला नाही तोंवर संततिवृद्धीची जबाबदारी कितीही कठिण, त्रासदायक व कर्तृत्वनाश करणारी असली तरी स्त्रियांना ती पार पाडलीच पाहिजे; व सर्वच स्त्रियांच्या अंगीं वात्सल्यबुद्धि उपजतच ठेवण्याची निसर्ग खबरदारी घेत असल्यामुळे, स्त्रिया हें काम अजिबात अंगाबाहेर कधीं टाकतील हें शक्यच नाहीं. मात्र प्रजाधारणानें स्वतःचे कर्तृत्व भलत्याच वेळीं खुंटूं नये, म्हणून प्रत्येक स्वतंत्र व कर्तबगार स्त्री खबरदारी बाळगील. नाहीं तर कोल्हटकरांनी एका नाटकांत वर्णन केल्याप्रमाणें, स्त्रियांच्या सैन्याबरोबर सुईणींच्या तुकड्या बाळगण्याची वेळ नेहमींच येऊं लागली तर स्त्रियांचें कार्यक्षेत्र घराच्या बाहेर वाढवणें हास्यास्पद व व्यर्थ होईल. तेव्हां राष्ट्रहिताच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें मूल केव्हां व्हावें, किती वर्षांच्या अंतरानें व्हावें, किती मुलें व्हावीं हें ठरवण्याचा हक्क व ठरवलेला उद्देश सफल होण्यासाठीं योग्य ती साधनें वापरण्याची संधि प्रत्येक स्त्रीस, ती समाजाचा एक पूर्ण व स्वतंत्र घटक व्हावयास पाहिजे असेल तर मिळाली पाहिजे. ही गोष्ट रशियानें ओळखली व संततिनियमनानें सदरहू उद्देश पूर्णपणें व हमखास सफल होत नाही असें पाहून, १९२० सालीं गर्भपाताला त्यानें कायदेशीर समति दिली. हजारो रशियन स्त्रिया आनदानें या कायद्याचा फायदा घेऊ लागल्या. फक्त मॉस्कोमध्यें १९३० साली १,७५,००० गर्भपात शस्त्रक्रियेच्या मदतीनें यशस्वी रीतीनें पार पाडण्यांत आले. कृत्रिम गर्भपातानें स्त्रीच्या प्रकृतीस इजा होईल ही भीतीही प्रत्यक्ष आंकड्यांनीं खोटी ठरवली आहे. वीस हजार शस्त्रक्रियांपैकीं फक्त एकच अयशस्वी होऊन बाई मरण पावल्याचे आंकड्यांवरून दिसतें.

अर्थात् सनातनींच्या भ्रूणहत्येचा आक्षेप या कायद्याविरुद्ध पुढें येणारच ! जेथें रजस्वला मुलगी अविवाहित पितृगृही राहिली तर पित्याला मासोमासीं भ्रूणहत्येचें पातक लागतें, व संततिनियमनानें हजारों, लाखों बीजमय भ्रूणहत्या घडतात असें मानण्यांत येतें, तेथें विवाहित स्त्रीनें धडधडीत

भ्रूणहत्येसाठीं वैद्यकीय मदत राजरोस मागावी व कायद्यानें ती तिला खुशाल द्यावी, हा नीतिभ्रष्टतेचा कळसच होय, असें सनातनींना व सर्वसामान्य जनतेलाही वाटल्यास कांही आश्चर्य नाही. पण हजारो वर्षांच्या ठरीव विचारसरणीनें विचारांना आलेला कोतेपणा बाजूला ठेवून, जरा व्यापक दृष्टीनें विचार केला तर या गोष्टींत कांही वावगें दिसणार नाही. नैसर्गिक प्रसूतीपर्यंत दिवस गेल्यानें स्त्रीच्या प्रकृतीला प्राणघातक असा कांहीं अपाय होण्याचा संभव असला, तर शस्त्रक्रियेने गर्भपात घडवून आणणे इंग्लंडमध्यें व हिंदुस्थानांतसुद्धां सध्यां कायद्याला संमत आहे. ही गोष्ट जर आपल्याला वावगी वाटत नाही, तर स्वतंत्र व सुबुद्ध स्त्रीचा कर्तृत्वनाश होतो. अंगीकृत कार्य मध्येंच सोडावे लागल्यामुळे त्या कार्याची, तिच्या परिश्रमाची व परिणामी राष्ट्राची हानि होते, या भरीव कारणामुळें गर्भपाताला कायद्यानें दिलेली संमति कां पटत नाहीं आपणाला ? हा केवळ मनावर व विचारांवर पिढ्यान् पिढ्या झालेल्या संस्काराचाच परिणाम नव्हे काय? स्त्रीला चूलमूल यापलीकडे कांहीं स्वतंत्र कर्तृत्वच नसते ही दृढमूल झालेली भावना या कायद्याला आपल्याला नाकें मुरडावयास लावते. शास्त्रज्ञ, राजकारणी, व लोकसेवक अशा थोर पुरुषांनी आपल्या कर्तृत्वाला बाध येऊं नये, चित्त फाकूं नये म्हणून संसाराची जबाबदारी घेण्याचे अजिबात टाळले किंवा त्या जबाबदारी-विषयी सॉक्रेटिस्-तुकारामासारखे ते उदासीन राहिले, तर आपण त्यांना दोष न देतां, उलट त्यांचे निःस्वार्थी म्हणून कौतुक करतो. पण त्याच कारणांसाठी एकादी स्त्री अविवाहित राहिली किंवा विवाह करूनही संततिवर्धन करण्याचें टाळूं लागली, तर मात्र आपणांस तें अत्यंत गैर वाटतें. पण आपल्या सारासार विचारशक्तीवरील संस्काराची काजळी आपण झाडून टाकल्यास आपल्यास लख्ख दिसून येईल कीं, संततिनियमन व ते अयशस्वी झाल्यास शस्त्रक्रियेनें गर्भपात हा प्रत्येक स्वतंत्र व कार्यक्षम स्त्रीचा जन्मसिद्ध हक्क समजला पाहिजे. प्रथम निसर्गानेच पक्षपात करून संतति धारण करण्याची व ती पोसण्याची अत्यंत अवघड, नाजूक जबाबदारी फक्त स्त्रियांवर टाकली, तरी पण ती जबाबदारी पार पाडण्यास स्त्री स्वखुषीनें पुढे होत आहे. मात्र प्रजोत्पादनाच्या या कार्यावर तिच्या सोयीप्रमाणें मर्यादा घाल-ण्याचा हक्क ती पुरुषापाशीं व कायद्यापाशीं मागत आहे. तो तिला नाकारून

पुरुष आपल्या मनाचा हलकेपणा मात्र उघड करतील. आधुनिक स्त्री पूर्वींच्या स्त्रियांपेक्षां दुप्पट व दुहेरी कार्य करण्यास, आज हुरूपानें पुढें सरसावली आहे. पुढील पिढी तयार करण्याच्या कामाबरोबर, समाजाचा एक स्वतत्र घटक व राष्ट्रांतील एक नागरिक म्हणून स्वतंत्र कर्तृत्व करण्याची तिला उमेद आहे. हें दुहेरी कार्य यशस्वी करण्यासाठी तिला फक्त संततिनियमन व कायदेशीर गर्भपाताची सोय हवी आहे. ही लहानशी सवलत स्वैराचार होईल या भीतीनें—जो स्वैराचार पुरुषवर्ग सध्यां मनःपूत करीतच आहे—समाज तिला नाकारणार काय? रशियानें जगाला दाखवून दिले आहे की, विशिष्ट परिस्थितींत स्त्रियांची ही मागणी राष्ट्राला पूर्णपणे पटण्याजोगी आहे. (विशिष्ट परिस्थितींत असें म्हणण्याचें कारण, रशियाने गर्भपात हा पुन्हां नुकताच बेकायदेशीर ठरवला आहे. आतां राष्ट्र सपन्न झालें असून, वाटेल तेव्हां स्त्रीला मूल झालें तरी मातेला हव्या तशा सवलती देण्यास राष्ट्र समर्थ झालें आहे. मुलांचीही काळजी पूर्णांशानें सरकारच घेते. तेव्हां आतां गर्भपाताची एवढीशी जरूरी उरली नाहीं. संततिनियमन मात्र अर्थातच आचरण्यांत येते.) स्त्रियांना हव्या त्या सवलती दिल्यामुळे त्या पुरुषांच्या बरोबरीनें राष्ट्रकार्यास हातभार लावीत आहेत, व त्यामुळे राष्ट्रांत पूर्वीपेक्षां दुप्पट काम होत आहे. आज अनेक शतकें हिंदुस्थाननें आपल्या अर्ध्या नागरिकांना अडाणीपणाच्या अंधारांत बसवून, ससाराच्या किरकोळ काबाडकष्टांत त्यांची कर्तृत्वशक्ति राबवून बालविवाह, विधवासंन्यास व बहुप्रसवत्वासारख्या जड बेड्या त्यांच्या हातापायांत ठोकून पंगु करून टाकिलें आहे, व आपलें नुकसान करून घेतलें आहे. आतां तरी हिंदुस्थाननें जागृत होऊन, अनिष्ट रूढींचा बीमोड करण्यास व संततिनियमनासारख्या प्रमुख सुधारणांचा पायंडा पाडण्यास पुढें सरसावून आपला उद्धार करून घेतला पाहिजे.

---

# .... .... विवाहविच्छेद

हिंदुस्थानांतील स्त्रियांची अवनति व ऱ्हास होण्याची दोनतीन कारणे आपण अद्यापपावेतो पाहिली. बालविवाहामुळे कोंवळया शरीरावर व मनावर अवास्तव भार पडून, शारीरिक व मानसिक वाढ अकालींच खुंटते. विवाहानंतर प्रजाधारणपोषणाचे चक्र सुरू होऊन, प्रकृतीची अगदीं माती होऊन जाते. स्त्रीच्या बुद्धीचा व व्यक्तित्वाचा विकास होऊन त्याचा समाजाला व राष्ट्राला उपयोग होण्याचे बाजूला राहून, ती केवळ संसारांतील कष्टाची भारवाहक व वंशसातत्याचें एक यंत्रवजा साधन होऊन बसते. बरें, या कष्टां-बद्दल तिला कांहीं कृतज्ञताबुद्धि दाखवली जाते किंवा घरांत कांहीं मान किंवा अधिकार प्राप्त होतो म्हणावे तर तेही नाही. विनावेतन जन्मभर कष्ट करण्याची परवानगी हीच काय ती तिच्या वांटणीला येणारी बक्षिसी. तिला स्वतःच्या घरांत किवा स्वतःच्या मुलांबाळांवर कायदेशीर रीत्या काडीचीही सत्ता नसते. नवऱ्यानें किंवा मुलांबाळांनी अव्हेरल्यास आधार म्हणून उपयोगीं पडेल अशी तिच्या पूर्ण हक्काची मालमत्ता तिच्यापाशी कवडीचीही नसते. ती जर दुर्दैवाने—नव्हे गळयाला लागलेली मुलगी उजवण्याच्या घाईने बापानें करून दिलेल्या 'श्रीमंत-शारदीय' विवाहाने—संसार पुरा होण्याच्या किंवा संसार खरा सुरू होण्याच्या आंतच विधवा झाली, तर नवऱ्याच्या संसारांत काबाडकष्ट करून, कांहींशा अधिकाराने मिळणाऱ्या सुखाच्या तुकडयाला सुद्धां आंचवते. विधवांचे हाल कसे व किती प्रकारांनीं होतात तें मागील एका प्रकरणांत आपण पाहिलेच.

पण वैधव्याहून कठिण व कष्टमय असे एक ताट कधीं कधीं बायकांपुढे वाढून येते; ते म्हणजे नवऱ्याने 'टाकून देणें.' परित्यक्तेचे हाल व लाजिर-वाणें दैन्य कुठवर सांगावे? विधवेला, आपल्या कर्माला दोष देत देत, भाऊबंदांपाशी हक्कानें पोटगीचा कोरभर तुकडा तरी मागतां येतो; पण परित्यक्ता मात्र, नाथ असूनही, किंबहुना नाथ असल्यामुळेंच अनाथ बनते. तिचा नवरा जरी तिला हाणमार करूं लागला, सासूसासरे जाचूं टोचूं लागले,

तरी ती नवऱ्याचा उंबरठा ओलांडू शकत नाहीं. नवरा मारहाण करतो या सबबीवर घराबाहेर पडून, कोर्टात तिला दाद मागतां व पोटगी घेतां येत नाहीं. कारण अशी फिर्याद दाखल झाल्यास कोर्ट प्रथम नवरा तिला बाळगण्यास खुषी आहे किंवा नाहीं याची चौकशी करते. बायकोच्या खुषीचा मुळीं प्रश्नच उद्‌भवत नाहीं! नवरा अर्थातच बाळगायची नाखुषी कशाला दाखवील! बायकोला गुलामासारखी राबवून वर तिला मारहाण करण्याची व उपाशीही ठेवण्याची जर त्याला कायद्यानें मुभा आहे, तर तो तिला नांदवून कां घेणार नाहीं? त्याची खुषी दिसल्याबरोबर कोर्ट बाईला नवऱ्यापाशी नांदण्याचा हुकूम सोडून त्याला तिचा छळ करण्याचा एक प्रकारचा कायदेशीर हक्कच देते. बरें, या छळाला कंटाळून पोटगीची पर्वा न करतां ती जर घराबाहेर पडली तर तिचे हाल कुत्रासुद्धां खात नाहीं. गृहत्याग करणारी म्हणून समाज तिला नाहीं नाहीं तीं दूषणें लावतो. कसा झाला तरी देवब्राह्मणअग्निसमक्ष पदराशीं गांठ पडलेला नवरा तो! त्यानें किती हाणलें, मारले, तरी खऱ्या पतिव्रतेनें ते मुकाट्याने सोसून त्याची सेवाशुश्रूषा करण्यांतच जन्म काढला पाहिजे. मनुस्मृतीनें सांगूनच ठेवलें आहे कीं,

**विशीलः कामवृत्तो वा गुणैर्वा परिवर्जितः।**
**उपचर्यः स्त्रिया साध्व्या सततं देववत्पतिः ॥**

असें न वागतां, पतीला जी सोडून जाते ती स्त्री खात्रीनें वाईट चालीची असली पाहिजे असा शिक्का तिच्या कपाळी मारून समाज मोकळा होतो. खुद्द तिचे बापभाऊ एकदां लग्न लावून देऊन टाळून टाकलेली ही ब्याद पुन्हां जन्मभर विनाकारण गळ्यांत घेण्यास तयार नसतात. "हत्ती पोसवतो पण लेक पोसवत नाहीं" अशी म्हणच पडली आहे. आमच्या समाजाला लागलेल्या बालविवाहाच्या घोर शापामुळे अर्थार्जनाची पात्रता स्त्रियांत नसतेच. मग अशा वेळीं त्या अगतिक बालेनें काय करावे? तसेच निलाजरेपणानें माहेरीं डोकें देऊन राहाणें तिला प्राप्त होतें. मरें मरेतों कामें उपसून ओशाळगतीचा तुकडा तिला अपमानाच्या अश्रूंबरोबर गिळावा लागतो. दोन पोटचे गोळे असले तर त्यांपासून बिचारीला कांहीं सुखसमाधान मिळण्याचें तर लांबच राहिलें, उलट त्यांचे होणारे हाल व दैन्य पाहून आंतडें जास्तच पिळवटून निघतें; किंवा निर्दय नवऱ्यानें कायदेबाजपणानें अपत्यांवर आपली कायदेशीर

मालकी प्रस्थापित करून त्यांना आपल्या ताब्यांत घेतल्यास बिचाऱ्या परित्यक्तेचा जीव, काळजाचे तुकडे तोडून काढल्यासारखा तडफडतो.

बरें, या परावलंबी जिण्याला कंटाळून एकादीनें धिटाईनें चार अक्षरें शिकून, किंवा एकादी कला अवगत करून घेऊन आपल्या पायावर उभें राहण्याचा व स्वतंत्रतेचें सुख भोगण्याचा प्रयत्न केलाच, तर आमचे समाजकंटक तिची नाना तऱ्हेनें छळणूक करण्यास तयार असतातच. तिची विनाकारण नालस्ती करून, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष तिला हवा तसा त्रास देऊन तिच्या दुःखी जीवनांत कांटे पसरण्यांत त्यांना ब्रह्मानंद वाटत असतो. इतकेंही करून तिच्या स्वकष्टार्जित मिळकतीवर तिचा कायदेशीर हक्क नसतोच. पतिदेव त्यांना गरज लागेल, तेव्हां अकस्मात् उपस्थित होऊन तिच्यावर व तिच्या मिळकतीवर कायदेशीरपणे हक्क सांगू शकतात. मग अशा धोक्याच्या व अनिश्चित जीवनांत बिचाऱ्या परित्यक्तेला कसलें सुख लागणार ?

याप्रमाणें परित्यक्ता नाना प्रकारचे छळ आणि दैन्य कंठीत असतां, तिच्या दुर्दशेला जबाबदार असलेल्या नवरोबाचे मात्र काडीइतके वाईट होत नसतें. तो खुशाल बाशिंग बांधून नवा संसार राजरोस थाटण्याची तयारी करतो. आमचा—निर्लज्ज म्हणा वा गरजू म्हणा—समाज अशा नरपुंगवांना आपल्या मुली उघडया डोळयांनीं कधी कधी वरती वरदक्षिणा देऊनही खुशाल देतो व पुरुषांचे संसारचक्र बिनबोभाट सुरू होतें. काय हा अन्याय व पक्षपात! असा कायदेशीर निर्दयपणा फक्त आपल्या हिंदुस्थानांत हिंदु समाजांतच आहे. देशोदेशी व हिंदुस्थानांतही मुसलमान-ख्रिश्चनादि लोकांत स्त्रियांना जास्त सवलती दिल्या जातात.

युरोपीय देशांमध्यें स्त्रियांना विवाहविच्छेदाची सवलत सर्वत्र आहेच; पण मागसलेल्या म्हणून ठरलेल्या आशियामध्यें सुद्धां किती तरी राष्ट्रांत विवाहविच्छेद रूढ आहे. चिनी लोकांत सात कारणांवरून घटस्फोट घेता येतो. संतति नसणें, अतिरिक्त विषयासक्तता असणें, स्त्रीनें नवऱ्याच्या आईबापांचा योग्य मान न ठेवणें, वावदूकता, चोरटेपणा, वाईट स्वभाव, अशक्तता हीं तीं सात कारणें. जपानमध्येंही घटस्फोटास पूर्ण मोकळीक आहे. ब्रह्मदेशांत बौद्धधर्मीयांमध्यें विवाह म्हणजे एक करार मानला जातो व घटस्फोटाची दोन्ही पक्षांस मोकळीक आहे. नवरा फार दरिद्री व योगक्षेम

चालवण्यास असमर्थ असला तर; आळशी, लंगडा, सदा रोगी, किंवा म्हातारपणामुळें दुबळा झाला असला तर, बायकोला घटस्फोट मागतां येतो. पुरुषाला सुद्धां बायकोला मुलगे नाहींत, नवऱ्यावर करावें तसें प्रेम करीत नाहीं, नवऱ्याच्या इच्छेविरुद्ध दुसऱ्यांच्या घरीं जाते व मित्रांच्या भेटी घेते या सबबीवर काडीमोड करतां येते. ज्य् लोकांमध्यें प्रथम दोन्ही पक्षांची संमति असल्याशिवाय विवाह कायदेशीरच ठरत नाहीं; नंतर रोमन लोकांच्या चालीप्रमाणें स्त्रीला खालील कारणांनी घटस्फोट मागण्याचा हक्क पोंचतो. हटवादी स्वभाव, धर्मांतर, अतिरिक्त दुर्वर्तन, पोसण्यास नाखुषी, वाईट वागवणें, एकादा गुन्हा करून देशत्याग करणे, घाणेरड्या रोगानें पछाडलेला असणे, घाणेरडा धंदा असणे. (मात्र या यादीत व्यभिचाराचा उल्लेख नाहीं हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.)

खुद्द हिंदुस्थानांत शिक्षणाचा अभाव, पडदा, वगैरे बाबतीत मुसलमान स्त्रीसमाज हिंदु स्त्रियांपेक्षां मागसलेला असला तरी विवाहसंस्थेत त्यांना पुष्कळच जास्त सवलती हिंदु स्त्रियांपेक्षां मिळतात. मुसलमान लोकांत लग्न हा एक उभयपक्षीं केलेला करार समजला जातो; अर्थात् दोन्ही पक्षांच्या मर्जीप्रमाणें तो वाटेल तेव्हां रद्दही करतां येतो. बहुपत्नीकत्व कायद्यानें मान्य केलें आहे. वयांत असलेल्या प्रत्येक मुसलमानास चार बायका करण्याचा हक्क कुराणानें दिलेला आहे. ही गोष्ट सकृद्दर्शनी चमत्कारिक वाटली तरी तिच्या मागचा इतिहास पाहिला असतां महंमद पैगंबरनें चार बायकांची मर्यादा घालून दिली ही मोठी सुधारणा केली असेंच म्हणावें लागेल; कारण महंमदापूर्वी प्रत्येक मुसलमान वाटेल तेवढ्या बायका करी; त्या अजस्र जनानखान्यांना आळा घालण्याचें श्रेय महमद पैगंबराला दिलें पाहिजे. मुसलमानी कायद्याप्रमाणें विवाहाला वधूवरांची दोघांची संमति लागते. फसवून किंवा जबरदस्तीनें एकाद्या पक्षाची संमति घेतली होती असें मागून सिद्ध झाल्यास विवाह रद्द होतो. जर वधूवरांपैकीं एकादा अज्ञान किंवा वेडा असला तर पालकाची संमति असली पाहिजे. पित्याची किंवा आज्याची संमति घेऊन लग्न लागलें असल्यास तें अज्ञानावर बंधनकारक आहे. पण पालकानें फसवणूक केली व अज्ञानाला नुकसानकारक संबंध घडवून आणला असें मागून आढळून आल्यास आज्ञानाला स ज्ञान झाल्यावर विवाह रद्द करून घेण्याचा हक्क आहे. कायदे-

शीर लग्न झाल्यानंतर स्त्रीला पतीकडून शुल्क घेण्याचा हक्क आहे. हें किती असावें याबद्दल कांहीं नियम नाहीं, पण १० दिह्राम (Dirms) किंवा १०७ रुपये कमींत कमी ते असलें पाहिजे.

मुसलमान स्त्रीला घटस्फोट घेण्याचा हक्क आहे. मुसलमानी शास्त्राप्रमाणें घटस्फोट तीन प्रकारचा आहे. पहिला म्हणजे नवऱ्यानें आपल्या लहरीवर कोर्टाची मदत न घेतां दिलेला. दुसरा म्हणजे, पतिपत्नीच्या उभयपक्षीं संमतीनें, पण कोर्टाच्या मदतीशिवाय घेतलेला, व तिसरा म्हणजे बायकोनें कोर्टांत जाऊन नवऱ्याकडून कायदेशीर रीतीनें घेतलेला. पहिल्या प्रकारच्या घटस्फोटाला तलाक, दुसऱ्याला मुबारत व तिसऱ्याला खुला अशा संज्ञा आहेत. तलाक फारच बेछूट व मौजेचा आहे. बायको हजर नसतांना सुद्धां 'तलाक' असें तीन वेळां नवऱ्याने म्हटलें की लग्न मोडते. 'इद्दत्'चा तीन महिन्यांचा काळ लोटला की घटस्फोट पूर्ण झाला. (ही मुदत स्त्री गरोदर आहे किंवा काय हें निश्चित करण्यासाठी घातलेली आहे.) कधीं कधीं लग्नापूर्वी स्त्री "तुझ्याकडून अमुक गोष्ट घडली तर मी घटस्फोट करीन" असा नवऱ्याशीं करार करते व त्या करारावर तशी गोष्ट घडून आल्यास (उदा० दुसरी बायको करणें) तिला घटस्फोट करून घेतां येतो. याला मुबारत म्हणतां येईल. 'खुला'-मध्यें स्त्रीला नवरा कांहीं कारणानें नकोसा झाला किंवा आवडत नाहींसा झाला तर प्रथम त्याला ती घटस्फोट देण्यास सांगते. अशा वेळी 'शुल्का' पैकीं कांहीं भाग ती स्वखुषीनें परत करते, नवरा तयार असल्यास घटस्फोट होतो.

खुला व मुबारत या दोन्हींमध्यें बायकोला प्रायः, शुल्काची रक्कम परत करावी लागते. मात्र 'इद्दत्' (Iddat) च्या काळांत नवऱ्यानें तिला पोसलें पाहिजे व स्वतःपासून तिला झालेल्या मुलांना पोसण्याची जबाबदारीही घेतली पाहिजे.

'इद्दत्'ची मुदत संपल्याबरोबर स्त्री दुसरें लग्न करण्यास मोकळी होते. तिनें दुसरें लग्न न केल्यास पांच वर्षांपर्यंत मुलाची व मुलगी वयांत येईपर्यंत मुलीची ती कायदेशीर पालक ठरते. दुसरें लग्न तिनें केल्यास मात्र मुलांचें पालकत्व बापाकडे जातें. वयांत आल्याबरोबर अज्ञानपणीं झालेलें लग्न पसंत नसल्यास मोडून टाकण्याचा हक्क प्रत्येक मुसलमान स्त्रीस आहे; मात्र नवऱ्याशीं संबंध घडण्यापूर्वी तिनें घटस्फोटाबद्दल कोर्टाकडे अर्ज केला पाहिजे.

वरील त्रोटक माहितीवरून मुसलमान स्त्रीला लग्न व घटस्फोट या बाबतींत किती पुष्कळ स्वातंत्र्य आहे हें दिसून येईल. पारशी व ख्रिस्ती स्त्रियांनाही या सवलती भरपूर आहेत.

पारशी लोकांत, इंग्रजी अंमलापूर्वी १८६५ पर्यंत, विवाहविषयक स्वतःचे असे व्यवस्थित कायदे नव्हते. हिंदु समाजांत राहात असल्यामुळें हिंदु लोकांच्याच विवाहविषयक चालीरीति व बहुपत्नीकत्वासारख्या रूढि स्वीकारण्याकडे त्यांचा कल असे; पण १८६५ मध्यें सर्व पारशांनीं बंधनकारक असा एक लग्न व घटस्फोटविषयक कायदा पास करून घेतला; त्या वेळच्या इंग्रजांच्या घटस्फोटविषयक कायद्याप्रमाणेंच याही कायद्याचें स्वरूप होतें. या कायद्यानें बहुपत्नीकत्व हा गुन्हा ठरवला. पुढील अटींवर उभयपक्षाला लग्नविच्छेदाची मोकळीक मिळाली: स्त्रीनें व्यभिचार केला तर नवऱ्यास घटस्फोट मागण्याचा हक्क प्राप्त होतो. तसेंच नवरा व्यभिचारी असला (मात्र हें परस्त्रीगमन असलें पाहिजे, नुसतें वेश्यागमन नव्हे) किंवा वेश्यागमनी असून दुसरें लग्न केलें किंवा व्यभिचारी व मारहाण करणारा असला व दोनहून जास्त वर्षें स्त्रीला टाकून दिलें असलें तर स्त्रीला घटस्फोट मागण्याचा हक्क पोंचतो. लग्नविच्छेदानंतर मुलाचें पालकत्व निर्दोषी पक्षाकडे जातें, त्यांचा खर्च मात्र नेहमीं बापालाच द्यावा लागतो.

लग्नविच्छेदाशिवाय खालील दोन परिस्थितीत लग्न रद्द करून घेण्याचा हक्क पारशी स्त्रीपुरुषांस आहे; एक वधू किंवा वर वेडा असेल तर, किंवा वर तृतीयपुरुषी असेल तर.

हिंदी ख्रिश्चन स्त्रियांनाही घटस्फोटाची सवलत आहे. प्रथम तर बहुपत्नीकत्वाची कायद्यानें बंदी आहे. लग्नविच्छेद १८६९ च्या हिंदी घटस्फोटाच्या कायद्याअन्वयें करतां येतो. हा कायदा त्या वेळीं इंग्लंडांत तद्विषयक अंमलांत असलेल्या कायद्याप्रमाणेंच जवळजवळ आहे. व्यभिचार (अपात्रीं गमन), व्यभिचार व द्विभार्यत्व, बलात्कार, विकृतगमन, पशुतुल्य वृत्ति व या शेवटच्या त्रयीच्या जोडीला द्विभार्यत्व असेल तर स्त्रीला नवऱ्याकडून घटस्फोट मागतां येतो. १९२३ मध्ये नुसत्या व्यभिचारावर स्त्रीला नवऱ्यापासून घटस्फोट घेण्याचा इंग्लंडमध्यें मिळालेला हक्क हिंदी ख्रिश्चन स्त्रियांना अद्याप मिळाला नाहीं. घटस्फोटानंतर आई ही मुलीची कायदेशीर वारस ठरूं शकते.

बडोदे संस्थानांतील घटस्फोटाचा कायदा Indian Divorce Act हून बराच सोपा व सुलभ आहे. पुढील कारणांवरून उभयतां नवराबायकोस घटस्फोट मागण्याचा हक्क पोचतोः—( १ ) सात वर्षें नाहींसा होणें, ( २ ) संन्यासाश्रम घेणें, ( ३ ) धर्मांतर, ( ४ ) क्रौर्य, (५) तीन वर्षे शरीरसंबंध न ठेवणें ( योग्य वैद्यकीय कारण नसतांना ), (६) मादक द्रव्यांच्या सेवनानें संसार चालवण्यास असमर्थ होऊन तीन वर्षें लोटलेली असणे, (७) व्यभिचार.

खालील आणखी दोन कारणांवरून बायकोला नवऱ्याकडून घटस्फोट मागतां येतोः—

(१) नवरा लग्नाच्या वेळी किंवा दावा लावण्याच्या वेळीं नपुंसक असल्यास, (२) नवऱ्याची वागणूक अनैसर्गिक व विकृत असल्यास.

पुढील कारणांवरून उभयतांस लग्न रद्द करून घेतां येते :—

( १ ) रक्तपितीसारखा घाणेरडा रोग असणे, (२) बहिरेपण, (३) मुकेपणा, ( ४ ) अंधळेपणा, ( ५ ) वेड लागणे, ( ६ ) विक्षिप्तपणा, (७) भिन्न धर्म. हे दोष किंवा बाबती लग्नाच्या वेळी वधूवरांच्या अंगीं असून त्या छपविल्या गेल्या असे सिद्ध झाले व त्यावर नंतर इलाजही चालण्यासारखा नसेल तर लग्न न्यायमंदिरांतून रद्द करून घेतां येते. त्याचप्रमाणे बालविवाह-प्रतिबंधक कायदा मोडून आठ वर्षांच्या आंतील मुलीचे लग्न लावलें असेल तर ते रद्द होते. तसेच हिंदु मॅरेज ॲक्टखाली मना केलेल्या जवळच्या शरीरसंबंधीयांत लग्न लागले असेल, लग्नांत जबरदस्ती अथवा फसवाफसवी झाली होती असे सिद्ध झाले तर, लग्न कायद्यानें रद्द करून घेतां येतें.

पुढील कारणांवरून उभयतांस कायदेशीर रीत्या दूर सरतां येते. (Judicial Separation). :—

( १ ) धर्मांतर, ( २ ) क्रौर्य, ( ३ ) मादक द्रव्यांचे सेवन, ( ४ ) व्यभिचार, ( ५ ) घाणेरडा रोग, ( ६ ) पटत नसल्यामुळे शरीरसंबंध तीन वर्षें सतत न ठेवणें ( ७ ) लग्नानंतर सतत तीन वर्षे वेड लागलेलें असणें व नंतर तें असाध्य ठरणें, ( ८ ) पुनर्लग्न.

शिवाय बायकोला नवऱ्याच्या अनैसर्गिक वागणुकीबद्दल नवऱ्यापासून **Judicial Separation** मागतां येते.

वरील कलमांवरून बडोदें संस्थाननें अत्यंत प्रगमनशील स्वरूपाचा न्याय्य

व निःपक्षपाती असा घटस्फोटाचा कायदा पास करून ब्रिटिश हिंदुस्थानावर आघाडी मारली आहे असें दिसून येईल.

याप्रमाणें मुसलमान, ख्रिस्ती व पारशी समाजांतील स्त्रियांना व बडोदें सस्थानांतील प्रजाजनांना विवाह व विवाहविच्छेद या बाबतींत मिळणाऱ्या सवलती पाहून एकंदर हिंदु समाज या गोष्टींत किती मागसलेला आहे हें लक्षांत येईल. आतां कोणी असें म्हणतील की, ब्राह्मणेतर जातींत काडीमोड अथवा सोडचिठ्ठी देणें सर्‍हा रूढ आहे. पण सर्वांत उच्च मानली जाणारी जी ब्राह्मणाची जात तिच्यांत काडीमोड रूढ नाहीं, म्हणून खालच्या जातींतही मोडचिठ्ठी घेणें कमीपणाचे समजतात. हा प्रकार इतर बाबतींतही आपणांस आढळून येतो. उच्च जातीत गोषाची चाल उत्तर हिंदुस्थानांत आहे, म्हणून कनिष्ठ जातीही जरा बरे दिवस आले कीं उच्च जातीची बरोबरी करण्यासाठीं आपल्या बायकामुली गोषांत ठेवूं लागले. याचप्रमाणे एकंदर हिंदु समाजांत पाटाची बायको, सोडचिठ्ठी घेतलेली बाई यांच्याकडे वक्र दृष्टीनें पाहण्याची प्रवृत्ति बळावली. वर्णश्रेष्ठ ठरलेल्या ब्राह्मणांनी विवाहविच्छेद रूढ करून त्या चालीला मान्यता दिल्याशिवाय विवाहविच्छेद शिष्टसंमत होणार नाहीं.

परंतु ब्राह्मणांचा विवाहविच्छेदाला तीव्र विरोध आहे. पूर्वी एका· प्रकरणांत पाहिल्याप्रमाणे, जरी अथर्ववेदांत, ख्रिस्तशकापूर्वी ४०० ते इ. स. १०० पर्यंत लिहिलेल्या धर्मसूत्रांत कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत व पराशरस्मृतींतील ‘नष्टे मृते’ या प्रसिद्ध श्लोकांत स्त्रीच्या पुनर्लग्नाचा उल्लेख सांपडतो व त्यावरून विवाहविच्छेद ख्रिस्ती शक सुरू होण्याच्या कालापर्यंत रूढ होता, असें दिसतें, तरी आमचे ब्राह्मण इ. स. २०० ते १२०० पर्यंत लिहिल्या गेलेल्या धर्मशास्त्रांतील वचनांनाच चिकटून बसून विवाहविच्छेद अनुच्चारणीय व त्याज्य समजतात. त्यांच्या मते विवाह हा हवा तेव्हां उभय पक्षांच्या लहरीनें मोडणारा करार नसून, एक पवित्र संस्कार आहे. “Those whom God hath put together, let no man put asunder.” या रोमन कॅथॉलिक घोषणेप्रमाणे, लग्नगांठी ब्रह्मदेवानें घातल्या आहेत व आयुष्याची दोरी तुटली तरी लग्नगांठ कांचत नाहीं असें सनातनी मानतात. विवाहाची ही कल्पना फार उदात्त आहे यांत शंका नाहीं. निव्वळ शारीरिक सुखाच्या मलिन कल्पनेपेक्षां, विवाह हा वंशवृद्धीसाठीं कामशांतीबरोबरच धर्म, अर्थ व

मोक्षप्राप्तीसाठी असतो, या कल्पनेंतील भूमिका जास्त उच्च व ग्राह्यतर नाहीं असें कोण म्हणेल? पण या सनातनींना एवढाच प्रश्न करावासा वाटतो कीं, या उच्च कल्पनेप्रमाणें फक्त स्त्रियांनींच वागावें असा आग्रह व पक्षपात कां? विवाहविधि समंत्रक वधूवर ही दोघे आचरतात; मग वधूच्या बाबतींत तो वज्रलेप होतो आणि वर मात्र "धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि।" अशी एका वधूपाशीं देवब्राह्मण, अग्निसमक्ष घेतलेली शपथ खुशाल मोडून प्रथम-पत्नी मृत झाल्यावर किंवा ती जिवंत असतांनासुद्धां दुसऱ्या वधूपाशीं तीच शपथ व तोच संस्कार पुन्हां आचरतो; हा भेदभाव कां? पुरुषानें क्षुल्लक कारणावरून किंवा विनाकारणही पहिल्या बायकोला खुशाल कोपऱ्यांत बसवून दुसरे लग्न करावे! कायदा किंवा समाज एका शब्दानेंही त्याला जाब विचारीत नाही. फार फार तर कोर्टांत दाद मागण्याची निर्लज्ज धिटाई पत्नीनें केलीच तर कायदा पोटगीचा तुकडा तिच्या तोडावर फेकवतो; पण बायकोला मात्र कुठल्याही सबबीवर नवऱ्याला सोडून जातां येत नाहीं; व एकादी पळवाट शोधून काढून ती नवऱ्याला सोडून गेलीच तरी दुसरा संसार कल्पांतींही तिला थाटतां येणें शक्य नाहीं. नवरा वेडा असो, कुष्टी महारोगी असो, अमंगळ व दुराचारी असो, पशुवत् मारहाण करणारा असो, सवती डोक्यावर नाचवणारा असो, कसाही असो, पत्नीला त्याला देव मानून त्याच्याच आश्रया-खालीं डोकें टेकून पडलें पाहिजे. अगदी प्राणावर येऊन ठेपलें, तरच तिला नवऱ्याच्या घराचा उंबरठा ओलांडण्याची व नंतर पोटगी मागण्याची पर-वानगी आहे. कायद्याला न पटणाऱ्या कारणामुळे मग ते कारण सारासार बुद्धीच्या दृष्टीने कितीही वाजवी असो,—ती घर सोडील तर नवऱ्याला तिच्या तोंडचें अन्न हिसकावून घेतां येते, व मग बिचारी स्त्री अनाथ ती अनाथ व वर 'नांदत नाही' म्हणून दुष्कीर्तीचा कलंक कपाळी लागून अगदींच अशरण होते! बिचाऱ्या स्त्रियांनी सनातनींचे काय एवढे घोडें मारलें आहे, कोण जाणें की ज्यामुळें त्यांनी पुरुषांना प्रत्येक बाबतींत सवलत देऊन, स्त्रीचा मात्र सर्व बाजूंनी कोंडमारा केला आहे! स्त्रीला व्यक्तिमत्व किंवा निव्वळ 'मानव्य' ही नसून ती केवळ एक 'वस्तु' आहे हीच भावना या पक्षपाताच्या मुळाशीं नाही काय? आणि स्त्रियांविषयींची ही हीन कल्पना

सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या सर्व हिंदूंना संमत आहे असेंच घटस्फोटाला अजूनही सर्वत्र होणाऱ्या विरोधावरून समजावयाचें ना? असो.

तेव्हां सनातनींना " विवाह हा एक पवित्र संस्कार आहे " ही आपली भूमिका सोडावयाची नसेल तर त्यांनीं स्त्री व पुरुष या उभयतांना त्या संस्काराचें पावित्र्य मानावयास व राखावयास भाग पाडलें पाहिजे. एकपत्नीत्वाची शपथ घेऊन पुरुषांनीं ती पत्नीच्या हयातीत व तिच्या मृत्यूनंतरही आजीव पाळली पाहिजे. असें होईल तरच आमच्या हिंदु विवाहाची कल्पना अत्यंत पवित्र व आध्यात्मिक स्वरूपाची आहे अशी शेखी हिंदूंना मिरवतां येईल. जर हें पुरुषांना कठिण व अव्यवहार्य वाटत असेल तर " विवाह हा एक करार आहे " अशी प्रांजलपणें भूमिका स्वीकारून स्त्रियांना विवाहविच्छेदाची व नंतर पुनर्लग्नाची सवलत दिली पाहिजे. नारळही पाहिजे व खोबरेंही पाहिजे,—विवाहसंस्थेच्या पावित्र्याची ऐट मिरवावयास पाहिजे, पण एकनिष्ठतेचें हजारों, लाखो बाला आचरीत असलेलें असिधाराव्रत टाळून " मनःपूतं समाचरेत् " चा परवानाही पाहिजे, असा बालिश व अरेरावीचा हट्ट कसा चालेल?

हें झालें सनातनीविषयी. आतां विवाहविच्छेदाचें तत्त्व पटलेल्या पण तो व्यवहारांत आला म्हणजे अनेक आपत्ती समाजापुढें उभ्या राहतील, असें प्रामाणिकपणें वाटणाऱ्या समाजसुधारकांचा विचार करूं.

हिंदु स्त्रियांच्या सुदैवाने अलीकडे बऱ्याच सुशिक्षित व समंजस स्त्री-पुरुषांना विवाहविच्छेदाची आवश्यकता पटत चालली आहे. नवऱ्याचें संरक्षण असून नसून सारखेंच झालेल्या अनन्यगतिक परित्यक्तांना घटस्फोटाचा मार्ग खुला करून देऊन, नवा संसार इच्छेनुरूप मांडण्याची त्यांना परवानगी देणें हें न्याय्य असून, असे न करणें निव्वळ माणुसकीला सोडून वागणें आहे असें पुष्कळांस वाटूं लागले आहे. पण अजूनही विवाहविच्छेद सर्रहा सुरू झाल्यास दोनतीन मोठे बिकट प्रश्न समाजापुढें येऊन पडतील या भीतीनें समाजसुधारकांस ग्रासून सोडलें आहे. प्रथम म्हणजे एकदां घटस्फोटाचा कायदा पास झाला की उठल्यासुटल्या घटस्फोट होऊन आणि प्रतिवर्षाला एक नवें लग्न लोक करूं लागून एक प्रकारचा कायदेशीर अनाचार माजेल, ही भीति. पाश्चात्य देशांत, विशेषतः अमेरिकेंत, जे विवाहविच्छेदाचे आंकडे

प्रसिद्ध होतात त्यांनीं छातीचा थरकांप होऊन "नको ते अनिष्ट सुधारणेचे प्रस्थ इकडे" असें सनातनी नसलेले लोकसुद्धां म्हणूं लागतात. दुसरें म्हणजे अशा विवाहविच्छेदानंतर घटस्फुटित विवाहांपासून झालेल्या संततीची जोपासना व योगक्षेम यांची काय वाट होईल याबद्दल दारुण चिंता समाजशास्त्रज्ञांना वाटते. तिसरा आक्षेप असा आणण्यांत येतो कीं, जोंवर स्त्री ही स्वतंत्रपणें अर्थोत्पादन करण्यास समर्थ नाही किंवा जोवर कायदेशीर रीत्या पित्याच्या वा इतर मालमत्तेवर तिचा वारसा हक्क पोचत नाहीं, तोंवर विवाहविच्छेदासारख्या सुधारणांनी हिंदु स्त्रीचें दैन्य दूर न होतां उलट तिची "हर हर न हिंदुर्न यवनः" अशी त्रिशंकूप्रमाणें जास्तच दुर्दशा होईल.

यांपैकीं पहिल्या आक्षपाचा प्रथम विचार करूं. पाश्चात्य देशांतील घटस्फोटाचे आंकडे भीतिजनक आहेत यांत शंका नाहीं. घटस्फोट हा अमेरिकेत तर केवळ एक पोरखेळ झाला आहे की काय असे घटस्फोटासाठीं पुढें करण्यांत आलेली कारणे ऐकून वाटते. स्वभाव जुळत नाहींत म्हणून घटस्फोट मागणें हें तर पुष्कळच रूढ आहे. पण एकदां एका बाईनें तर "जेवल्यानंतर दांत कोरायची नवऱ्यास संवय आहे, आणि तो दात कोरूं लागला कीं आपल्याला कसेसेच वाटते" या सबबीवर घटस्फोट मागितला होता व तिला तो मिळालाही! घटस्फोट इतका सुलभ झाला म्हणजे विवाहसंस्थेचें गंभीर स्वरूप अजिबात नाहींसे होऊन तो एक भातुकलीचा खेळच होऊन बसतो, हवा तेव्हां मोडावा व दुरडींत भरून ठेवावा; हवा तेव्हां, हवा तसा पुन्हां नवा मांडावा. लग्न असा पोरखेळ ठरला म्हणजे लग्न करतांना विवाहेच्छु स्त्रीपुरुषांना एकमेकांचें पटेल की नाहीं, परस्परांबद्दल वाटणारे आकर्षण तात्कालिक, केवळ ऐंद्रिय आहे कीं सखोल व दीर्घ काल टिकणाऱ्या भावनांवर आधारलेलें आहे हें अजमावून, विचारांती विवाहग्रंथि बांधण्याची जरूरी फारशी वाटणार नाहीं; कारण विवाहानंतर नाहीं पटलें, एकमेकांचा कंटाळा आलाच तर तावडतोब घटस्फोटाचा मार्ग खुलाच असतो! अशा तऱ्हेनें बेजबाबदारपणें लग्नें ठरवणें व नंतर घटस्फोट होणे हें समाजस्वास्थ्याच्या, कुटुंबसंस्थेच्या स्थैर्याच्या आणि अशा प्रत्येक विवाहापासून झालेल्या संततीच्या जोपासनेच्या दृष्टीनें अत्यंत विघातक आहे यांत शंका

नाहीं. खुद्द अमेरिकेतही बऱ्याच लोकांना ही गोष्ट आतां पटली असून घटस्फोटाचा दरवाजा असा सताड उघडा न ठेवतां त्याला कांहीं अडसर घालावा असा प्रयत्न युनायटेड स्टेट्सपैकी कांहीं स्टेट्समध्यें होत आहे.

यूरोपमध्येही घटस्फोट फार सुलभ किंवा स्वस्त नाही. इंग्लंडमध्यें तर काडीमोडीसाठीं कोर्टांत लागणाऱ्या अवास्तव खर्चामुळे घटस्फोट ही केवळ श्रीमंतांची चैनीची वस्तु आहे असें मानण्यांत येतें. तेथें होणाऱ्या घटस्फोटांची संख्याही कमी असून, ते फक्त अगदीं वरच्या किंवा अगदीं खालच्या दर्जाच्या लोकांत होतांना आढळतात. प्रतिष्ठित व सुखवस्तु अशा मध्यम वर्गांत घटस्फोट घेणे ही व्यक्तीच्या कुलशीलाला व समाजांतील दर्जाला कमीपणा आणणारी गोष्ट आहे असेंच मानतात. जानेवारी १९३८ मध्यें इंग्लंडांत घटस्फोटाचे सौकर्य कमी करून त्याची खरी उपयुक्तता वाढवणाऱ्या कित्येक सुधारणा त्या कायद्यांत करण्यांत आल्या. लग्न झाल्यापासून तीन वर्षेंपर्यंत घटस्फोट मागतां येऊं नये; असाध्य रोग, वेड, इत्यादि व्यथा योग्य उपचार बराच काल होऊनही खरोखरीच असाध्य ठरेपर्यंत, त्या सबबीवर घटस्फोट न मिळणें इत्यादि सुधारणांनी इंग्लंडमध्यें घटस्फोटाचा कायदा बराच रास्त, उपयुक्त व नेमस्त असा झाला आहे.

हिंदुस्थानांतही अशा नेमस्त स्वरूपाचा घटस्फोटाचा कायदा पास झाल्यास तो समाजाला व कुटुंबाला विघातक न होतां, परिणामी प्रगतिकारक आणि सुखमय असाच होईल. हिंदु स्त्रियांना घटस्फोटाची सवलत न देणें हा खरोखर अमानुष निर्दयपणा आहे असें आपल्याकडील बालविवाहाची पद्धत लक्षांत घेतां प्रत्येक विचारवंत व समंजस माणसास कबूल करावें लागेल. नवरा या शब्दाचा पुरा अर्थ समजण्यापूर्वीच ज्या बालिकेची एका अनोळखी माणसाशीं विवाहग्रंथि बांधण्यांत येते तिनें पुढे ही ग्रंथि भयंकर जाचक होऊं लागली तरी ती सोडण्याचा प्रयत्न करतां कामा नये, असा तिच्यावर निर्बंध घालणें अन्याय्य व अमानुष नाहीं काय? पाश्चात्य देशांत मुली लग्नांत मोठ्या असतात. त्यांचें हिताहित त्यांना कळत असतें. त्यांचा सहचर त्या आपल्या आवडीनिवडी, स्वभाव, शील पारखून सहवासोत्तर निवडतात. इतकें असूनसुद्धां लग्न होऊन एकदां सहजीवनाची सुरुवात झाली, रुक्ष कटु कर्तव्यें, नीरस जबाबदाऱ्या यांची दैनंदिनी सुरू झाली, एकमेकांसाठीं

एकमेकांच्या आवडीनिवडी बाजूला सारण्याची वेळ आली कीं, प्रणयाच्या गुळमट गोष्टी बाजूला पडून तिखट झगड्याला सुरुवात होते, आणि त्याचा शेवट लग्नगांठ तोडून टाकण्यांत होतो. ही अवस्था स्वयंवर करूं शकणाऱ्या सुशिक्षित, समंजस, प्रौढ मुलींची; मग ज्याचे स्वभावशील तर बाजूलाच राहिलें पण पुरतें तोंडसुद्धां लग्नापूर्वी पाहिलें नाहीं, त्याच्या पदराशीं पडलेली गांठ प्राणावर बेतलें तरी प्राणांतींही सोडावयाची नाहीं असा आग्रह धरणें दुराग्रहाचें नाही काय ?

देवब्राह्मणांसमक्ष पवित्र मंत्रोच्चारपूर्वक वरिलेला वर सोडून दुसरा सहचर स्त्रीनें निवडणें हा अनाचार आहे असें सनातनींना वाटतें. सनातनींची नीतीची कल्पना अजब असली पाहिजे! आपल्याला कायावाचामनानें आवडत नसलेल्या क्रूर, दुराचारी, रोगी वा वेड्या नवऱ्यापाशीं मन मारून नांदत राहायचें ही नीति, आणि असें नरकवासाचें जिणें सोडून आपल्याला योग्य व प्रिय असा दुसरा सहचर निवडून त्याच्याशी आनदानें संसार करून समाजां-तील सौख्य व आनंद वाढवणें ही अनीति! सनातनीच्या नीतिअनीतीच्या अशा विपरीत कल्पना पाहून चीड येऊन एकादा समाजसुधारक जर असें म्हणाला कीं, "अशीं लग्नें हीच अनीति आहे" तर त्याला कोण दोष देईल ? खरोखर परस्परविरुद्ध स्वभावाच्या, विरुद्ध आवडीनिवडीच्या, एकमेकां-बद्दल तिटकारा वाटणाऱ्या पतिपत्नींनीं एकत्र राहून कुटुंबवर्धन करणें हा एक प्रकारचा कायदेशीर व्यभिचार आहे, असे विवाह ही आमच्या समाजाला लागलेली एक कीड आहे. वारांगना पैशासाठी वाटेल त्या हिडीस, अनाचारी, पशुतुल्य माणसाच्या सुद्धां सेवेला सादर होतात; तर विवाहित स्त्रिया स्वतःच्या पोटासाठी मुलांबाळांच्या पोषणासाठी लाचारीनें नकोशा झालेल्या माणसाशीं वर्षानुवर्षे पत्नीव्रत आचरतात. अशा समागमापासून झालेली संतति निरोगी शरीराची व निकोप मनाची निपजणें शक्य नाहीं, हें समजा-यला सुप्रजाजननशास्त्राचा अभ्यासच करायला पाहिजे असें नाहीं. जन्मानंतर ज्या घरांत आईबापांचे नेहमीं झगडे चाललेले असतात, जेथील वातावरण नेहमीं असमाधानाचें व त्राग्याचें असतें, अशा परिस्थितींत वाढणारीं मुलें कशीं निपजतील हें बालमानसशास्त्रावरील कुठलेंही पुस्तक वाचल्यास समजून येईल.

तेव्हां घटस्फोटानें अनीति माजून कुटुंबस्थैर्यास धक्का बसतो, मुलांची

आबाळ होते, असा आक्रोश करणाऱ्या सनातनींस पुन्हां एकवार विचारावेंसे वाटतें कीं, जेथें लग्न म्हणजे वर उल्लेखिल्याप्रमाणें केवळ शरीरविक्रय ठरतो तेथेही लग्न हा एक पवित्र आणि अभेद्य संस्कार आहे असाच हट्ट तुम्ही धरून बसणार काय? तसेंच ज्या विवाहसंबंधामुळे शरीरानें व मनानें रोगी अशी प्रजा उत्पन्न होते तो विवाहही मोडण्याला समाजस्थैर्याच्या सबबीवर तुम्हीं अडथळा करणें हें समंजसपणाला धरून आहे काय? "विवाह हा करार नसून संस्कार आहे; तो अत्यंत पवित्र असून वैषयिक तृप्ति हा त्याचा केवळ हेतु नसून समाजसमृद्धि व सुकुटुंबसंवर्धन हा त्याचा मुख्य उद्देश आहे" असें प्रामाणिकपणें मानणाऱ्या सनातनींनी तर वरील प्रकारच्या विवाहांचा विच्छेद करण्यास सुधारकांच्या पुढें सरसावलें पाहिजे; कारण अशा विषम प्रवृत्तींच्या जोडप्यांच्या विवाहानें कुटुंबसंस्थेची धुळधाण होते, समाजस्वास्थ्य बिघडतें व भावी पिढीवर अनिष्ट परिणाम होऊन राष्ट्राचें भवितव्य धोक्याचें होतें.

घटस्फोटानें अनीति माजेल, समाजाची घडी बिघडेल, या आक्षेपांचा याप्रमाणें विचार केल्यानंतर संततीच्या भवितव्याच्या दुसऱ्या मुद्द्याकडे वळूं.

संततीच्या भवितव्याचा प्रश्न प्रथमदृष्टया आणि विचारांतीही बिकट वाटतो खराच. Ethics of Feminism लिहिणाऱ्या प्रो. वाडियांच्या मतें ज्यांना मुलें आहेत अशा जोडप्यांनी घटस्फोटाचा विचार करणें अक्षम्य आहे. कारण घटस्फोटानें संततीचें अपरिमित नुकसान होतें ही गोष्ट सर्वसाधारण रीत्या खरी आहे यांत शंका नाही. मुलांना त्यांच्या संमतीशिवाय जगांत आणून सोडणाऱ्या आईबापांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडते. मुलांच्या योग्य वाढीला अनुकूल असें वातावरण व सुखसोयी घरांत व इतरत्र उपलब्ध करून देणें हें प्रत्येक आईबापाचें कर्तव्य आहे. शिवाय मुलांच्या योग्य वाढीला आई आणि बाप या दोघांच्या सान्निध्याची व देखरेखीची जरूरी आहे. केवळ आई किंवा फक्त बाप यांच्या देखरेखीखाली मूल वाढलें तर त्याची वाढ एकांगी होते. मुलांच्या अंगच्या कोमल व भावनात्मक सद्वृत्ति आईच्या वळणानें पोसल्या जातात; वीर व दणगट स्वरूपाच्या बुद्धिप्रधान सद्वृत्ति बापाच्या देखरेखीखाली योग्य अंग धरतात. अशी परिस्थिति असतांना घटस्फोट घडवून आणून मुलाला आई किंवा बाप पारखा करून

त्याची सर्वांगीण वाढ खुंटविण्याचा आईबापांना अधिकार असावा काय? कदापि नाही. परस्परांशीं पटत नसलें तरी मुलांच्या हितासाठीं आईबापांनीं प्रयत्नपूर्वक एकत्रच राहावें व घटस्फोटाचा विचारही मनांत आणूं नये.

सर्वसाधारणपणें अगदी रास्त दिसणाऱ्या या कोटिक्रमाला वर दिलेलें उत्तरच समाधानकारक ठरेल असें वाटतें. मुलांची सर्वांगीण वाढ होण्यास उभय पितरांचें सान्निध्य पाहिजे हे खरें. पण हे सान्निध्य हितकारक केव्हां होईल? आईबाप एकमेकांवर मनापासून प्रेम करून घरांत सुखशांति नांदवीत असतील तरच. आईबापांच्या रोजच्या खटक्यांत मुलें मूक किंवा बोलके साक्षीदार व न्यायाधीश होण्याची वेळ येत असेल तर मुलांना त्या सान्निध्याचा काय फायदा? जेथें आईबापांची मनमिळणी नीट झालेली नाही व त्यामुळे उभयतांत सतत संघर्षणाच्या ठिणग्या पडतात तेथल्या वातावरणांत मुलांची नीट वाढ होणें अशक्य आहे. अशा वेळीं घरांतील कलहांचे बीज जें आई-बापांचें सहजीवन तें घटस्फोटांत नाहींसें करून, मुलांभोंवतीं संतोषसमाधानाचें वातावरण निर्माण करणें हेच त्यांच्या वाढीला हितकारक आहे. अशा वेळीं एकांगी वाढीचा तोटा सोसण्यास तयार झालें पाहिजे; नाहीं तर मुलें अजिबातच दुर्वृत्त किंवा विकृत मनोवृत्तींचीं होतील. तसेंच एकादे वेळीं आई किंवा बाप दुराचारी, व्यसनी, पशुतुल्य वर्तन करणारे, रोगी किंवा वेडे असल्यास मुलांवर त्यांच्या सान्निध्याचा किती वाईट परिणाम होईल बरें! अशा वेळीं विवाहविच्छेद करून, दुर्वृत्त व दोषी असामीस मुलांपासून वेगळें काढणें हेंच समाजाचें व दुसऱ्या पितराचें कर्तव्य ठरणार नाहीं काय?

आतां राहिला मुलांच्या योगक्षेमाचा प्रश्न. जेथे विवाहविच्छेदाची सुधारणा कळसास जाऊन पोंचली आहे (जेथें उभयपक्षांच्या नुसत्या इच्छेवर घटस्फोट मिळतो), अशा रशियामधील याविषयक कायदा अनुकरणीय आहे. तेथें विवाहविच्छेदानंतर त्या विवाहापासून झालेल्या संततीच्या पोषणाचा भार दोघांना—आई व बाप यांना—आपल्या मिळकतीच्या प्रमाणांत सोसावा लागतो व मुलें सरकारच्या ताब्यांत जातात. हिंदुस्थानांत सरकार हें बेवारशी किंवा सर्वच मुलांचें अक्षरशः 'मायबाप' होण्याला किती वर्षे लागतील; किंबहुना सरकारनें मुलांचें संगोपन, पालनपोषण करणें ही कल्पनाच कुटुंबसंस्थाप्रिय हिंदु समाजाला कधीं तरी मानवेल किंवा नाहीं हें आतां कांहींच सांगतां येणें

शक्य नाही. तेव्हा मुलांचे पालकत्व आईबापांपैकी कुणाकडे असावें याचा विचार विवाहविच्छेदाचा कायदा करतांना केला पाहिजे.

साधारणपणे हें सयुक्तिक दिसतें की, विवाहविच्छेदाच्या खटल्यांत जो पक्ष दोषी ठरविला जाईल (रोगी, व्यभिचारी, व्यसनी, वेडा वगैरे) त्याच्याकडून मुलांचे पालकत्व काढून घ्यावे; निर्दोषी व्यक्तीने मुलांचे पालन करावें व दोषी व्यक्तीने मुलांचा खर्च द्यावा, ही अत्यत स्तुत्य व इष्ट पद्धत अनेक अन्य समाजांत रूढ आहे. पण हें एकांगी व अन्यायाचे वाटत असल्यास दोन्ही पक्षांनीं योग्य प्रमाणांत खर्च सोसावा ही व्यवस्था समंजसपणाची व न्याय्य वाटण्यास हरकत नाहीं. अर्थात् सध्यांच्या हिंदु स्त्रीच्या मागसलेल्या परिस्थितींत अर्थोपार्जनाला बव्हंशी असमर्थ असल्यामुळे मुलांच्या जोपासनेचा आर्थिक भार सर्वस्वीं पुरुषावरच पडेल,—मग तो दोषी पक्ष असो वा निर्दोषी पक्ष असो—पण त्याला इलाज नाही! अनेक वर्षे अबाधितपणे भोगलेल्या सर्वाधिकाराची ही प्रतिक्रिया आहे असे समाधान मानून घेऊन, पुरुषवर्गानें स्त्रीशिक्षण वाढवण्याचा व स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य मिळवून देण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे त्यांच्या खांद्यावरचे जू हळुहळू हलके होईल. स्त्रीचा पक्ष निर्दोषी ठरल्यास मुलांचे पालकत्व स्त्रीला देण्याची सोय हिंदु कायद्यांत केली पाहिजे. हल्लींच्या कायद्याप्रमाणे स्त्री ही मुलांची कायदेशीर पालक ठरू शकत नाहीं. पुरुषांनी केलेल्या एकतर्फी अनेक कायद्यांपैकीच हा एक! माडखोलकरांच्या 'भगलेल्या देऊळांत' या प्रश्नाचें स्वरूप अत्यंत हृदयस्पर्शी रीतीनें रेखाटलें आहे. जो पिंड आईच्या हाडामांसारक्तापासून बनला व जन्मानंतर वर्षभर आईच्या जीवनावर जगला व वाढला, त्याच्या कायदेशीर पालकत्वाला आई कायद्यानें नालायक ठरावी! स्त्री ही व्यक्ति नव्हे, समाजाचा घटक म्हणून तिला स्वतंत्र अस्तित्व नाही, ती फक्त एक दुसऱ्याच्या मालकीची वस्तु आहे, ही भावनाच असल्या सगळ्या कायद्यांच्या मुळाशी आहे. अनेक परिषदा व समित्यांच्या मुखांनी स्त्रिया पालकत्वाच्या या कायदेशीर हक्काची मागणी करीत आहेत व तो हक्क त्यांना मिळणे घटस्फोटाच्या कायद्याच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे.

आतां कोणी असे म्हणेल कीं, "स्त्री ही अडाणी व संसारांतील व बाहेरच्या जगांतील व्यवहाराविषयीं अगदीं अननुभवी असल्यामुळें तिच्याकडे

हिंदु कायदा मुलाचे पालकत्व देत नाही हे अगदी रास्त आहे." असे म्हणणे म्हणजे निर्दयपणानें केलेल्या व्रणांच्या शारीरिक दुःखाला वर अपमानाच्या मानसिक दुःखाचें मीठ चोळणे आहे. एकाद्याचा पाय आधीं आपणच तोडून टाकावा व नंतर त्याला चालतां धांवतां येत नाही म्हणून त्याला हिणवावें, त्याचा अपमान करावा त्यापैकींच हा प्रकार आहे! स्त्रिया अडाणी व व्यवहार-शून्य कां राहिल्या? पुरुषांनीच त्यांना शतकांनुशतके चूलमुलाच्या कोंडींत कोंडून ठेवलें आहे म्हणूनच ना? संधीचा पूर्ण अभाव असूनही कालिदासानें म्हटल्याप्रमाणें 'अशिक्षितपटुत्वानें' स्त्रिया वेळ पडली तर व्यवहार योग्य रीतीनें सांभाळतात; मग योग्य शिक्षण व संधि मिळाल्यास त्या पुरुषांइतक्या व्यवहारज्ञ होणार नाहींत असें कसें म्हणतां येईल?

घटस्फोटाविरुद्ध तिसरा आरोप म्हणजे स्त्री सर्वस्वी परावलबी असल्या-मुळे घटस्फोट घेऊं शकणारच नाही; घेतल्यास ती अगतिक होईल हा. "पिता रक्षति कौमारे" वगैरे मनुप्रभृतींचा आवडता कोटिक्रम. याला उत्तर वर आलेंच आहे. योग्य शिक्षण व योग्य संधि मिळाल्यास स्त्रिया स्वावलंबी होतील आणि केवळ पोटासाठीं अप्रिय लग्नाच्या बेडींत जखडून पडण्याचा अनवस्था प्रसंग त्यांच्यावर येणार नाही. स्त्रीला तिच्या पित्याच्या मालमत्तेंत कांहीं अंश मिळणें याच कारणांसाठीं जरूर आहे. मुसलमानी कायद्याप्रमाणे मुलीला पित्याच्या मालमत्तेंत मुलाच्या एकतृतीयांश हिस्सा मिळतो. देश-मुखांच्या स्त्रियांच्या वारसा हक्काच्या बिलांत या स्वरूपाचें कलम होतें. पण हिंदु स्त्रियांच्या दुर्दैवानें सिलेक्ट कमिटीच्या चाळणींतून ते विधिमंडळापर्यंत पोंचूं शकलें नाहीं. यासाठी पुन्हां एकवार खटपट होणें जरूर आहे. ठिक-ठिकाणच्या विधिमंडळांतील स्त्रीप्रतिनिधींनीं या प्रश्नाला पुन्हां एकवार चालना दिली पाहिजे. स्त्रीला स्वतःची अशी कांहीं थोडी मालमत्ता असल्या-शिवाय व स्वतंत्र अर्थोत्पादनाची पात्रता तिच्या अंगीं असल्याशिवाय, हिंदु स्त्रियांचा कुठलाच प्रश्न समाधानकारक रीत्या सुटणें शक्य नाहीं. "तण्डुलाः प्रस्थमूलाः।" पैसा हा सगळ्या गोष्टींच्या मुळाशीं आहे; त्याची किल्ली जोंपर्यंत पूर्ण मालकी हक्कानें स्त्रियांच्या हातीं आली नाहीं, तोंवर निरनिराळ्या विवाहविषयक वगैरे कायद्यांचे कागदी घोडे नाचवणें परिणामीं व्यर्थ ठरणार आहे. असो.

शिवाय " स्त्रिया परावलंबी असल्यामुळे त्यांनी घटस्फोट घेऊन अनाथ होणे इष्ट नाही. त्या अडाणी असल्यामुळे पुरुषाच्या मदतीशिवाय त्यांना मुलांचें पालन योग्य रीत्या करतां येणें शक्य नाहीं," असा युक्तिवाद लढवणाऱ्या सनातनीना असा सवाल करतां येईल कीं " हा सगळा सुविचार विधवांचा प्रश्न निघाला म्हणजे कुठें जातो? " 'कंगाल नवऱ्याच्या मृत्यूनंतर चार पोरें-बाळें पदरी असलेली विधवा, नातलग विचारीनासे झाले तर काय करील ?' असा कळवळा येऊन तिला पुनर्लग्न करून सनाथ होण्याची व पोराबाळांना छत्र मिळवून देण्याची परवानगी मात्र कधीच द्यावीशी सनातनींना वाटत नाही! त्या वेळी मात्र " नशीब तुझं ! पूर्वजन्मीच्या पापाची फळें भोगीत आहेस ! " असा तिच्या दुःखावर डाग देऊन पोळपाट-लाटणेंच सनातनी तिच्या हातांत देतात ना ? मग आतां विवाहविच्छेदाचा प्रश्न आला असतां मात्र स्त्री अनाथ होईल, ती अशिक्षित आणि आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र नसल्या-मुळें तिच्या हाताखालीं तिच्या पोराबाळांची आबाळ होईल, असा कांगावा कां ?

याप्रमाणें घटस्फोटाविरुद्ध पुढे येणाऱ्या वरील तीन आक्षेपांना यथामति उत्तर देण्याचा प्रयत्न केला. त्यावरून असें दिसून येईल की नेमस्त स्वरूपाचा विवाहविच्छेदाचा कायदा हा स्त्रीजीवन सुखी होण्याला अत्यंत जरूर असून कुटुंबस्वास्थ्य व समाजस्थैर्य यांना तो परिणामीं पोषकच ठरेल. डॉ. देश-मुखांनीं घटस्फोटविषयक एक बिल विधिमंडळापुढें आणलेले होतें हे सर्वांना ठाऊकच आहे; हे बिल अपुरें व निराशाजनक आहे, असें कांहींचें म्हणणे होतें, व तें कांहींसे वाजवी आहे; कारण या बिलांत कोणत्या परिस्थितींत घटस्फोट घेण्याचा स्त्रीला हक्क असावा याबद्दल दोन तीन प्रकारांचाच फक्त समावेश केला असून संततीचें काय व्हावे याबद्दल कांहीच विचार केलेला नव्हता. तरी पण या बिलाला सर्व स्त्रियांनीं व त्यांच्या हितचिंतकांनी एक-मुखानें पाठिंबा देऊन ते पास करून घ्यावयास पाहिजे होते. कारण घटस्फोट घेणें व देणें हें तत्त्व एकदां हिंदु कायद्यानें मान्य केलें म्हणजे कमीजास्त तपशील मागाहून आपोआपच सामील होत गेला असता. 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पण्डितः।' या न्यायानें कांहीं थोडया प्रकारच्या परिस्थितींत तरी घटस्फोट मिळण्याची सोय झाल्यास बरेंच काम झालें असतें. परंतु दुर्दैवानें

हेंही बिल शेवटी नापासच झालें. तेव्हां ही सुधारणा पदरांत पाडून घेण्यासाठीं पुनश्च आंदोलन व मागणी सतत चालू ठेवली पाहिजे. अखिल भारतीय महिला परिषदेनें आपल्या १९३७ च्या अधिवेशनांत सुचवलेल्या किंवा तत्सदृश दुसऱ्या योग्य व तर्कशुद्ध अटींवरच विवाहविच्छेद कोर्टांत दिला गेला व संततीच्या जोपासनेची आर्थिक जबाबदारी उभय पक्षांवर टाकली गेली म्हणजे खऱ्या गरजू स्त्रियांचे हित होऊन विवाहविच्छेद बेजबाबदार स्वरूपाचे होणार नाहींत; उलट त्यांमुळें विवाहसंस्था खरी पवित्र, स्थिर व समाजहित-वर्धक होईल.

---

**प्रकरण ७ वें : : :**

## ........ विवाहसंस्थेचें स्वरूप

" Marriage is the beginning and the acme of all culture. "

विवाह ही हिंदूंच्या किंबहुना सर्वधर्मीयांच्या जीवनांत सर्वांत महत्त्वाची बाब आहे. विवाहावर प्रत्येक व्यक्तीचे अंतिम सुख अवलंबून असतें. एका ग्रंथकारानें म्हटलेंच आहे की, मनुष्याचे कपाळी किती सुख आहे, हें त्याचा विवाह झाल्याशिवाय नक्की सांगतां यावयाचें नाहीं. अशा या महत्त्वाच्या गोष्टींत हिंदु स्त्रियांना असणारे निर्बंध व त्यामुळें त्यांची होणारी दुर्दशा पूर्वींच्या कांही प्रकरणांत पाहिली. बालविवाह, विधवा-विवाहनिषेध, विवाहविच्छेदाची अशक्यता यांच्या जोडीला विषमविवाह किंवा शारदीय विवाह, बहुपत्नीकत्व वगैरे दुसऱ्याही कित्येक अडचणी आहेतच. विषमविवाहामुळें संसार पुरा होण्याच्या आंतच पति मृत्युमुखीं पडून बिचारी स्त्री जगांतून उठते; बहुपत्नीकत्वामुळें नवरा असून नाहींसा होतो. विषमविवाहासाठीं सौ. मुनशी यांनी मुंबईच्या विधिमंडळापुढें एक बिल आणलें होतें. सक्तीच्या एकपत्नीत्वाचा कायदा करण्यासाठीं सौ. सुब्बारायन

या मध्यवर्ती विधिमंडळांत खटपट करीत होत्या. अखिल भारतीय महिला परिषदेनेंही एकपत्नीत्वाच्या कायद्याची मागणी सालोसाल चालवलीच आहे; अर्थात् घटस्फोटाचा कायदा पास झाल्याशिवाय सक्तीचे एकपत्नीत्व ही सुधारणा न ठरतां एक प्रकारची जन्मठेपच ठरेल. असो.

याप्रमाणे वैवाहिक जीवनांतील रूढीनीं उत्पन्न झालेल्या अनेक अडचणी दूर करण्याचे प्रयत्न समाजसुधारक करीत आहेत व येथवर झालेल्या सुधारणे-वरून पूर्ण सुधारणा लवकरच होईल असा भरंवसा वाटत आहे; यापुढे असा प्रश्न उपस्थित होईल की, या सर्व सुधारणा झाल्यानंतर हिंदु स्त्रीचें वैवाहिक जीवन सुखी होईल काय? या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी, सर्वसाधारणपणे विवाहसंस्था कशी असावी, तिचे उद्देश काय, ते सध्यां सफल होतांना दिसतात किंवा नाही याचा विचार करणे जरूर आहे. या स्वरूपाचे विवेचन सदरहू ग्रथांत अप्रस्तुत होणार नाही असे वाटते; अर्थात् हे विवेचन फार त्रोटक स्वरूपाचे होणे अपरिहार्य आहे. ज्या विषयावर रसेल, वेस्टरमार्क, हॅवलॉक एलिससारख्या ग्रथकारांनी अनेक मोठमोठे प्रबंध लिहिले आहेत, व इतकें करूनही वैवाहिक सुखी जीवनाचें जे गूढ अद्याप उकललें नाहीं त्या गूढाची एका प्रकरणांत वासलात लावून टाकणे अर्थात् योग्य नाही; पण ग्रंथांतील एकदर विषयांच्या पसाऱ्याकडे पाहतां असे करणे क्षम्य ठरेल, अशी आशा आहे. असो.

विवाहसस्था हा आजकाल मोठा वादविषय होऊन राहिला आहे. विशेषतः पाश्चात्य देशांतील हल्लीच्या संक्रमणावस्थेच्या कालांत विवाह-संस्थेच्या भवितव्याकडे सर्वत्रांचे डोळे लागून राहिले आहेत. जीवन-कलह बिकट झाल्यामुळे पुरुष लग्न करण्याचें लांबणीवर टाकीत आहे, किंवा कधीं कधी विवाहाला अजिबात टाळीत आहे. स्त्रिया स्वतंत्र व अर्थो-त्पादनक्षम झाल्यामुळें लग्न करून आपली स्वतंत्रता गमावण्याचे नाकारूं लागल्या आहेत; संततिनियमनाच्या शास्त्राने शारीरिक गरजा निर्धास्त-पणें भागवतां येऊं लागल्यामुळें, संसार व अपत्यांची जबाबदारी गळयांत बांधणारा विवाह उभयपक्षी टाळावासा वाटतो व टाळतांही येतो. दिवसें-दिवस वाढत चाललेल्या घटस्फोटांच्या वार्षिक आंकडयांवरून होणारे विवाह सुखमय व यशस्वी होत नाहीत, हें स्पष्ट झालें आहे; व हें पाहून तरुण स्त्री-

पुरुष विवाहबंधनांत पडण्याला आणखी जास्तच कचरत आहेत. याचा परिणाम म्हणजे लोकसंख्या दिवसेंदिवस झपाट्यानें घटत चालली आहे. जर्मनी-इटलीसारखीं युयुत्सु राष्ट्रें यामुळें मोठ्या फिकिरींत पडलीं आहेत. अमेरिका-इंग्लंडात विवाहसंख्या कमी कमी होत आहे, तर जर्मनी-इटालींत ती वाढावी म्हणून भगीरथ प्रयत्न सुरू आहेत. इटली लग्नेच्छु जोडप्यांना नाना सवलती देऊन त्यांना विवाहबंधनांत पकडण्याचेंही विलोभन घालीत आहे; तर जर्मनी, घराबाहेर पडून, स्वतंत्र उद्योगधंदा करून स्वाधीन राहणाऱ्या स्त्रियांना घरांत कोंबून, Marriage is the only career for women; (विवाह हा एवढाच धंदा स्त्रियांनीं करण्याजोगा आहे) अशी घोषणा करून, परिस्थिति सुधारण्याची खटपट करीत आहे; अशा वेळीं, सर्वांच्या चर्चेचा व भीतीचा विषय होऊन राहिलेल्या या विवाहसंस्थेचें मूळ स्वरूप काय होतें; कोठल्या उद्देशानें ही संस्था अस्तित्वांत आली असावी; तिचें धार्मिक स्वरूप प्रथमपासूनच होतें काय, सर्वत्रांना भीति वाटत असल्याप्रमाणें अलीकडच्या बदललेल्या परिस्थितींत ती अजिबात नामशेष होणें शक्य व इष्ट आहे किंवा काय, यांचा थोडक्यांत विचार करूं.

विवाह हा केव्हां व कोठल्या स्वरूपांत मानवी समाजांत प्रथम प्रचलित झाला, या प्रश्नाचा उलगडा, विवाहाचें उद्दिष्ट काय होतें व असावें, या प्रश्नाचा प्रथम विचार केला असतां सौकर्यानें होईल. विवाह हें एक धार्मिक बंधन आहे असें आपण हिंदु ( व ख्रिश्चनही ) सध्यां मानतों. एकपत्नीव्रत विवाह आपण श्रेष्ठ समजतों, ख्रिश्चनांत तर एकपत्नीव्रत सक्तीनें प्रत्येकास पाळावें लागतें. पण विवाह हा एकपत्नीत्वाच्या स्वरूपांत प्राचीनकाळीं खात्रीनेंच रूढ नव्हता, असें पौर्वात्य व पाश्चिमात्य ग्रंथांतील अनेक प्रमाणांवरून दिसतें. बहुपत्नीकत्वाच्या चालीला आमच्या मनु, विष्णु, नारदासारख्या स्मृतिकारांनीं मान्यता दिलेली आढळते. मानसशास्त्रज्ञ तर म्हणतात, कीं बहुपत्नीकत्व हें पुरुषाच्या रक्तांतच आहे. बहुपत्नीकत्वाला आळा घालून, एकपत्नीकत्व सक्तीनें करण्याचा मान ख्रिश्चन धर्मानें घेतला खरा, परंतु हें व्रत धर्मोक्त व विधिप्रणीत असलें तरी तें व्यवहारांत कितपत साध्य होतें हें कोण सांगूं शकेल? शोपेनहार तर म्हणत असे, 'पुरुषानें बहुपत्नीक असावें कीं नसावें याबद्दल उगीच शुष्क वाद कशाला ? तो तसा आहेच असें

धरून चाला व मग पुढे काय ते बोला. ' पण हे म्हणणे बरोबर दिसत नाही. मनुष्य रानटी स्थितींतून 'सुधारतो' तेव्हां नैसर्गिक अशा पुष्कळच बऱ्यावाईट गोष्टींचा त्याग करतो. विवस्त्र असणें ही नैसर्गिक अवस्था आहे. रानटी स्थितींत मनुष्यें विवस्त्र राहात किंवा झाडाच्या सालींनीं वगैरे लज्जारक्षण करीत; पण सुधारणायुगांत ही नैसर्गिक अवस्था सोडून माणूस तऱ्हेतऱ्हेचे, दरवर्षी बदलत्या टुमीचे कपडे घालूं लागलाच ना? त्याप्रमाणे पुरुष हा स्वभावतः बहुपत्नीक असल्यामुळे त्याला हव्या तितक्या स्त्रिया करण्याची मुभा देणें योग्य नव्हे. पुरुषाची भोगेच्छा, सारासारविचारशक्तीने संयमित न होण्याइतकी अनिवार्य असते, ही गोष्ट खरी वाटत नाही. सर्वसाधारण पुरुषाला भावनेच्या पोटीं सयम अशक्य नसावा; सततिधारणपोषणाच्या काळांत पत्नी विषयसुखाला उपयोगी पडत नाहीं, म्हणून पुरुषाने दुसरी एक किंवा अनेक स्त्रिया कराव्या, हे रानटी स्थितींतल्या समाजांतील पुरुषास साजून दिसेल; पण, सुधारलेल्या व सुसंस्कृत पुरुषांनी असें करणे साजणार नाहीं. आपल्या जन्माची जोडीदार, सुखदुःखाची वाटेकरीण, आपल्याच कृतीमुळे वंशसातत्याच्या कामी कष्ट काढीत असतां, दुसऱ्या स्त्रीशीं मजा करीत राहाणें हें सुधारलेल्या सुज्ञ पुरुषाला रुचावे काय? शिवाय, पुरुषाला 'तो बहुपत्नीक आहे' या सबबीवर दोन किंवा अधिक स्त्रिया करण्याची परवानगी देणें व स्त्रीला मात्र एकनिष्ठत्वाची शपथ घालणें हें अन्याय्य आहे. हल्लींच्या समान हक्काच्या काळांत स्त्रिया हे कधीही मान्य करणार नाहीत.

शिवाय, पूर्वीच्या निराळ्या आर्थिक परिस्थितीच्या काळीं, बहुपत्नीकत्वाची चाल सुसगत होती. शेतीवाडीसारखे धंदे करणारास जितके जास्त पुत्र असतील, तितकी त्यास जास्त मदत मिळे. बहुपत्नीकत्वानें संतति अर्थातच भराभर व विपुल वाढते. घरांतील कामधंद्यासही एकापेक्षां जास्त स्त्रिया असल्यास उत्तमच; पण हल्लींच्या धकाधकीच्या जीवनांत, एक बायको व दोन मुलें संभाळणें व पोसणेंच जेथें पुरुषास जड जाते, तेथे दोन बायका व त्यांच्या संसाराची गोष्ट कशाला हवी? तेव्हां अलीकडे, दुसरी बायको करणें म्हणजे पहिली टाकणें क्रमप्राप्तच होतें; व हें किती अन्यायाचें व स्त्रीला किती दुःखकारक आहे, हें परित्यक्तांच्या प्रश्नाचा विचार करीत असतांना आपण पाहिलेंच. कुठे कुठे तर बहुपत्नीकत्वाच्या चालीचा कळस झालेला,

बंगाल्यांतील 'कुलीन' ब्राह्मणांसारखा नजरेस पडतो. एका 'कुलीन' ब्राह्मणानें विसापासून शंभरापर्यंत लग्नें केल्याचीं उदाहरणें आहेत. या सगळ्या बायका आपापल्या बापाच्या घरी राहतात. नवरा वर्षाचे सारे दिवस, कांही एका बायकोच्या माहेरीं, तर कांही दुसरीच्या असे घालवतो. बायकोनें बिचारीनें, नवरा कधींकाळीं भेटीस येईल म्हणून डोळे त्याच्या वाटेकडे लावून महिनानूमहिना बसावे; अर्थात् कुलीन ब्राह्मणाला आर्थिक दृष्टया हें बहु-पत्नीकत्व फार फायदेशीर पडतें: कारण प्रत्येक लग्नाच्या वेळी, व नंतर प्रत्येक 'भेटी'च्या वेळी, तो प्रत्येक सासऱ्याकडून सपाटून पैसे उकळीत असतो.

तेव्हां एकंदरीनें, पूर्वी बहुपत्नीकत्व प्रचारांत असलें, तरी बदलत्या कालमानाप्रमाणे व बदलत्या योग्यायोग्याच्या कल्पनेप्रमाणें, एकपत्नीत्व हा लग्नाचा सर्वांत श्रेष्ठ पथ मानला जावा. निकोबार, अदमान वगैरे भागांतील रानटी जातीत सुद्धा एकपत्नीव्रत कसोशीनें पाळलें जातें, मग आपणांस सुधारलेले म्हणवणाऱ्या हिंदुस्थानसारख्या राष्ट्रास तें का शक्य नसावें!

एकपत्नीत्वाचा विचार करतांना थोडें विषयांतर झालें; पुन्हां मूळ विषयाकडे वळण्यापूर्वी विवाहाच्या आणखी एका प्रकाराचा विचार करूं; तो म्हणजे बहुपत्नीत्व किंवा सांघिक विवाह ( Group marriages ). हे दोन प्रकारचें असू शकतें. पहिला प्रकार म्हणजे जेथें नवऱ्यांचा परस्परांशीं कांहीं रक्तसंबंध नसतो व दुसरा म्हणजे जेथें सर्व नवरे हे एका संघांतले किंवा भाऊभाऊ असतात. पांचाली द्रौपदीच्या उदाहरणावरून असे विवाह कांहीं अनार्य जातींत पुरातन काळी प्रचलित होते, असें दिसतें. पहिल्या प्रकारांत कुटुंबव्यवस्था मातृसत्ताक असे. मानवी समाजाच्या प्रारंभी जेव्हां कुटुंब-व्यवस्था सघटित झालेली नव्हती, तेव्हां मुलांचें पितृत्व निश्चित करण्यास जड जात असावें; म्हणून मातृसत्ताक पद्धति अस्तित्वांत आली असावी. माता ही कुटुंबाची मुख्य असे. तिचा ज्या ज्या पुरुषाशी संबंध येई ते पुरुष तिचा व तिच्या संततीचा योगक्षेम आपापल्या मगदुराप्रमाणें चालवीत असावेत. या पद्धतीत पुरुषांकडे फारच थोडी व सौम्य जबाबदारी येते. ती जास्त भरीव करण्यासाठी व या पद्धतीनें स्त्रीवर तिच्या शक्तीपेक्षां फाजील ताण कुटुंब चालवण्याच्या जबाबदारीनें पडतो, या जाणीवेनें दुसरा बहुपतीत्वाचा प्रकार प्रचारांत आला असावा. या प्रकारांत सर्व पती एका कुटुंबांतील असल्यामुळे

पत्नीचा व तिच्या संततीचा भार खुषीने उचलतात व स्त्रीवर कुटुंबधारणेची कांही जबाबदारी राहात नाही. हल्ली उच्चवर्णीयांत कुठेंच ही चाल रूढ नाहीं. पण तोड व तिबेटवासीयांत ती आढळते; या चालीनें संततिवर्धनास आळा बसतो व म्हणून ती कंगाल मुलुखांत जास्त आढळते असें म्हणतात. दक्षिण हिंदुस्थानांत ही चाल थोडी निराळ्या स्वरूपांत कुठें कुठें रूढ आहे. रड्डींमध्यें अशी चाल आहे कीं, तरुण मुलीचें लग्न एकाद्या पांचसहा वर्षांच्या मुलाशी लावावयाचें व नंतर तिनें पत्नीत्वाच्या नात्यानें आपला मामा किंवा सासरा यांच्याशी शरीरसंबंध ठेवायचा. मलबार किनाऱ्यावरील पुढारलेल्या जातींतील नायर लोकांमध्येंही ही बहुपतीत्वाची चाल रूढ आहे. त्यांना हिंदु कायदा संमत नाही. रजोदर्शनापूर्वी नायर मुलीचें लग्न करतात एवढाच काय तो हिंदुधर्मशास्त्राचा संबंध; याला थालीकेतू कल्याणम् असें म्हणतात. नंतर चौथ्या दिवशी लग्नगांठ सुटते व मुलगी नायर जातीच्या कुठल्याही तरुण पुरुषाशी संबंध ठेवण्यास मोकळी होते, किंवा नंबुद्री ब्राह्मणाशींही ती संबंध करूं शकते. ती आईच्या घरींच असते. सासरीं क्वचित् जाते. तिचा प्रियकर मात्र तिच्या भेटीस वरचेवर येतो. हा संबंध दोन्ही पक्षांच्या मर्जीनुसार हवा तेव्हां तोडून टाकतां येतो. प्रियकर देणग्या, भेटी वगैरे वरचेवर देतो, पण मुलांचें पोषण करावयास बांधलेला नसतो. ती जबाबदारी मुलाच्या मामावर असते. पुरुषांची मालमत्ता त्यांच्या मुलांकडे न जातां त्यांच्या बहिणींकडे व तिच्या मुलांकडे जाते.

वरील वर्णनावरून, प्रथमदर्शनी कदाचित् असें वाटेल कीं, नायर बायका हे संबंध हवे तसे व हवे तितके जोडीत व तोडीत असतील; पण प्रत्यक्ष वस्तुस्थितीवरून असें दिसतें कीं, हा 'संबंध' विवाहाइतकाच एकनिष्ठपणें पाळण्यांत येतो व दोन्ही पक्षांच्या नातलगांच्या सल्ल्याशिवाय तो कधींच तोडला जात नाही. परंतु संततीच्या हिताच्या दृष्टीनें संबंध ही संस्था इष्ट नाही. तींत पित्याचें सुख व पित्याच्या शिकवणीचा फायदा मुलांस मिळत नाही; मुलांशी प्रत्यक्ष रक्तसंबंध नसल्यामुळें आपुलकी वाटत नसलेला मामा कितीसें काळजीनें त्यांचें लालनपालन करणार !

तेव्हां एकंदरीनें पाहतां बहुपत्नीक व बहुपतीक विवाहापेक्षां एकपत्नीक व अर्थात् एकपतीक विवाह कालांतरानें श्रेष्ठ ठरला गेला.

एकपत्नीकत्वाच्या कल्पनेप्रमाणे विवाह हा धार्मिक आहे ही कल्पनाही प्रारंभीं नव्हती. यूरोपादि राष्ट्रांच्या व हिंदु लोकांच्या इतिहासावरून असे दिसतें कीं, विवाह ही एक खाजगी गोष्ट मानली जात असे, धर्माचा त्यांत कांहींच संबंध नसे. आपल्या हिंदु धर्मांतही ब्राह्म विवाहाखेरीज इतर जे सात गांधर्वादि विवाहांचे प्रकार सांगितले आहेत त्यांतही धर्माचा संबंध येत नसे; परंतु पुढे ब्राह्मणांचे प्राबल्य वाढल्यावर इतर सात विधी निषिद्ध ठरून ब्राह्मणांसमक्ष लागलेला व धार्मिक विधियुक्त झालेला ब्राह्मविवाहच फक्त शास्त्रसंमत मानला जाऊं लागला. त्याचप्रमाणें हिंदु लोक प्रथम विवाह ही खाजगी व वैयक्तिक बाबत मानीत; पण पुढें ख्रिश्चन लोक विवाह धार्मिक समजूं लागले व व्यक्तींच्या मनाचा त्यांत कांहीं संबंध उरला नाही. व्यक्तीच्या सुखदुःखाची, पसंती नापसंतीची फिकीर न करतां विवाह परमेश्वरप्रणीत संस्था आहे, एकदां लागलेला विवाह मोडणें म्हणजे परमेश्वराच्या शासनाविरुद्ध जाणे व पापी ठरणे आहे असे रोमन कॅथॉलिक व हिंदु लोक मानूं लागले. पूर्वीच्या ग्रीक व रोमन लोकांमध्येही विवाह ही खाजगी व वैयक्तिक गोष्ट समजत, व विवाहासाठी कुठल्याही धार्मिक विधीची किंवा धार्मिक प्रतिनिधीच्या उपस्थितीची जरूर लागत नसे. यावरून उघड दिसतें कीं, विवाह हा मूळचा धार्मिक स्वरूपाचा नसून, फक्त एक वैयक्तिक बाबत असे, व त्यामुळे तद्विषयक कायदा व्यक्तींच्या सोयीनुरूप बदलणें हे धर्मविरुद्ध होते असें मानण्याचे कारण नाही. तेव्हां पुन्हां एकदां विवाह ही संस्था कुठल्या उद्देशाने अस्तित्वांत आली व बदलत्या कालमानाने तींत कुठले फरक होणे इष्ट आहे या विषयाकडे वळूं.

वेस्टरमार्क या '*History of Human Marriage*' पुस्तकाच्या कर्त्यानें अनेक देश व समाज यांमधील विवाहसंस्थेचा अभ्यास करून विवाहाची एक व्यापक व्याख्या केली आहे, व ती एका दृष्टीने फार उद्बोधक आहे. तो म्हणतो :–विवाह म्हणजे, "गर्भधारणेनंतर मुलांच्या जन्मानंतरही कमी जास्त टिकणारा स्त्रीपुरुषामधील संबंध." ( A more or less durable connection between male and female, lasting beyond the mere act of propagation till after the birth of the offspring. ) या व्याख्येवरून उघड दिसतें कीं, निव्वळ विषयोपभोग हा विवाहाचा हेतु नव्हे.

गर्भधारणेच्या वेळीं नाजूक परिस्थितीत असल्यामुळें सरक्षणाची जरूरी असलेल्या स्त्रीला संरक्षण मिळावें, व नंतर जन्म घेणाऱ्या संततीला पोषणकर्ता लाभावा हा विवाहाचा मुख्य उद्देश आहे. पशुपक्ष्यांच्या जीवनांतसुद्धां संततिवर्धन हाच सहजीवनाचा उद्देश असतो. मरेपर्यंत आपापल्या जोडीदारांशीं एकनिष्ठ राहणाऱ्या कांहीं पक्ष्यांचे अपवाद सोडल्यास एकंदर पशुपक्ष्यांमध्यें पिल्लें स्वोदरनिर्वाहक्षम होईपर्यंत नरमादी एकत्र राहतात असें आढळून येतें. याप्रमाणें पशुपक्ष्यांमध्ये सुद्धां कुटुंबधारण हे शरीरसंबंधानतर ओळीनेंच येतें; मग मानवी विवाहांत कुटुंबसंस्थेचे बीज आढळावें, यांत आश्चर्य ते काय? परंतु हल्लींच्या विचारसंक्रमणांत कुटुबसस्था ही मानवी संस्कृतीच्या प्रगतीस कितपत आवश्यक आहे हाही एक मोटा वादग्रस्त प्रश्न होऊन राहिला आहे. समाजसत्तावाद कुटुंबसस्था ही प्रगतीच्या मार्गातील एक अडगळ आहे असें मानतो हे आपण ऐकतोंच.

ही अगदीं अलीकडील विचारसंक्रमणातील पायरी सोडली तरी एकदर असें दिसतें की, विवाह हा धार्मिक स्वरूपाचा नसून वैयक्तिक स्वरूपाचा आहे, हे जरी खरें असले तरी तो निव्वळ खाजगी व वैयक्तिक स्वरूपाचा नाहीं. विवाहापासून झालेली संतति ही समाजाची भावी घटक बनत असल्यामुळे विवाहाचे स्वरूप निश्चित करण्यामध्ये समाजास लक्ष घालावे लागतें, व विवाहामागे सामाजिक व नैतिक जबाबदाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर येऊन पडतात.

विवाहाच्या या सामाजिक स्वरूपावरून असेंही कधी कधी सुचवण्यांत येतें की, विवाह ही संस्था समाजानें स्वैराचाराला, अनियंत्रित विषयोपभोगाला आळा घालण्यासाठीं अस्तित्वांत आणली असावी. अर्थात् प्रथम उत्क्रांति पावत असतां मानवसमाजांत स्वैराचार कधी काळीं अस्तित्वांत होता किंवा काय हाही एक मनोरंजक व वादग्रस्त प्रश्नच आहे. दोन्ही बाजूंना मत देणारे मॅकलेनन, मॉर्गन, लेटोर्नोसारखे विद्वान् आहेत.

पण आधी स्वैराचार म्हणजे काय याची व्याख्या केली पाहिजे. स्वैराचार म्हणजे वाटेल त्या पुरुषाने वाटेल त्या स्त्रीशीं शरीरसंबंध करून नंतर तिचा पूसतपासही न करतां परिणामापासून, संततीच्या जबाबदारीपासून, नामानिराळें राहणें, कीं स्वैराचार म्हणजे जन्मभर टिकणाऱ्या संबंधाच्या जागीं लागोपाठ कमीजास्त टिकणारे अनेक संबंध करण्याची परवानगी? पहिली

व्याख्या म्हणजे केवळ व्यभिचार—तो अजून तरी समाजांतून अजिबात नाहीसा कुठें झाला आहे ? उलट विवाहित स्थिति ही व्यभिचाराला मदत करणारी पार्श्वभूमीच ठरतांना कधीं कधी दिसते. पण अशा तऱ्हेचा स्वैराचार क्वचित् आढळत असला तरी सर्‌हा रूढ व संमत समाजाच्या कुठल्याच स्थितीत कधींही नव्हता, असें सर्व तज्ज्ञांचे मत दिसते व सर्वसामान्य सारासार बुद्धीलाही तें पटतें. मानवी संतति ही मानवेतर जीवसृष्टीतील संततीपेक्षां जास्त काळ परावलंबी असते व म्हणून तिला जास्त काळ आईवर अवलंबून राहावें लागते. संततीच्या दैनिक लालनपालनांत खपणारी आई तिच्या भरणपोषणाचाही भार वाहण्यास. अर्थातच बव्हंशी अक्षम असते; त्यामुळें तिला संततीच्या व स्वतःच्या योगक्षेमासाठी पुरुषाचा आधार शोधावा लागतो. या जबाबदारीसाठी तिनें संततीचा जनकच निवडावा, व त्यानेंही ही जबाबदारी आपुलकीच्या भावनेनें आनंदानें उचलावी हेंही ओळीनेंच आलें. हेंच विवाहाचें बीज. प्रथम प्रथम हा उद्देश स्त्रीपुरुषांनी मोठमोठे संघ स्थापन करून राहण्यानें व सांघिक विवाहानें ( Group marriage ) साध्य होई. पण जसजसा समाज उत्क्रांति पावूं लागला, व त्यामध्ये व्यक्तिमत्वाचा व व्यक्तिवादाचा उत्कर्ष होऊं लागला, तसतसे सांघिक विवाह नैतिक संस्कारात्मक वाटूं लागून दोनच व्यक्तींनीं आपापल्या संततीसाठी एकत्र राहून तिच्या पालनपोषणाचा भार उचलावा हीच पद्धत जास्त नैतिक ठरली व श्रेष्ठ मानला जाणारा एकपत्नीक विवाह अंमलांत आला. तेव्हां स्वैराचाराला आळा घालण्यासाठीं विवाहसंस्था अस्तित्वांत आली हें खरें नसून संततीचें भरणपोषण जास्त कार्यक्षमतेनें व्हावें म्हणून आली हेच पहिलें मत खरें दिसतें.

दुसऱ्या प्रकारच्या व्याख्येनें स्वैराचार हा एक प्रकारचा कुटुंबसंस्थेचा व विवाहित जीवनाचा छोटासा अवतारच ठरतो; कारण थोड्या कालापर्यंत तरी मूल, आई व बाप ही कुटुंबाची बीजरूप त्रिपुटी एकत्र राहाते. हा एकत्र घालवलेला काळ संततीच्या सर्वांगीण वाढीच्या दृष्टीनें फार अपुरा वाटू लागला. परस्परसंबंध अगदी शिथिल, निसरत्या विवाहग्रंथीमुळें होऊं लागले तेव्हां समाजाला संततीच्या यथायोग्य लालनपालनासाठीं—स्वैराचारावर नियंत्रण घालण्यासाठीं नव्हे—वर उल्लेखलेल्या त्रिपुटीच्या सहजीवनावर

निर्बंध घालण्यासाठी पुढे यावें लागलें. बहुपतीक व बहुपत्नीक यांसारखे कांही विवाहाचे प्रकार प्रथम रूढ झाले; पण वर दाखवल्याप्रमाणें, या दोन्हींमुळे बरेच अनवस्था प्रकार होऊं लागल्यामुळे एकपत्नीत्वाच्या स्वरूपांत विवाहसंस्था शेवटीं समाजानें दृढमूल केली.

अर्थात् संततीच्या हितवर्धनाबरोबर एकपत्नीत्वाच्या विवाहांत दंपतीचें एकांतिक सुख साधेल अशी समाजाची अपेक्षा होती. दंपती सुखी, समाधानी व परस्परानुरक्त असल्याशिवाय, संततीची वाढ नीट होत नाही हें आपण मागें एका प्रकरणांत पाहिलेंच. तेव्हां सुखाचे संसार व निर्दोष संततिवर्धन यायोगें समाजाचें व राष्ट्राचें तात्कालिक व भावी कल्याण विवाहानें साधेल अशी साहजिकच समाजशास्त्रज्ञांची कल्पना असावी; आणि खरोखरीच प्रथमदृष्ट्या हें अगदीं शक्य व वाजवी दिसतें. पतिपत्नी एकमेकांशीं एकनिष्ठ व "प्रजायै गृहमेधिनाम्" या तत्त्वाप्रमाणें ज्या संततीसाठीं संसार थाटला तीही मजेत असतांना घरांत असंतोष कशानें माजणार आहे ? आम्ही पौर्वात्य तर असे म्हणूं कीं, पाश्चात्य देशांत वैवाहिक जीवनावर दुःखाची सावलीही कधीं काळीं पडण्याचें कारण नाहीं. कारण वधूवरांनीं राजीखुषीनें एकमेकांच्या हौशीनें तेथें प्रीतिविवाह केलेला असतो. आमच्याकडील बोजड एकत्र कुटुंबपद्धतीचें तेथें नांव नाहीं. तेव्हां प्रीतिविवाहाच्या पहिल्या गोड मधुचंद्रिकेनंतर मियाबिबीचें राज्य सुरू होतें व हळुहळू बाबालोकांच्या आगमनानें घरांत मूर्तिमंत वात्सल्य अवतरतें; मग आणखी स्वर्गसौख्य तें काय निराळें असतें ?

परंतु वस्तुस्थिति पाहूं गेले असतां असें आढळून येईल की, सध्यां यूरोपादि पाश्चिमात्य देशांत एकंदर वैवाहिक जीवनाविषयी अत्यंत असंतोष माजून राहिला आहे. पाश्चात्य वाङ्मयांत या वैवाहिक जीवनाच्या बोजवाऱ्याचें उत्तम प्रतिबिंब पडलेलें आढळतें. पूर्वीच्या नाटक-कादंबऱ्यांत ग्रंथकार नायकनायिकेच्या मार्गांत अनेक संकटें व अडचणी उत्पन्न करून शेवटीं त्यांचें गोड मीलन घडवून आणी, व वाचकांना "याप्रमाणें त्यांचें लग्न झालें व मग तीं दोघें सुखानें संसार करूं लागलीं" असें आश्वासन देऊन कथानकावर पडदा पाडी. वाचकही ग्रंथकर्त्याचें हें आश्वासन पूर्ण विश्वसनीय मानून पुस्तक मिटीत. यावरून वैवाहिक जीवन कांहीं कारणांमुळे दुःखी,

दुर्घट व विकट होऊ शकते ही कल्पनाच त्या वेळी समाजांत नव्हती असे दिसतें. पण अलीकडच्या ललितवाङ्मयांत पाहावें तर गोष्टीची सुरुवातच होते नायकनायिकेच्या थाटलेल्या संसारापासून. नंतर त्यांचे एकमेकांविषयींचे गैरसमज, मतभेदामुळे खटके, तिसरी व्यक्ति रंगभूमीवर आल्यामुळें उत्पन्न होणारे बिकट त्रिकोण वगैरेंची हकीकत सांगतां सांगतां शेवटीं पतिपत्नी एकमेकांपासून कायमची विलग होऊन गोष्ट संपते. यावरून विवाहसंस्थेच्या यशस्वितेविषयी व भवितव्याविषयीं सर्वसाधारण समाजाला दारुण चिंता लागून राहिली आहे असे उघड दिसते. हार्डीच्या "*Jude the Obscure*" किंवा "*Tess*" सारख्या कादंबऱ्यांतून किंवा टॉलस्टॉयच्या क्रूट्झर् सॉनॉटा व ॲना कॅरेनिना या पुस्तकांतून वैवाहिक जीवनांत उत्पन्न होणारे निरनिराळे बिकट प्रश्न वाचकांपुढें मांडले आहेत. एकंदरीनें हल्लीची विवाहसंस्था ही एक औपचारिक रीत्या बाह्य देखावा सजवणारी पण आंतून दुःखापापांनीं केडलेली एक ढोंगी स्थिति आहे, असा अभिप्राय पाश्चात्य ग्रंथकारांच्या वेळोवेळीं निघालेल्या उद्‌गारांवरून दिसतो. मेरेडिथ विवाहाला Wedded Lie असें म्हणे. दुसरा एक ग्रंथकार अर्धवट थट्टेनें पण बऱ्याच गंभीरपणानें म्हणतो, "बायकोबरोबर सुखाचे असे दोनच दिवस नवरा घालवूं शकतो. एक लग्नाचा दिवस व दुसरा तिच्या मरणाचा दिवस!"

विवाहित जीवनाचे हें भीषण दृश्य पाहून तरुणतरुणी लग्नाच्या फंदात पडण्याचें नाकारीत आहेत. यूरोपांतील सालोसाल कमी होत जाणारी विवाह-संख्या पाहून ही गोष्ट उघड दिसते. त्यामुळें लोकसंख्या दिवसेंदिवस घटत जाऊन आपली गोरी जात नामशेष होऊन पिवळे लोक जगाचे सम्राट् होणार कीं काय, या भीतीनें साऱ्या यूरोपचे धाबें दणाणलें आहे. इटली-जर्मनीसारखीं राष्ट्रें लोकांनीं लग्नें करावीं म्हणून सामदामादि उपाय योजीत आहेत; तर कांहीं ठिकाणी लोकसंख्या वाढवण्यासाठीं व प्रौढ कुमारिकांचा (Old maids) प्रश्न सोडवण्यासाठीं एकपत्नीत्वाची चाल रद्द करून बहुपत्नीकत्व सुरू करावें असेंही प्रतिपादिलें जात आहे.

पाश्चात्य देशांतील विवाहसंस्थेचा उडालेला हा बोजवारा पाहून आमचे पौर्वात्य संस्कृतीचे अभिमानी सनातनी म्हणतील कीं, "पाहिलेंत, सुधारणा सुधारणा म्हणून तुम्ही पाश्चात्य राष्ट्रांचा कित्ता डोक्यावर घेऊन

नाचतां; पाश्चात्य सुधारणेचा—त्यांचे स्त्रीशिक्षण, त्यांच्या समान हक्काच्या गप्पा, निर्लज्जपणानें चाललेला त्यांचा स्वैराचार—या सगळ्यांचा शेवट कसा होतो पाहिलेंत ना! वैवाहिक जीवनाच्या या विचक्यानें ते कसे वैतागले आहेत पहा! नाहीं तर आमचे पौर्वात्य लोक, विशेषतः ज्यांना तुम्ही मागसलेल्या म्हणतां त्या पौर्वात्य हिंदु स्त्रिया पहा. किती बिनबोभाट सुखासमाधानानें ससार चालले आहेत त्यांचे!"

असें म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीकडे जाणूनबुजून डोळेझांक करणें आहे. पाश्चात्यांना वैवाहिक जीवनांत आपलें कोठें तरी चुकत आहे ही जाणीव झाल्यामुळें ते तगमगत आहेत. आम्हां पौर्वात्यांना ती जाणीवच अद्याप झाली नाहीं, म्हणून आमचें कुठें चुकतच नाही असे म्हणणें योग्य होईल काय? मरणोन्मुख माणसाच्या यातना पाहवत नाहींत म्हणून त्याला मॉर्फियाचें इंजेक्शन द्यावें व तो स्वस्थ पडून राहिला म्हणजे 'पहा त्याच्या यातना थांबल्या; तो बरा आहे आतां;' असें म्हणण्यासारखेंच आहे हें! आमच्या हिंदु स्त्रिया अमेरिकेंतील पूर्वकालीन निग्रो गुलामांप्रमाणे दुहेरी दुर्दैवी आहेत. त्यांना सुखी व स्वतंत्र जीवन उपभोगावयास मिळत नाहीं तें नाहींच; पण आपल्याला कांहीं कमी आहे अशी 'चुकचुकल्यापरी अंतरीं' जाणीवसुद्धां अज्ञानानें व फारां दिवसांच्या अंगी मुरलेल्या संवयीने त्यांना नाहीं! निग्रो गुलाम जसे आपल्या मालकाची सेवा करण्यांतच कृतकृत्यता मानीत तशीच आमच्या हिंदु बायकाही नवऱ्याला तनमनधन अर्पण करून त्याच्या व्यक्तित्वांत आपलें व्यक्तित्व बुडवून टाकून त्याची गुलामगिरी करण्यांत कृतार्थता मानतात. गुलामगिरी कायद्यानें बंद झाल्यावर स्वतंत्र झालेले कांहीं गुलाम बावरले व आपल्या धन्याला, 'आम्हांला नको ही स्वतंत्रता! आम्ही आपले पूर्वीं होतों तसेंच बरें; आम्हांला परत गुलाम होऊं द्या' असें म्हणूं लागले. तशी आमच्या हिंदु बायकाही 'आम्हांला कशाला ते स्वतंत्र हक्क व त्यांच्यामागून डोक्यावर बसणाऱ्या जबाबदाऱ्या? बाहेरच्या जीवनकलहाच्या धगींत आमचा सुखाचा जीव कशाला लोटावा आम्हीं? घरच्या सुखशांतीच्या सावलींत बसून चूलमुलांवर साम्राज्य चालवणेंच त्यापेक्षां बरें वाटतें आम्हांला' असें म्हणणाऱ्या निघतील, व कित्येक तसें म्हणतातही; पण यावरून ज्याप्रमाणें गुलामगिरी नीग्रोच्या दृष्टीनें मोठी सुखी व स्पृहणीय अवस्था मानतां येणार

नाहीं त्याचप्रमाणें सध्यांचे हिंदु स्त्रियांचें वैवाहिक जीवनही सुखी व निर्दोष मानतां येणार नाही. हिंदु स्त्रियांच्या निरक्षरत्वामुळें बाहेरील जगाच्या अनुभवामुळें व युग-युगांतरींच्या संस्कारामुळे, त्यांना आपली दुःखें समजेनाशीं झाली आहेत. यूरोपांत व इंग्लंडांतही पूर्वी अशीच अवस्था होती, व स्त्रीस्वातंत्र्यवादी मिल व मेरी वुलसेनक्राफ्ट यांना वेडगळ व माथेफिरू ठरवणाऱ्या आपमतलबी पुरुषांच्या बरोबरीने अडाणी स्त्रिया तिकडेही होत्या; पण स्त्रीशिक्षणाचा प्रसार तिकडे झाल्यापासून त्यांचा स्त्रीवर्ग खडबडून जागा झाला. आपल्या सामर्थ्याची, व्यक्तिमत्वाची त्यांना हळुहळू ओळख पटूं लागली. विवाहसंस्था ही मूळ कोणच्याही स्तुत्य उद्देशाने निघालेली असो, पण नंतर तिचे एक प्रकारच्या सोटेशाहींत व गुलामगिरींत कसें रूपांतर झाले आहे हें त्यांच्या लक्षांत येऊं लागलें, व विवाहसंस्थेविरुद्ध त्यांनी बंड उभारण्यास सुरुवात केली. या बंडाचे प्रतिध्वनि पाश्चात्य वाङ्मयांत उमटत असून, विवाहविषयक कायदे बदलून घेण्याचें काम झपाट्यानें सुरू आहे. हिंदुस्थानांतही सार्वत्रिक स्त्रीजागृति झाल्यानंतर असाच प्रकार होईल यांत शंका नाही. किंबहुना सध्यांही विवाह हें एक 'भंगलेलें देऊळ' आहे. वैवाहिक जीवनाच्या 'हिरवळी खालीं' दुष्ट कांटे लपलेले आहेत, वगैरेसारखे स्त्रियांमधील असंतोषाचे पडसाद वाङ्मयांत उमटूं लागले आहेत. वारसा हक्क, घटस्फोट, एकपत्नीत्व, विषमविवाहनिषेध, यांसारखे कायदेही हळुहळू पुढे येऊं लागले आहेत. मात्र हा असंतोष व ही सुधारणा सार्वत्रिक होण्याला स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराची आणखी कांहीं दशकें लोटलीं पाहिजेत.

एवंच, बहुजनसमाजाच्या अज्ञानामुळें विवाहसंस्थेविषयी हिंदुस्थानांत, पाश्चिमात्य राष्ट्रांइतकी ओरड होऊं लागली नाहीं, यावरून हिंदुस्थानांतील विवाहसंस्था सुखकारक व निर्दोष आहे असें म्हणणें सर्वथैव चुकीचें ठरेल. उलट पश्चिमेकडील सहवासोत्तर विवाह सुखी ठरण्याची शक्यता आमच्या हिंदु समाजांतील विवाहापेक्षां, किती तरी पटीनें जास्त आहे हें कबूल करावें लागेल. पतिपत्नींचे स्वभाव परस्परविरोधी असणें व त्यांच्या आवडीनिवडींमध्यें तफावत असणें हे विवाह दुःखी व अयशस्वी होण्याचे एक सबळ कारण ढोबळ मानानें दिसतें. हिंदुस्थानांत लग्नापूर्वी वधूवर एकमेकांशीं परिचित नसतात; त्यामुळें पुढें संसार सुरू झाला कीं, बारीकसारीक कारणा-

वरून खटके उडू लागतात. याला उपाय म्हणजे वधूवरांनी परस्परांशी पूर्ण परिचय झाल्याशिवाय विवाहग्रंथि न बांधणें. पाश्चात्य देशांत ही रूढि सध्यां प्रचलित आहे. तिकडे तर वराने वधू पसंत करून तिला मागणी घातल्याशिवाय लग्नें ठरतच नाहींत; अर्थात्, कधीं कधीं ही मागणी वराच्या मनाविरुद्धही वडील माणसांच्या वजनामुळें, श्रीमंत व अधिकारपदावर असलेल्या घराण्यांतून घातली जाते ही गोष्ट खरी. पण सर्वसाधारणपणें मध्यमवर्ग व खालचा श्रमजीवी वर्ग यांमध्यें वर हा आपल्या पसंतीनुरूप वधूला मागणी घालतो. अशी मागणी जिला येत नाहीं ती बिचारी आमरण अविवाहित राहून जाते. अशा घोडवधूची (old maids) अवस्था, पाश्चात्य समाजांत, आपल्याकडील बालविधवाप्रमाणेंच होते. अशा मुलीला पुरुषाच्या डोळ्यांत भरण्याजोगे आकर्षकत्व अंगीं नसल्यामुळें व अनेक सौंदर्यप्रसाधनांनींही ते अंगीं आणतां आले नसल्यामुळे जन्मभर भावाबहिणींचे संसारच करीत बसावें लागतें. तिचें आयुष्य रुक्ष व उजाड बनतें व तिचा स्वभाव स्वाभाविक भावनाविकारादि प्रवृत्ति दाबल्या गेल्यामुळे चमत्कारिक बनतो. अशा प्रौढ वधू जाणत्या सहृदयाच्या अनुकंपेचा व अनेकांच्या थट्टेचा व उपहासाचाच एक विषय बनून राहिला आहे. त्या बिचाऱ्यांना पुष्कळ वेळां असें वाटत असेल की, " हिंदुस्थानांतल्यासारखी आईबापांनीं आपल्याला वाटेल तो नवरा पसत करून त्याच्याशी मुलीचे लग्न उरकून टाकण्याची चाल आपल्याकडे असती तर आपल्याला जन्मभर असे कोपऱ्यांत पडून राहावे लागले नसतें." अर्थात् हा केवळ त्राग्याचा विचार आहे. हिंदु विवाहानतर हिंदु पत्नीपुढे काय ताट वाढून ठेवलें असतें याची कल्पना त्यांना असती तर असे उद्गार त्यांच्या तोंडून कधीच आले नसते.

असो. सांगण्याचा सारांश असा की, सहवासोत्तर होणारा प्रीतिविवाह आईबापांनी जमविलेल्या अनोळखी वधूवरांच्या लग्नगांठीपेक्षां खात्रीनेंच जास्त सुखी व यशस्वी होत असला पाहिजे असे आपणांस वाटणे साहजिक आहे. समानशील व समान व्यसनांपेक्षांही प्रेम हे सुखी विवाहाला जास्त जरूर आहे. हिंदु वधूवरांमध्ये विवाहकालीं अनोळखीपणामुळे प्रेमोद्गम झालेला नसतो व पुढे प्रीतिलता रुजून वाढीस लागेल अशी आशा करणेंही वधूवरांच्या वयांतील, शिक्षणांतील, अनुभवांतील अतरामुळें फोल होतें. पण

पश्चिमेकडे तर सगळेच प्रीतिविवाह. मग ते अयशस्वी व दुःखी का व्हावेत? प्रियाराधनसमयींचें प्रेम लग्नानंतर कोठें जातें? "प्रियाराधनकालीं प्रियकराची प्रीति वसंतागमींच्या पल्लवाप्रमाणें टवटवीत असते. पण लग्नानंतर मात्र ती हिंवाळ्यांतील हिमाप्रमाणे थिजून जाते," असें म्हणून अश्रु ढाळण्याची पाळी पत्नीस कां येते?

याचें उत्तर असें देण्यांत येते की, जी प्रीति विवाहाच्या पहिल्या नव्हाळीनंतर उडून जाते ती खरी प्रीतीच नसते; ती एक प्रकारची यौवनोन्मादांतील विषयपिपासा असते. हा उन्माद वैवाहिक जीवनांत उपभोगानंतर साहजिकच ओसरतो; कालांतरानें अपत्यप्राप्तीनें या उन्मादाचा विषय जो स्त्रीचें तारुण्य व सौंदर्य त्याचें आकर्षकत्व कमीकमी होत जातें; व मग ती पहिली नकली प्रीति, तो उतावळा उन्माद खाडकन् उतरून जाऊन त्याची जागा नावड, तिटकारा घेतो व कित्येक वेळां पुरुषाचा तारुण्यमद दीर्घकाल टिकणारा असल्यामुळें पुरुष दुसरा उन्मादविषय शोधूं लागतो व तो त्याला मिळाल्यास, त्याचें संसारांतलें लक्ष साफ उडून जाऊन स्त्रीच्या सुखाचें व आयुष्याचें उजाड वाळवंट होतें. तेव्हां विवाह सुखी व यशस्वी व्हावा अशी ज्या जोडप्याची इच्छा असेल त्यानें प्रथमोन्मादाला प्रेम न समजण्याची खबरदारी घेतली पाहिजे. परस्परांतलें आकर्षण निव्वळ ऐंद्रिय किंवा कुतूहलजन्य नसून, एकमेकांच्या अंगीभूत गुणांविषयीं, एकमेकांच्या व्यक्तित्वाविषयीं वाटत आहे अशी खात्री करून घेतल्याशिवाय लग्न करणें म्हणजे भावी दुःखाला आमंत्रण धाडणें आहे.

हा उपदेश दिसायला मोठा सयुक्तिक दिसतो खरा, पण तो आचरणांत उतरवणें मोठें कठिण काम आहे. एक तर हिंदुस्थानांत तर राहोच पण पाश्चिमात्य देशांत सुद्धां परस्परांत निर्माण झालेलें आकर्षण कोठल्या प्रकारचें आहे हें तावूनसुलाखून पाहण्याची संधि मिळण्याइतका परस्पर सहवासच तरुणतरुणींत होऊं शकत नाही. प्रथम सामान्य ओळख होते; ओळख जरा वाढवूं लागलें तर लोक त्याच्यावर लगेच अर्थ बसवूं लागतात; व एकदां अर्थ बसून गेल्यावर मग एकमेकांचे स्वभाव पुरते समजण्याची संधि मिळूनही फायदा नसतो. कारण एकदां झालेला वाङ्निश्चय (engagement) मोडणे अर्थात् कमीपणाचें समजतात. दुसरें म्हणजे ज्या अगदीं तरुण वयांत विवा-

हेच्छु स्त्रीपुरुष एकत्र येतात त्या वयांत शारीरिक आकर्षणाचा मोह आवरणें किंवा तें थंडपणें बाजूला सारून स्वभावविश्लेषण करीत बसणें हें मानवी स्वभावाच्या व विकारवश तरुण रक्ताच्या विरुद्ध आहे. तरुण मुलेंमुली एकमेकांकडे आकर्षिली जातात तेव्हां शारीरिक आकर्षणाचा त्यांत जबरदस्त अंश असणें अगदीं अपरिहार्य आहे. त्याच्या आहारीं न जाणें किंवा तो विचार विवेकपूर्वक पृथक् करणें हें तरुण मनास शक्य नाहीं.

आतां याच्यावर उपाय म्हणून बंधनापलीकडे जाण्यास तयार असलेले कांही लोक असे सुचवतात कीं, या उपभोगानंतर कुतूहल व मोह शांत झाल्यावर मगच विवाह करावा किंवा नाहीं हें ठरवावे. परंतु या उपायानें नैतिक बंधनें अगदीच शिथिल होऊन जिकडे तिकडे स्वैराचार माजेल अशी सार्थ व साधार भीति सर्व जबाबदार समाजशास्त्रज्ञांस वाटत असल्यामुळें या उपायाचा विचार करण्यांत अर्थ नाहीं.

दुसरें असें सुचवण्यांत येतें की, केवळ परस्परविषयक शारीरिक, औपभोगिक कुतूहलानें विवाह होऊं नयेत म्हणून स्त्रीपुरुषांस विवाहपूर्व वैषयिक सुखानुभव असावा; केवळ अशा कुतूहलानें बव्हशीं विवाह जुळतात यांत शंका नाहीं; पण हें कुतूहल प्रत्यक्ष अनुभवानेंच दूर केलें पाहिजे असे थोडेंच आहे? शास्त्रीय रीत्या लैंगिक शिक्षण मुलांमुलींस दिलें तर त्यांच्यांत तद्विषयक कुतूहल केवळ त्यासाठी विवाह करण्याइतकें खात्रीनें राहणार नाहीं. पण इतकें करूनही प्रीतिविवाहांतला शारीरिक आकर्षणाचा भाग अजिबात नाहींसा करतां येणार नाहींच. आपल्या हिंदु समाजांत मुलगे-मुली जाणते झाल्यापासून शिक्षणसंस्थांतूनही त्यांना पृथक् पृथक् ठेवण्याची पद्धत असल्यामुळें या शारीरिक आकर्षणाचा प्रभाव हिंदु युवयुवतींवर खात्रीनें जास्त होत असेल. शिक्षण, खेळ, सामाजिक करमणूक व समारंभ वगैरे अनेक कारणांनी तरुणतरुणी एकत्र येऊं लागलीं, परस्परांबरोबर खेळीमेळीनें वागूं लागलीं, जबाबदारीचीं सार्वजनिक कामें सहकारितेनें पार पाडूं लागलीं की, त्यांच्यांतील निवळ शारीरिक आकर्षण खात्रीनें कमी होईल व मग प्रीतिविवाह जास्त यशस्वी होऊं लागतील.

पण एकंदरींत प्रीतिविवाह हा थोडासा धोक्याचा नेहमी राहणारच. विवाह हा एक नशीबाचा जुगार आहे; ती एक अंधारांतील उडी आहे असे

म्हटलें जाते ते बव्हंशी खरे आहे. विवाहापूर्वीच्या भावना विवाहानंतर नव्याण्णव हिस्से जशाच्या तशा टिकत नाहींत. ज्याला प्रेम म्हटलें जातें तें रोजच्या व्यावहारिक रुक्ष जीवनांत फिकें पडत जातें. प्रेमाच्या जोडीला जर एकमेकांविषयी आदर, एकमेकांच्या व्यक्तित्वाविषयीं समानबुद्धि वाटत असेल तरच पतिपत्नींत सलोखा टिकून राहील. नाही तर क्षुल्लक मतभेदांपासून सुरुवात होऊन एकमेकांविषयीं तिरस्कार व उबग हळुहळू उत्पन्न होत जाऊन दोघेही सांसारिक व परस्परविषयक कर्तव्यांविषयीं दिवसेंदिवस जास्त उदासीन होत जातील. हल्लीचे विवाह अयशस्वी होण्याचें कारण, माझ्या मते हा परस्परसमान बुद्धीचा अभाव होय. विवाहदुःखाच्या बहुतेक मूलभूत कारणांचा —परस्परांचा स्वभाव न पटणे, प्रीति कमी होत जाणें किंवा मूळचीच खरी नसणें, नवऱ्यानें एकपत्नीव्रताला सोडून वागणे, या सर्व कारणांचा--संबंध परस्परसमान बुद्धीच्या अभावाशी जोडतां येईल. नवराबायकोला परस्परांच्या व्यक्तित्वाविषयी कांही सम्मानाची भावना असेल तर एकमेकांची भिन्न मतें ती समजावून घेण्याचा प्रयत्न करतील; व एकमत होणें शक्य नाहीं असें दिसून आल्यास, तो प्रश्नच मनांत कांही आढी धरल्याशिवाय बाजूला सारतील. पण हा सम्मानस्वभाव हल्लींच्या विवाहसंस्थेच्या स्वरूपांत विवाहोत्तर नाहीसा झालेला आढळतो. हिंदु पत्नीला तर पतीविषयी आदर वाटण्याऐवजी ' भीति ' वाटू लागते; व पतीला आदराच्या जागीं स्वामित्वाची, सत्ताधीशत्वाची भावना उत्पन्न होते. एकीकडे भीति व दुसरीकडे ही स्वामित्वाची भावना अशा दोन विजोड खांबांवर आधारलेला हा विवाहप्रासाद कोलमडू पाहात आहे यांत आश्चर्य तें काय !

याप्रमाणे विवाह अयशस्वी होण्याचें मुख्य कारण, स्त्री वैवाहिक जीवनातील आपलें मानाचें स्थान हरवून बसली हें होय. या मानाच्या स्थानापासून ती केव्हां ढळली व ते स्थान तिला परत मिळणें कसे शक्य होईल हे पाहण्याकरितां विवाहसंस्थेच्या आद्य स्वरूपाकडे पुन्हां वळूं.

(विवाहसंस्थेचें अगदी मूळचें स्वरूप उत्क्रान्ति पावत असलेल्या मानवी समाजांत उपयुक्तताप्रधान किंवा सोयीचें असे होते हें आपण वर पाहिलेंच. संततिसंवर्धनाला सोयीचें पडावें म्हणून पतिपत्नींनी आजन्म एकत्र राहून दोघांच्या सहकार्यानें प्रजा वाढवावी, वर्तवावी, असा समाजशासनकर्त्यांनीं

निर्बंध घातला. प्रजाधारण व तिचे पालनपोषण हीं महत्त्वाची व नाजूक कामें करीत असतांना स्त्री ही दुर्बल व परावलंबी असते, त्या वेळीं पुरुषाचा खात्रीचा व कायमचा आधार असावा, मानवी संतति ही दीर्घकाल परावलंबी असते; या दीर्घकालीन शैशवांत मुलाच्या भरणपोषणाचा भार एकट्या स्त्रीवर पडूं नये म्हणून तिला पुरुषाची जोड देण्यांत आली. पुरुष हा दोन किंवा अधिक जीवांचा योगक्षेम चालवण्याइतका दणकट असतो व त्याच्या दैनंदिन श्रमजीवि आयुष्यांत निसर्ग स्त्रीच्या आयुष्याप्रमाणें कुठल्याही नित्य वा नैमित्तिक अडचणी उत्पन्न करीत नाहीं. तेव्हां पुरुषाची जोड स्त्रीला फार सोयीची झाली. दुसऱ्या पुरुषापासून स्वपत्नीला झालेल्या प्रजेचा भार पुरुषावर घालणें अन्यायाचें आहे, म्हणून स्त्रीवर पातिव्रत्याचा निर्बंध घालण्यांत आला; पुरुषाचें लक्ष स्वस्त्रीकडून व संततीकडून इतरत्र फांकून त्याची आबाळ होऊं नये म्हणून एकपत्नीव्रताची नैतिक जबाबदारी पुरुषावर टाकण्यांत आली व याप्रमाणें मानवी संसाराचें व वंशवृद्धीचे हे चक्र निसर्गानें आपल्या मतें सुरळीत चालेल असे सुरू केलें.

मूळच्या सोयीसाठी म्हणून अस्तित्वांत आलेल्या या विवाहसंस्थेला कांही दिवसांनी धार्मिक व पवित्र स्वरूप प्राप्त झालें. नैसर्गिक दुर्दम्य विकारभावना दाबून दोन व्यक्तींनीं एकनिष्ठपणें आजन्म एकत्र राहणें व एकमेकांच्या सुखदुःखाचे, लाभहानीचे वांटेकरी होणे ही कल्पनाच फार हृदयस्पर्शी व उदात्त आहे. पतिपत्नी ज्या कार्यासाठी एकत्र येतात व एकत्र राहतात तें कार्यही वंशवृद्धीसारखें साऱ्या समाजाला व राष्ट्राला उपकारक असल्यामुळें विवाहसंस्थेला बहुजनसमाज फार मानूं लागला. खुद्द दंपतीलाही वैवाहिक जीवनांत प्रवेश करतांना आपण एका उच्च व ध्येयमय जीवनाची जबाबदारी घेत आहों अशी भावना उत्पन्न होऊं लागली. विवाहानंतर सहवासानें पतिपत्नींमध्यें स्नेहबंधन साहजिकच उत्पन्न होऊं लागलें व संततीच्या आगमनानें तर तें बंधन जास्त दृढ होत जाऊं लागले. स्वतःच्या सुखाकडे न बघतां पुरुषाच्या स्वास्थ्याला, संपत्तीला, संततीला, जपणारी पुरुषाच्या पुत्रांना जन्म देतांना स्वतःचा जीव धोक्यांत घालणारी पत्नी म्हणून पुरुषाला तिच्याविषयीं कृतज्ञता, प्रेम, आदर व आपुलकी वाटूं लागली. स्वतःच्या कुटुंबीयांसाठीं जीवाचें रान करणारा, त्यांच्यासाठीं नित्य श्रमजीवि आयुष्य कंठणारा, आपल्या

छातीचा कोट करून त्यांचें संरक्षण करणारा पुरुष स्त्रीला प्रिय व देवतुल्य वाटूं लागला.

आपण निव्वळ सोयीसाठी निर्माण केलेल्या विवाहसंस्थेचें हें उज्ज्वल व मधुर रूपांतर झालेलें पाहून निसर्गाला मोठें कौतुक व समाधान वाटलें असेल.

परंतु, आपण वर पाहिल्याप्रमाणें विवाहसंस्थेचें हें मधुर, उदात्त स्वरूप हळुहळू दूषित होत गेलें. याचें कारण पुरुषाच्या भावनेंत व समाजस्थितींत झालेला फरक. विवाहसंस्थेंत मूलभूत मानलेल्या संततिवर्धनाच्या ध्येयाच्या दृष्टीनें संसारांत पुरुषांच्या बरोबरीनें मानलें जाणारें स्त्रीचें स्थान खालीं ढळलें. स्त्रीला न्यूनगंड व पुरुषाला अहंगंड निर्माण झाला. एक प्रकारची झोटिंगशाही संसारांत माजूं लागली. सत्तेच्या अतिरेकानें पुरुषाचा व गुलामगिरीनें स्त्रीचा नैतिक ऱ्हास होत जाऊन विवाहसंस्था ही असमाधान, कलह, दुःख यांची बजबजपुरी होऊन राहिली.

स्त्रीपुरुषांचे एकमेकांशी पूर्वापार असलेले संबंध व भावना असे उलथे-पालथे करून टाकण्याला जबाबदार अलीकडची अर्थप्रधान समाजरचना होय असें मला वाटतें.

पाश्चिमात्य राष्ट्रांत काय किंवा हिंदुस्थानांत काय, प्राचीन काळीं केवळ अर्थोत्पादनाला हल्लींइतकें महत्त्व नसावें. आपल्या हिंदु संस्कृतीप्रमाणें धर्मार्थ-काममोक्ष या पुरुषार्थचतुष्टयासाठी विवाह करावयाचा असे. पण महाभारतांत म्हटल्याप्रमाणे कलियुगांत धर्म एकाच पायावर उभा असतो; द्वापार युगाची छाया अद्याप आहे म्हणून धर्माचे अर्थ व काम हे दोन्ही पाय काम देत आहेत; पण कांहीं दिवसांनीं तो फक्त 'कामा'वर अवलंबून राहील व सगळी-कडे स्वैराचार माजेल ही जी भीति धर्मश्रद्धाळू लोकांस वाटत आहे त्यांत बराच सत्यांश आहे, हें अलीकडच्या विवाहसंस्थेच्या स्वरूपावरून लक्षांत येईल. सारांश हल्लीं अर्थाला फार महत्त्व आलें आहे. मूळ विवाहाच्या शपथेंत पतिला "धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि" असा तिन्ही गोष्टींचा उल्लेख करावा लागे. पतिपत्नींच्या शारीरिक इच्छा एकमेकांच्या ठिकाणीं पूर्ण व्हाव्या, प्रजापालनासाठीं पुरुषानें अर्थ संपादन करावा; दोघांनीं मिळून धर्माचें आचरण करावें—म्हणजे आपल्या पुढच्या समकालीन व मागील पिढ्यांविषयींचीं कर्तव्यें एकमेकांच्या सहकार्यानें पार पाडावीं असा विवाहाचा

उद्देश होता. यांतील सहकार्याचा मुद्दा लक्षांत घेण्याजोगा आहे. पतीचीं सुख-दुःखें, कर्तव्ये व जबाबदाऱ्या पत्नीनें वांटून घ्यावयाच्या असत. तेव्हां अहं किंवा न्यूनगंडाचा प्रश्नच नव्हता. संसार चालवणारी गृहलक्ष्मी, आपल्या मुलांची माता म्हणून पति तिला बरोबरीच्या नात्यानें मान देई. ती प्रत्यक्ष अर्थोत्पादन करीत नाहीं म्हणून ती आपल्यापेक्षां कमी दर्जाची आहे; ती आपल्यावर पोटासाठीं अवलंबून आहे म्हणून ती आपला एक प्रकारें गुलाम आहे, ही भावना प्राचीन हिंदु किंवा पाश्चात्य समाजांत नव्हती; म्हणून संसार गोडीगुलाबीचे होत व विवाहसंस्था ही एक लोभनीय व सुखनिधान अशी स्थिति मानली जाई.

पण हल्लींचे समाज—पाश्चिमात्य व पौर्वात्य—हे अर्थप्रधान समाज आहेत. ज्याच्या हाती ससा तो पारधी; ज्याच्यापाशी अर्थसंचय पुष्कळ तो मान्य व श्रेष्ठ; ज्या राष्ट्रांत अर्थोत्पादनक्षमता जास्त ते राष्ट्र श्रेष्ठ अशीं समीकरणें बसविली जात आहेत, व त्यांबरहुकूम राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय व्यवहार सुरू आहेत. हेंच समीकरण विवाहसंस्थेलाही लागू केलें जात आहे. अर्थोत्पादनक्षम पुरुष हा संसाराचा सत्ताधारी व निव्वळ उदरभरणासाठीं पुरुषावर अवलंबून असलेली स्त्री—मग ती घरांत कितीही खपो, कितीही जोखमीचीं, जबाबदारीची कामें पार पाडो त्यांपासून प्रत्यक्ष अर्थोत्पादन होत नसल्यामुळें ते श्रम फुकट जाऊन ती—त्याची गुलाम, त्याच्या गळ्याभोंवती बांधलेलें लोढणें ठरली. पुरुष तिला बरोबरीच्या नात्यानें मान देईनासा झाला; शारीरिक गरज भागवणारी, मुलांबाळांच्या खस्ता खाणारी, घरांतील बारीक-सारीक काबाडकष्ट करणारी, एक हलक्या दर्जाची नोकर यापलीकडे तिची किंमत उरली नाहीं; त्यामुळें साहजिकच तिच्या मानसिक, बौद्धिक उन्नतीकडे दुर्लक्ष होऊं लागलें. ज्या गोष्टींचा उपयोग नाहीं त्या गोष्टी, ती इंद्रियें हळु-हळू झडत जातात हा निसर्गाचा, उत्क्रांतीचा नियमच आहे. स्त्रीला रोजच्या निर्जीव, यांत्रिक, बुद्धिहीन काबाडकष्टांना आवश्यक नसलेली बुद्धि व ज्ञान हीं हळुहळू कमी होऊन शेवटीं नाश पावलीं. त्यामुळें स्त्रिया या पुरुषांहून बुद्धीनें कनिष्ठ आहेत असें ठरून गेलें. बुद्धिहीन, असमंजस स्त्रियांपासून राहिलेसाहिलेले सामाजिक हक्क हिसकावून घेण्यांत आले. स्वतंत्ररीत्या माल-मत्तेची व्यवस्था पाहण्याइतकें व्यवहारज्ञान त्यांना नाहीं असें ठरून त्यांचा

मालमत्तेवरील वारसा हक्क काढून घेण्यांत आला. मुलांना वळण लावण्याइतकें बौद्धिक सामर्थ्य उरलें नसल्यामुळें, स्वतःच्या मुलांवरचा त्यांचा पालकत्वाचा हक्क नाहींसा झाला. पुरुष सांगेल तें व घरांत पडेल तें काम करणें, पुरुषाच्या व मुलांबाळांच्या खस्ता प्रामाणिकपणें खाणें—हेंच स्त्रीचें संसारांतील काम व स्थान ठरलें. अर्थात् आतां पुरुषाच्या दृष्टीनें विवाहाचा उद्देश फक्त एवढाच राहिला: कामशांति व कितीही वाईट वागवलें किंवा कितीही कष्ट घेतले तरी कधीही निघून न जाणारा, हक्काचा व प्रामाणिक नौकर मिळवणें. इंग्रजींत म्हण आहेच की, पुरुष एवढ्यासाठीं लग्न करतो की "आपण शहाणे आहोंत असें मानणारा व म्हणणारा एक तरी मूर्ख नेहमी खात्रीचा जवळ असावा" (A man marries to make sure of a fool to tell him that he is wise.) आणि स्त्री—स्त्री कशासाठी विवाह करते? स्त्रीच्या दृष्टीनें विवाह हा तिचा एकमेव तरणोपाय व उपजीविकेचा मार्ग ठरला. बौद्धिक ऱ्हासामुळें, व्यवहारशून्यतेमुळें घराबाहेर पडण्याच्या भीतीमुळें दुसऱ्या कुठल्याही रीतीनें उदरनिर्वाह करणें तिला शक्य नसल्यामुळें उदरभरणाचा एकमेव धंदा हा तिच्या दृष्टीनें विवाहाचा अर्थ व विवाहाचें ध्येय ठरलें. विवाहापूर्वी लग्नाच्या बाजारांत आपल्याला चांगली मागणी यावी म्हणून प्रयत्न करावा. पाश्चात्य मुली पुरुषाच्या डोळ्यांत भरण्यासाठीं आपल्याला जास्त जास्त आकर्षक व लोभनीय करण्यासाठी झटतात, तर हिंदु मुली पुरुषांना आवडणारे विनय, आज्ञाधारकपणा, गरीब स्वभाव, सोशीकपणा वगैरे गुण अंगी आणण्याचा प्रयत्न करून, आपल्या धंद्याला उपयोगीं पडणारे —स्वयंपाक करणें व इतर धुणंपाणी वगैरे कष्टांचा अभ्यास ठेवणें—विषय शिकत असतात. विवाहानंतर आपलें स्वतंत्र अस्तित्व, निव्वळ माणुसकीही, विसरून जाऊन संसाराचा गाडा मालकाच्या मर्जीनुरूप प्रामाणिकपणें व सोशीकपणें ओढणें हें पत्नीचें विवाहोत्तर कर्तव्य व ध्येय ठरलें!

काय हें विवाहसंस्थेच्या स्वरूपाचें व ध्येयाचें भीषण विडंबन! मनुष्य मनुष्याची किती विटंबना करूं शकतो, त्याला अधोगतीच्या शेवटच्या पायरीपर्यंत किती खोल ढकलूं शकतो, याचें मूर्तिमंत उदाहरण म्हणजे हल्लींच्या विवाहसंस्थेनें घडवलेली स्त्री.

समाजांतलें आपलें ढळलेलें स्थान व त्यामुळें आपली पुरुषांच्या लेखीं

झालेली शून्य किंमत स्त्रीवर्गाच्या लक्षांत आल्याबरोबर विवाहसंस्थेविरुद्ध बंड सुरू झालीं. आतां अशा वैवाहिक जीवनांतसुद्धां सुखी अशा स्त्रिया नव्हत्या असें नव्हे; पण जोंवर आपलें मानाचें स्थान संसारांत निश्चित ठरलें नाहीं, तोंवर नुसतें सुखोपभोग भोगीत बसणें, नवऱ्याच्या भोगदासी होऊन मेलेलें अन्न खाणें, अभिमान जागृत झाल्यामुळें स्त्रियांना आतां शक्य नव्हतें. आपण 'आपला आपला' म्हणून ममत्वानें करीत असलेला संसार आपल्या हक्काचा नसून, आपल्या दृष्टीनें तो निव्वळ एक भातुकलीचा खेळ आहे, अशी भावना देशांदेशांतून स्त्रियांच्या अंतःकरणांत एकदम प्रज्वलित झाली. "A Doll's House" सारख्या ललित रचनेंतून Subjection of Women; A Vindication सारख्या गंभीर प्रबंधांतून या बंडाला तोंड फुटूं लागलें, व हळुहळू स्त्रियांमध्यें प्रत्यक्ष आंदोलनही स्वाधीनतेसाठी सुरू झालें. पुरुष प्रथम तर हा सर्व प्रकार पाहून आश्चर्यानें स्तिमितच झाले. स्त्रियांना काय पाहिजे आहे हेंच त्यांना समजेना. A Doll's House मध्यें बंड पुकारलेल्या नोराला तिचा नवरा म्हणतो, "असं काय करतेस् तूं? तुला सुखांत नाहीं का वरं ठेवलं मी आजपर्यंत!" पण नोराचे समाधान इतःपर नुसते चांगले कपडे ल्यायल्याने, नाचकरमणुकीनें किंवा नाताळच्या मेजवान्यांनी होण्याजोगें नव्हतें. ती उत्तर करते, "सुखी? छे, छे, सुखी कधीच नव्हते मी खरी. फक्त चैनीत मात्र होते." आजकालसुद्धां पुष्कळ पुरुषांना उंची कपडेलत्ते घेऊन पोराबाळांच्या हौशी पुरवून, फुलांतल्यासारख्या आपण बायकांना ठेवीत असतांना त्या एकाद्या दिवसभर घाम गाळून पोटापुरतें मिळवून खाणाऱ्या स्वतंत्र स्त्रीचा हेवा कां करितात हें उमजत नाही. किंबहुना आयतें चैनीनें खायप्यायला मिळत असतांना श्रमजीवनाची कुणी कां इच्छा करावी ते त्यांना समजत नाहीं. मात्र एकाद्या पुरुषाला 'मढलेल्या वृक्षांतल्या' नवऱ्याप्रमाणें बायकोवर पोटासाठीं अवलंबून राहण्याची वेळ आली तर मात्र त्याचे डोळे खाडकन् उघडत असतील. परंतु अर्थात् याचें खरें कारण ते स्वतःपाशींसुद्धां कबूल करणार नाहीत. निसर्गाच्या नियमाप्रमाणें पुरुष हा नेहमीं अर्थार्जन करणारा व स्त्री ही घरीं राहून जन्मधारणपोषण करणारी असली पाहिजे, असे आपलें समर्थन ते करूं लागतील.

पण या कोटिक्रमांत कांहीं अर्थ नाही हे स्त्रियांना अनेक वर्षांच्या

अनुभवांनी कळून चुकलें आहे. स्त्रियांना नकली मान व स्त्रीदाक्षिण्य नको आहे; तसेंच घरांत गुलामाच्या हुद्यानें राहणेंही नको आहे: त्यांना पुरुषांच्या बरोबरीने मानांत, कामांत, व संसारांत स्थान हवें आहे.

आपल्या हिंदु विवाहांतील सप्तपदींतील मंत्रांतही हाच सहकारितेचा मुद्दा अभिप्रेत आहे. वर म्हणतो, " माझ्याबरोबर सात पावले तूं टाकलीं आहेस तेव्हां तूं माझी संसाराची भागीदार हो. तुझ्याशिवाय मला अस्तित्व नाही, व माझ्याशिवाय तुलाही नाही. आपण दोघे एकत्र राहू, आपण एकमेकांचा प्रीतिविषय बनूं. आपण एकमेकांमध्ये आनद करूं, सलोख्याने, एकोप्याने आपण एकत्र राहूं व सर्व पदार्थांचा व सत्तेचा समान हक्कानें उपभोग घेऊं. "

आधुनिक अर्थप्रधान समाजव्यवस्थेंत स्त्रीला वर वर्णिलेलें बरोबरीचें स्थान पुरुषाच्या संसारांत प्राप्त होण्यास तिला कुटुंबांत व समाजांत स्वतंत्र आर्थिक दर्जा मिळवला पाहिजे. हें आर्थिक स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचे मार्ग दोन आहेत. एक तर योग्य शिक्षण घेऊन अर्थार्जन करण्यास समर्थ होणे, व वेळ पडल्यास अर्थार्जन करणें, व दुसरे पुरुषाप्रमाणें स्त्रीचा मालमत्तेवर संपूर्ण मालकीनें वारसाहक्क प्रस्थापित होईल असे करणे. ह्या दोन्ही गोष्टी साध्य होऊन स्त्रीला आर्थिक दर्जा मिळाला म्हणजे संसारांत तिला मान मिळू लागेल. तिच्या व्यक्तिमत्वाचा उत्कर्ष होईल; पुरुषाला कठिण जीवनकलहांत कर्तृत्ववान् भागीदार मिळून दोघे पूर्ण सुखी होतील. विवाहसंस्थेला तिचे पूर्वींचे उज्ज्वल स्वरूप परत येईल व राष्ट्राचा परिणामीं उत्कर्ष होईल.

---

प्रकरण ८ वें : : :

## .... .... स्त्रीशिक्षण

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । असा आमचा परमपवित्र ग्रंथ म्हणतो. ज्ञानासारखें पवित्र दुसरें जगांत कांही नाहीं; ज्ञानावाचून मनुष्याला श्रेष्ठत्व नाहीं; ज्याला ज्ञान नाहीं त्याला पशूहून श्रेष्ठ कां समजावें?

ज्ञानार्जनानें मनुष्य आपली मानवी बुद्धि, सदसद्विवेकशक्ति यांना योग्य वळण लावूं शकतो व स्वतःचें जीवन उज्ज्वल करून आपल्या अंतेवासीयांच्या जीवनास कर्णधारवत् होतो. अर्थात् जीवनाची—स्वतःच्या व दुसऱ्याच्या—आदर्श रूपरेखा आखण्यास लागणारें ज्ञान हें मूलतः एकाच चित्स्वरूपाचें असलें तरी कालमानानें त्याचें बाह्य स्वरूप व व्यापकत्व पालटणारच; याच कारणामुळें इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर शिक्षणाची नवीन योजना आंखण्याची जरूरी राज्यकर्त्यांस वाटू लागली व ती एतद्देशीयांसही पटली. नाहीं तर पेशवाईतील व काशीसारख्या विख्यात ज्ञानवापींतील दशग्रंथी विद्वत्ता इंग्रजी अंमल सुरू झाला तेव्हांसुद्धां जागृत होतीच; पण काळ बदलल्यामुळे समाजाची घडी विस्कटली असल्यामुळें पूर्वीची घटपटादि खटपट अव्यवहार्य व अनवश्यक वाटूं लागली. हिंदी लोकांना नव्या राज्यांत तिच्या-पासून कांहीं फायदा होण्याचा संभव नव्हता व इंग्रजांना तर त्यांत कांहींच गम्य नव्हतें; तेव्हां ज्या राष्ट्राचें पालकत्व आपल्या शिरावर घेतल्याचें बिरुद आपण मिरवतों त्या राष्ट्राविषयींचें एक पवित्र कर्तृत्व म्हणून तत्त्वतः पण मुख्यत्वें आपल्या राज्याचा गाडा हांकण्याचें नुसतें भारवाही काम करण्यास इथल्याइथेंच सुशिक्षित नौकर तयार झाल्यास जास्त सोयीचें पडेल, या पोक्त विचारानें हिंदुस्थानासाठीं एक शिक्षणयोजना आंखण्याचें इंग्रज सरकारनें ठरवलें. १८२६ मध्यें सर टॉमस मन्रो साहेबांनीं मद्रास इलाख्यापुरती एक शैक्षणिक योजना आंखून ती ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांना सादर केली होतीच. सर्व हिंदुस्थानसाठीं एक शैक्षणिक योजना आंखणें हें परिणामीं आपणांस फायद्याचेंच आहे हें ओळखून राज्यकर्त्यांनीं तशी योजना आंखण्यास सुरुवात केली व १८३५ सालीं मेकॉलेसाहेबांचें शिक्षणविषयक प्रसिद्ध टिपण बाहेर पडलें.

अर्थात् वर दिग्दर्शित केल्याप्रमाणे हिंदुस्थानांत, त्या वेळी शिक्षणाच्या सोयी व शाळा नव्हत्या असें नाहीं. संस्कृत ब्राह्मणी वळणाचें शिक्षण हिंदुस्थानांत फार पूर्वीपासून दिलें जात होतें. रे. केर्डीच्या मतें हें शिक्षण यूरोपामध्यें पुन-रुज्जीवनाच्या (Revival of Learning) पूर्वी ज्या प्रकारचें शिक्षण प्रचलित होतें त्यापेक्षां खात्रीनें कमी दर्जाचें नव्हतें. क्षत्रिय व वैश्य लोकांकरतां सुद्धां जरा खालच्या दर्जाचें पण उपयोगीं शिक्षण होतें. कृष्ण बलरामांनीं गुरुगृहीं

चौसष्ट विद्यांचा व कलांचा अभ्यास केला असें आपण वाचतो. इंग्रजी अंमलाचे वेळींही जुनी संस्कृतविद्या पढवणाऱ्या शाळा देशभर होत्या. आंकड्यांवरून असें दिसतें कीं, फक्त बंगाल व बिहारमध्येंच एक लक्ष शाळा होत्या; म्हणजे प्रत्येक चारशें माणसांच्या वस्तीच्या खेडगांवाला एक शाळा होती असें सरासरीनें म्हणतां येईल. या शाळा अर्थात् देशी पद्धतीच्या, धार्मिक कलाच्या व बाळबोध वळणाच्या होत्या. पण इंग्रजी अंमलांत इंग्रजी ही सरकारदरबारची भाषा ठरली. इंग्रजी भाषा शिकलेले नौकर राज्ययंत्रावरची तांबडी फीत सांभाळण्यासाठी हवे असल्यामुळें मेकॉले साहेबांनी नवीन इंग्रजी शाळांतून इंग्रजी हे शिक्षणाचें माध्यम असावें अशी घोषणा केली आणि देशी व संस्कृत ज्ञानावर तिरस्काराचे शिंतोडे उडवले. (एतद्देशीय सर्व वाङ्मय एकत्र केलें तरी त्याला पाश्चात्य वाङ्मयांतील पुस्तकांच्या एका चळतीचीही सर येणार नाही असें मेकॉलेसाहेबांनी लिहून ठेविलें आहे!) यामुळें साहजिकच देशी भाषांच्या माध्यमांतून देशी वाङ्मय शिकवणाऱ्या या शाळांची सद्दी कमी होत चालली; त्यांत दिलें जाणारें शिक्षण निरर्थक व हास्यास्पद ठरूं लागलें. वास्तविक पाहतां ही नवीन शिक्षणयोजना चुकीच्या तत्त्वावर आंखली गेली असें अनुभवानें आतां सिद्ध झालें आहे. जुन्याच पद्धतीत बदलत्या कालमानाला अनुसरून इष्ट ते फरक करून ती जास्त व्यापक करणें व वाढत्या ज्ञानानुरूप देशी भाषांतून अभिजात व शास्त्रीय वाङ्मयाची अभिवृद्धि होण्यास प्रोत्साहन देणें—ही परिणामीं अत्यंत हितकारक पण लांबट व जास्त कष्टदायक योजना परकीय राज्यकर्त्यांना सुचणें व पटणें शक्य नव्हतें. त्यांनीं आपल्याला परिचित, सोयिस्कर व तात्कालिक फायदेशीर अशा पद्धतीनें इंग्रजी माध्यमांतून विलायती तऱ्हेचें शिक्षण देण्यास सुरुवात केली. देशी भाषा, हिंदी संस्कृति, हिंदी धर्म व तत्त्वज्ञान मागें पडले व हळुहळू नामशेष होण्याच्या पंथाला लागलें. खेडेगांवांतील अरबी व संस्कृत शाळा बंद पडल्या. नवें इंग्रजी शिक्षण खेडोपाडीं पसरण्यास अद्याप पुष्कळ अवधि होता; मध्यंतरींच्या काळांत खेडेगांवांतला बहुजनसमाज निरक्षर, अडाणी, पुराणप्रिय व धर्मभोळा बनत चालला.

जे शहरांतून नवें शिक्षण घेऊं लागले त्यांचीही सांस्कृतिक प्रगति मोठीशी स्पृहणीय होती असें नाही. नवीन पद्धतीप्रमाणें परीक्षा पास होणें व

सरकारी नौकरी मिळवणें हा शिक्षणाचा उद्देश ठरला; परीक्षेंत उत्तीर्ण होण्यासाठीं ठराविक घोकंपट्टी केली की काम भागे; तेव्हां साहजिकच शिक्षणाचें सांस्कृतिक ध्येय डोळ्यांआड होऊं लागलें. धार्मिक व आध्यात्मिक गोष्टींची शालेय शिक्षणापासून फारकत झाली. इंग्रजी माध्यमानें देशी भाषा व देशी कला मागें पडल्या. शाळा-कॉलेजांतलें शिक्षण म्हणजे नौकरी मिळवण्याचें एक साधन ही शिक्षणाची व्याख्या होऊन राहिली.

अर्थातच स्त्रियांनीं शिक्षण घेण्याची कल्पना मागें पडली. स्त्रियांना काही नौकऱ्या करावयाच्या नसल्यामुळे त्यांनीं तत्कालीन शालेय शिक्षण घेण्यांत अर्थच नव्हता. "बायकाना शिकून काय करायचें आहे? त्यांना पुरुषांसारख्या नोकऱ्या थोड्याच करावयाच्या आहेत?" हा वाक्प्रचार गरीबांपासून तो थोरामोठ्यांपर्यंत रूढ होऊन बसला. शिक्षणानें मानसिक, बौद्धिक उन्नति होते ही विचारसरणी लोक अजिबात विसरून गेले. याप्रमाणें कोणतेंच शिक्षण स्त्रियांना मिळेनासें झालें; नवीन जरूर नाहीं म्हणून व जुनें बाळबोध वळणाचें नष्टच झाले म्हणून. शिक्षणाभावामुळे स्त्री ही अशिक्षित, कोत्या विचारांची, संकुचित मनोवृत्तीची, अंधश्रद्धेला व वेड्या समजुतींना बळी पडणारी अशी बनत गेली. या मानसिक व बौद्धिक ऱ्हासानें स्त्रीची किंमत साहजिकच कुटुंबांत व समाजांत कमी होत गेली. पूर्वी पढिक ज्ञाना-पेक्षां अनुभविक ज्ञानाला किंमत असे; म्हणून घरांतील वृद्ध स्त्रियांच्या शब्दाला घरांतले कर्तेसवरते पुरुष मान देत. पण विलायती पुस्तकी शिक्षणानें अनुभवजन्य ज्ञानाची किंमत शून्य झाली; व स्त्रियांच्या अकलेला चुलीपलीकडे कोणी विचारीनासें झाले. प्रत्यक्ष अर्थोत्पादन करण्यास असमर्थ, मानसिक व बौद्धिक अवनति झालेली पत्नी व माता साहजिकच केवळ शारीरिक कष्ट करणारी एक मजूर ठरली.

शिक्षणाभावानें स्त्रियांचा झालेला हा ऱ्हास, त्या ऱ्हासामुळे त्यांच्यावर व भावी पिढीवर होणारे दुष्परिणाम, समाजांतील जाणत्या पुरुषांच्या लक्षांत येईपर्यंत बरींच वर्षे लोटलीं. " जिच्या हातीं पाळण्याची दोरी, ती जगा उद्धरी " ही म्हण दिवसेंदिवस पोकळ ठरत आहे व म्हणून हिंदी राष्ट्राचें अपरंपार नुकसान होत आहे, हे समाजसुधारकांच्या पहिल्या पिढीला हळूहळू जाणवूं लागलें. हिंदुस्थानच्या राजकीय परतंत्रतेमुळें त्यांचा सर्व बाजूंनी कोंड-

मारा होऊन तो अवनत होत चालला होता ही गोष्ट खरीच; पण सामाजिक सुधारणेंत मागसल्यामुळेंही हिंदुस्थानचें पाऊल सर्वांगीण उन्नतीच्या मार्गांत पुढें पडत नाहीं हीही गोष्ट खरी आहे. तौलनिकदृष्टया राजकीय सुधारणेपेक्षां सामाजिक सुधारणा घडवून आणणें आपल्या हातांत आहे; ही सुधारणा घडवून आणण्यासाठी हिंदुस्थानांतील आद्य समाजसुधारकांनी चंग बांधला. समाजांत दृढमूल झालेल्या स्त्रियांच्या उन्नतीला अनिष्ट अशा बालविवाह, विधवासंन्यास वगैरे चालींचा बींमोड करतांना सुधारकांना असे आढळून आलें कीं, स्त्रिया याच स्त्रियांच्या सर्वांत मोठ्या शत्रू आहेत. स्त्रीसुधारणेच्या मार्गांत स्त्रियाच सर्वांत मोठी धोंड आहे. कारण स्त्रिया अशिक्षित असल्यानें त्यांची मानसिक वाढ खुंटते व सारासार विचारशक्तीची धार बोथट होते. ' जुनें ते सोनें ' म्हणून सर्व जुन्या समजुती, चालीरीति, स्वहिताला परिणामीं विघातक असल्या तरी स्त्रिया उराशीं कवटाळून बसतात. याप्रमाणे अर्धा समाज स्वतः मागसलेला व पुरोगामी अर्ध्या समाजाला मागें खेचणारा असला तर समाजसुधारणा कशी होऊं शकणार ? तेव्हां सुधारकाग्रणींनीं स्त्री-सुधारणेसाठी प्रथम स्त्रीशिक्षणावर भर देण्याचे व तदनुकूल जागृति समाजांत करण्याचें प्रथम ठरवलें.

वास्तविक पाहतां स्त्रीशिक्षणाचें महत्त्व समाजास पटवणे फार जड जाऊं नये; कारण स्त्री ही समाजांतली मोठी शक्ति आहे. ती समाजाचें उत्तमांग, निदान अर्धांग तरी आहे. कुटुंबराज्याची ती स्वामिनी आहे. सत्ताधीश, बुद्धिकर्कश पुरुषाला भावनांच्या धाग्यांत गुरफटून टाकणारी मोहिनी आहे. नवीन पिढीला जन्म देणारी, वाढवणारी व वळवणारी प्रचंड शक्ति आहे. इतका जबरदस्त ताबा समाजावर गाजवू शकणारी स्त्री सुबुद्ध व सुशिक्षित नसून कसें चालेल ? शिवाय हिंदुस्थानांत अज्ञान हें स्त्रियांच्या भालीं कांहीं अनादि कालापासून लिहिलेलें नाहीं. विद्येची देवता शारदा म्हणजे एक स्त्री आहे असें आपले पूर्वज मानीत. यावरून शिक्षणाचा व स्त्रियांचा किती निकटसंबंध आर्य मानीत हे उघड दिसते. मागे एका प्रकरणांत आपण पाहिलेंच कीं, आपले आद्य धर्मग्रंथ जे वेद त्यांच्या रचनेंत स्त्रिया अंशभागी आहेत; हें ग्रंथकर्तृत्व गाढ विद्वत्तेशिवाय आलें असेल काय ? गार्गी, मैत्रेयी, सुलभा या ब्रह्मद्रष्टया,

वादविवादपटु विदुषी केवळ अपवादात्मक होत्या असें कांहीं लोकांच्या मताप्रमाणें मानलें तरी सर्वच स्त्रियांचें उपनयन करून त्यांना गुरुगृहीं अध्ययनाला पाठवीत हें तर स्पष्टच आहे. कांही स्त्रिया लग्नासाठीं जुजबी शिक्षण घेणाऱ्या सद्योद्वाहा असल्या तरी बऱ्याच आजन्म ज्ञानयज्ञाला वाहून घेणाऱ्या असत हे 'ब्रह्मवादिनी' या स्वतंत्र रूढ झालेल्या संज्ञेवरून उघड दिसत नाहीं काय? पुराणकालीं सुद्धां स्त्रिया सुजाण, धर्माधर्म जाणणाऱ्या, मुलांना योग्य वळण लावून समाजहित साधणाऱ्या होत्या असें कुंती, द्रौपदी, विदुला यांच्या उदाहरणांवरून दिसते. इतिहासकालांतसुद्धा स्त्रियांनीं इतिहासाची कित्येक पानें आपल्या कर्तृत्वानें उज्ज्वल करून ठेवली आहेत. चांदबिबी, नूरजहान, अहल्याबाई, जिजाबाई, ताराबाई, लक्ष्मीबाईसारख्या शूर, मुत्सद्दी, राज्यकार्यधुरंधर, धोरणी स्त्रियांनी पुरुषांना तोंडांत बोट घालण्याजोगें कर्तृत्व करून दाखवलें ते काय, त्या त्या क्षेत्रांतील यथायोग्य शिक्षणाच्या परंपरेवाचून? मुसलमानी अमलांतील पडद्याच्या चालीच्या जबरदस्त अडथळ्यांतूनही ठिकठिकाणी स्त्रियांचें कर्तृत्व चमकतच राहिलें. इंग्रजी अंमलाचे सुमारासही मुलींच्या शाळा गांवोगांवी तुरळक होत्याच. दिल्लीत ब्रिटिश अंमल सुरू होण्याचे सुमारास पंजाबी स्त्रियांनी चालवलेल्या सहा मुलींच्या शाळा होत्या असें म्हणतात. पण इंग्रजी कारकीर्द सुरू झाल्यावर सरकारी प्रोत्साहनाच्या अभावी प्रत्यक्ष आर्थिक उपयुक्तता नष्ट होऊन या सर्व शाळा बंद पडल्या.

याप्रमाणें तौलनिक दृष्ट्या ब्रिटिश कारकीर्दीतच स्त्रियांच्या कर्तृत्वाला व शिक्षणाला हरताळ फासण्यास सुरुवात झाली असें म्हटलें पाहिजे. सकृद्दर्शनी ही गोष्ट विरोधाभासात्मक वाटेल; ज्या विलायतेंत स्त्रिया या फार पुढारलेल्या, स्वतंत्र, कर्तबगार आहेत असें आपण ऐकतो; सदैव सूर्यप्रकाशांत तळपणाऱ्या ज्या साम्राज्यावर एक राणी राज्य करिते त्या सत्तेच्या अंमलाखालीं हिंदुस्थानांत स्त्रियांच्या कर्तृत्वाला पायबंद बसला हें कसें काय? ही गोष्ट विचित्र वाटली तरी, इंग्रजी राज्याच्या पहिल्या कालखंडांत ती घडून आली हें मात्र खरें आहे. याचीं कारणें दोन आहेत. एक तर इंग्रजी राज्यकर्ते स्वतःच्या मायभूमींत उदारमतवादी व स्त्रीदाक्षिण्यपरिपूर्ण असले तरी हिंदी संस्कृति, आचारविचार, श्रद्धा, रूढि यांच्याशीं ते पूर्ण अपरिचित असल्यामुळें येथील शिक्षणयोजना आंखतांना त्यांचा गोंधळ उडावा व दिशाभूल व्हावी

हे साहजिक आहे. सर्व हिंदुस्थानसाठी एक शिक्षणयोजना आंखण्याचा उपक्रम सरकारनें आरंभिला तेव्हां साहजिकच स्त्रीशिक्षणाचा प्रश्न निघाला. एतद्देशीय मनोभूमिकेचा या बाबतींत स्वतःस अंदाज नसल्यामुळें मध्यवर्ती सरकारनें साहजिकच जवळच्या बंगाल देशांतील पंडितांस याविषयीं सल्लामसलत विचारली. हिंदु स्त्रियांच्या दुर्दैवानें सरकारला पक्के सनातनी पण वैदिक परंपरा सोडून 'ब्राह्मणांना' प्रमाण मानणारे पंडितच भेटले व त्यांनीं मनूच्या पट्टशिष्याला साजेलसे 'न स्त्री ज्ञानमर्हति।' "स्त्रियांना शिकविणे महत्पाप आहे; स्त्रिया शिकल्या तर त्यांचे सात पिढ्यांतील पूर्वज नरकांत जातील." असा सरकारला सल्ला दिला. हिंदी लोकांच्या धार्मिक भावना दुखवण्याला भीत असलेलें सरकार साहजिकच बिचकलें व हिंदी स्त्रियांच्या शिक्षणाचा विचार आपल्या योजनेंतून त्यानें अजिबात गाळून टाकला; हे धोरण १८५४ पर्यंत म्हणजे सर चार्लस वूडसाहेबांचा प्रसिद्ध शैक्षणिक खलिता बाहेर पडेपर्यंत चालू होते.

या स्त्रीशिक्षणाबद्दलच्या सरकारच्या व समाजांतील औदासीन्याविरुद्ध तरुण सुधारकांनी जोराची चळवळ केली. वाघिणीचें दूध पिऊन सुसंस्कृत मन व प्रगल्भ विचार बनलेल्या सुशिक्षित तरुणांना आकुंचित मनबुद्धीची, जिच्या विचारांची धाव चूलमूल, कपडे, दागिने यांपलीकडे गेली नाहीं, अशी अक्षरशत्रु पत्नी पत्करणें रुचेनासे झालें, यांत आश्चर्य नाहीं. हे उत्साही शिक्षक स्वतः आपल्या पत्नीला आपल्या हक्काच्या टीचभर खोलीत आपल्या हक्काच्या वेळांत रात्रींच्या वर्गांत शिक्षण देऊं लागले. त्या कालच्या तरुण पिढीला आपल्या जीवनाला बौद्धिक जोड लाभावी, बौद्धिक सहवास संसारांत असावा म्हणून किती तीव्र तळमळ लागली होती हें हरी नारायण आपट्यांच्या 'पण लक्षांत कोण घेतो' सारख्या कादंबऱ्यांवरून उत्कृष्ट दिसून येईल. या तरुणांच्या हौशी बायका पतीच्या प्रेमळ उत्तेजनाच्या बळावर बरीच प्रगति थोड्या काळांत करू शकत. हें शिक्षण खात्रीनें फुकट जात नसे. अशाच शिक्षणांतून कै. रमाबाई रानडेसारख्या कार्यकर्त्या स्त्रीशिक्षणाच्या कार्याला लाभल्या ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. सुधारकांनीं ख्रिश्चन मिशनच्याच्या शाळांचाही फायदा घेण्यास सुरुवात केली. आपल्या मुलींसाठी या ख्रिस्ती शाळांतून ते पाठव लागले; कारण सरकारी वा खाजगी मुलींच्या शाळा

नव्हत्याच. सुधारकांना या बाबतींत समाजाचा किती तीव्र विरोध सोसावा लागत असे याचें यथार्थ चित्र हरिभाऊंच्या 'मी', 'भयंकर दिव्य' या काद-बऱ्यांतून काढलें आहे. आधींच बहुजनसमाज स्त्रीशिक्षणाच्या तत्त्वाच्याच विरुद्ध. त्यांतून या शिकणाऱ्या मुली "अष्टवर्षा भवेत् कन्या" ची मर्यादा ओलांडून गेलेल्या; आणि तिसरें म्हणजे या मुली झगा घातलेल्या व हातांत बायबलें घेऊन येणाऱ्या मडमांपाशीं शिकत. तेव्हां त्या नास्तिक, धर्मबुडव्या होतील, त्यांनीं खाण्यापिण्याच्या बाबतींत निर्बंध सोडलाच असेल वगैरे खुळ्या समजुती सनातनी प्रामाणिकपणे खऱ्या मानीत. तेव्हां स्त्रीशिक्षण जर समाजाला कधींतरी पटेल असें करावयाचें असेल तर ते देणाऱ्या संस्था सरकारनें किंवा खाजगी एतद्देशीय प्रयत्नानेंच काढल्याशिवाय लोकांना तेथें मिळणाऱ्या शिक्षणाच्या निरुपद्रवीपणाबद्दल विश्वास पटणार नाही असें सुधारकांना हळुहळू दिसून येऊं लागलें व तसे सरकारला पटवून देण्याचा ते प्रयत्न करूं लागले. खाजगी प्रयत्नाला चालना मिळावी म्हणून १८४९ मध्ये तर एल्फिन्स्टन कॉलेजच्या कांहीं उत्साही विद्यार्थ्यांनीं "क्रियेविण वाचाळता व्यर्थ आहे" हे ओळखून स्वतःच मुंबईस एक मुलींची शाळा उघडली. त्यांत ते स्वतःच शिकवीत. आपल्या मतप्रचारासाठीं त्यांनीं एक मासिकसुद्धां प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली.

या खऱ्या चळवळीचा सरकारवर इष्ट परिणाम होऊन १८५४ च्या खलित्यांत सरकारने आपल्यावरील स्त्रीशिक्षणाची जबाबदारी मान्य करून स्त्रीशिक्षणाचें कलम जाहीर रीत्या आपल्या शैक्षणिक धोरणांत व योजनेंत घातलें. या सुमारास एकंदर हिंदुस्थानांत सुमारें ६५ मुलींच्या शाळा होत्या व त्यांत अदाजें साडेतीन हजार मुली शिक्षण घेत होत्या. सरकारनें या खाजगी शिक्षण संस्थांना मदत देण्याचें व नवीन सरकारी शिक्षणसंस्था उघडण्याचें ठरवलें. सरकारच्या या नवीन धोरणानें स्त्रीशिक्षणाचे पाऊल भराभर पुढे पडूं लागलें. खाजगी शिक्षणसंस्थांना मिळणारी सरकारी ग्रँट जरी अल्प असली तरी, आर्थिक दृष्टीपेक्षां इभ्रतीच्या दृष्टीनें स्त्रीशिक्षणाच्या चळवळीवर या सरकारी पाठिंब्याचा अत्यंत अनुकूल परिणाम झाला. सरकारला 'मा-बाप' मानणारे 'प्रेमवीरां' तील रावबहादुरांप्रमाणे अनेक सरकारी नोकर त्या काळांत होते. सरकारला आवडतें ते, खाजगी वैयक्तिक आवडीनिवडी बाजूला ठेवून बुद्ध्या करण्याकडे या लोकांचा कल फार असे. त्यामुळें स्वतःला सुधारक, एरव्हींच

गोष्टींत न म्हणवणाऱ्या रावसाहेब-रावबहादुरांनीं व त्यांच्या पुढ्यांतील इतर लुग्यासुंग्यांनीं सुद्धां आपल्या मुली भराभर सरकारी शाळांतून घालण्यास सुरुवात केली. पंजाबमध्ये आर्य व ब्राह्मोसमाज यांनी काढलेल्या मुलींच्या शाळांकडे पूर्वी कुणी ढुंकूनही पाहात नसे. त्यांच्या शाळा आतां भरून जाऊं लागल्या. झनानावर्ग, नॉर्मल क्लास ठिकठिकाणीं नवे उघडूं लागले व जुन्यांचे सख्याबल वाढूं लागलें. प्रथम मिल ख्राइस्ट ट्रस्ट आणि मिस् कार्पेंटरची नॅशनल इंडियन असोसिएशनसारख्या परकीय संस्था व बव्हंशीं परकी मंडळीच शिक्षणाच्या कार्याला मदत करीत. पण आतां देशी मंडळीसुद्धां वरच्या साहेबाच्या हास्यवदनाच्या व शाबासकीच्या आशेनें मोठमोठे आंकडे टाकूं लागली व स्त्री-शिक्षणाचे गाडें एकदांचे मार्गाला लागलें.

मिशनऱ्यांनीं काढलेल्या शाळा, सरकारी शाळा व समाजसुधारणेसाठी लागणाऱ्या समाजसेवकांच्या अविश्रांत परिश्रमानें चालणाऱ्या खाजगी शाळा या सर्वांमधून हजारों मुली शिकूं लागल्या व स्त्रियांची साक्षरता भराभर वाढूं लागली. महाराष्ट्रांतील शिक्षणप्रसाराचें श्रेय पंडिता रमाबाई, रमाबाई रानडे, प्रो. कर्वे इत्यादि शिक्षणप्रेमीयांस विशेषतः दिलें पाहिजे.

पंडिता रमाबाई प्रथम 'संस्कृत पण्डिता' म्हणून प्रसिद्धीस आल्या. त्यांचा जीवनवृत्तांत मोठा मनोरंजक व उद्बोधक आहे. अडचणीशीं, दारिद्र्याशीं झगडून त्यांनीं आपल्या पित्यापाशीं आपला संस्कृत अभ्यासक्रम पुरा केला होता. सबंध हिंदुस्थानभर त्या प्रवचनें करीत व वादविवाद करीत हिंडल्या. ठिकठिकाणीं शास्त्रीपंडितांनीं त्यांचा सन्मान केला व मुक्तकंठानें त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं. पुण्यास मिस् सोराबजीशीं त्यांची भेट झाली. मिस् सोराबजींच्या उदाहरणानें व प्रोत्साहनानें त्यांनीं विधवांसाठीं एक शाळा व वसतिगृह उघडलें. आमचे बोलघेवडे विद्वान् जोंवर पंडिताबाई वेदोपनिषदांतून विधवांच्या सुस्थितीबद्दलचे दाखले भराभर प्रवचनांतून म्हणून दाखवीत होत्या तोंवर नंदीबैलासारखे माना डोलवीत होते. पण तें पांडित्य कृतींत चमकूं लागल्याबरोबर त्यांचें धाबें दणाणून गेलें. स्तुत्य व अत्यंत उपयुक्त कार्य करीत असलेल्या या समाजसेविकेचा अतोनात छळ झाला; शेवटीं हिंदूंच्या असहिष्णुतेला व अनुदार वृत्तीला कंटाळून पंडिताबाईनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. त्यांचें शिक्षणविषयक कार्य सुरू होतेंच; पण 'सेवासदना'चें आतां 'मुक्ति-

सदन' झाल्यामुळें आधींच साशंक वृत्तीनें संस्थेकडे पाहणारा समाज जास्तच बिथरला व अमोल शिक्षणसेविकेला हिंदु स्त्रीसमाज जवळजवळ मुकल्यासारखा झाला.

कै. रमाबाई रानडे यांचे अनाथ विधवा स्त्रियांना उपयुक्त शिक्षण देणारें 'सेवासदन' प्रसिद्धच आहे. इतकें उपयुक्त काम करणाऱ्या या धर्तीच्या संस्था साऱ्या हिंदुस्थानांत हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच भरतील असें वाटतें. हजारो विधवा स्त्रिया आज सेवासदनांत मिळालेल्या औद्योगिक शिक्षणाने स्वावलंबी होऊन आपापली पोटें भरीत आहेत; सेवासदनास व पूज्य 'वहिनीसाहेबां'स दुवा देत आहेत. सेवासदनाच्या ऐन भरभराटीच्या दिवसांत पुण्यांत मंडई करावयास निघालेले पेन्शनर परस्परांस असे सवाल करतांना ऐकूं येत 'कां, स्वयंपाकाला बाई अजून मिळाली कीं नाहीं?' 'छे हो, बाया मिळायची भारी पंचाईत झाली आहे बुवा आतांशा; अहो हें सेवासदन निघालें आहे ना! जी बाई उठली ती चालली पाटीपुस्तक, नाहीं तर लोंकरसुया घेऊन सेवासदनांत!' यावरून हिंदु विधवांच्या कपाळींचें पोळपाटलाटणें सोडवून त्यांच्या स्वाभिमानाला पोषक असे धंदे सेवासदनानें त्यांना उपलब्ध करून दिलें हें उघड दिसतें.

मिस् सोराबजींनींही पुण्यांत हायस्कूल काढून फार उत्तम शैक्षणिक कार्य केलें; हंटर कमिशननें आपल्या रिपोर्टांत त्यांच्या कामाचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे.

महाराष्ट्रेतर इतर प्रांतांतही अनेक उपयुक्त शिक्षणसंस्था आपापल्यापरी उत्तम कार्य करीत होत्या. राजा राममोहन रॉयांनीं बंगाल्यांत स्त्रीशिक्षणासाठीं फार खटपट केली. स. १८४९ त बेथ्यूनसाहेबांनीं कलकत्त्यांत हिंदु मुलींसाठीं हायस्कूल काढलें व लॉर्ड डलहौसीकरवीं कौन्सिलकडून मुलांबरोबर मुलींच्याही शिक्षणासाठीं पैसा बाजूस काढून ठेवण्याचें आश्वासन घेतलें. या बेथ्यून स्कूलचें १८७९ मध्यें स्त्रियांच्या कॉलेजमध्यें रूपांतर झालें. हिंदुस्थानांतील हें पहिलेंच स्त्रियांचें आदर्श कॉलेज. मद्रासमध्यें तर स्त्रीशिक्षण फार झपाट्यानें वाढीस लागलें.

सालोसालच्या आंकड्यांवरून स्त्रीशिक्षणाची प्रगति हळुहळूं कशी होत गेली हें दिसून येईल. १८७७-७८ मध्यें फक्त ६६,६१५ मुली ब्रिटिश

हिंदुस्थानांत शिक्षण घेत होत्या. १८८२-८३ मध्यें ही संख्या दुपटीच्या वर गेली. या सालीं ३४८७ शाळांतून १६२,३०७ मुली शिकत होत्या. मध्यंतरीं शिक्षणयोजनेंत सुधारणा सुचवण्यासाठीं नेमलेल्या हंटर कमिशननें स्त्रीशिक्षणावर अनेक उपयुक्त सूचना आपल्या रिपोर्टांत केल्या. त्याचा मुलींच्या व शाळांच्या संख्येवर फार इष्ट असा परिणाम झाला. १८९१-९२ मध्ये ३३१,०४३ मुली खाजगी व सरकारी शाळांतून शिकत होत्या. कॉलेजांत त्यांपैकी फक्त ७६ होत्या. वाङ्मयीन शिक्षणाबरोबर वैद्यकीय शिक्षणाचाही उपक्रम सुरू होताच. काउंटेस ऑफ डफरिन फंडनें उच्च वैद्यकीय शिक्षणासाठीं मुलींना शिष्यवृत्त्या देऊन उत्तम स्त्री-डॉक्टर्स निर्माण करण्याचा पायंडा पाडला. १८८६ मध्यें सहा मुली प्रथम मद्रासच्या मेडिकल कॉलेजमध्यें दाखल झाल्या. मुंबईच्या मेडिकल कॉलेजमध्ये अठरा व कलकत्त्याच्या मेडिकल कॉलेजमध्यें तीन मुली होत्या. हारटॉग कमिशननें प्रथम ट्रेंड शिक्षकांची जरूरी नजरेस आणून दिली. १८९१-९२ मध्यें नॉर्मल स्कूल्समध्यें (Training School of Primary School Teachers) ८१९ मुली होत्या. टेक्निकल शिक्षणही हळूहळू सुरू होत होतें. वरील सालीं टेक्निकल शाळांतून ४६१ मुली शिक्षण घेत होत्या. सध्यां तर स्त्रिया वकील, बॅरिस्टर होऊं लागल्या आहेत; विम्यासारख्या धंद्यांतून पडत आहेत; परिचारिका-मिडवाइफची संख्या तर अगणित आहे. १९३२-३३ साली १८९१-९२ च्या संख्येच्या चौपट म्हणजे जवळजवळ १५ लाख मुली शिक्षण घेत होत्या.

साक्षरतेच्या प्रमाणावरून असें दिसून येते कीं, १८८१ साली प्रत्येक १८० मुलीत एक मुलगी प्राथमिक शाळेंत शिक्षण घेतांना आढळे; तर १८८६ सालीं शेंकडा एक आढळूं लागली. मद्रास व मुंबई इलाख्यांत स्त्रीशिक्षण जास्त पुढें गेलें आहे. तेथें शेंकडा १·२ स्त्रिया साक्षर आहेत. मुंबईस सुधारलेली पारशी ज्ञाति असल्यामुळें साक्षरतेचें प्रमाण जास्त दिसतें. मद्रासेंत फार पूर्वीपासून मिशनरी लोकांचे शिक्षणप्रसारार्थ श्रम सारखे सुरू आहेत. त्याचा परिणाम स्त्रीशिक्षणावर होऊन, स्त्रियांची साक्षरता वाढली असावी. पण एकंदरीनें पाहतां ब्रिटिश हिंदुस्थानांत शेकडा दोन स्त्रिया साक्षर आहेत. पुरुषांच्या साक्षरतेच्या प्रमाणानें हें प्रमाण अर्थात् फारच थोडें आहे. ढोबळ मानानें असे म्हणतां येईल कीं, दर सात साक्षर पुरुषांस एक स्त्री साक्षर आढळते. बडोदे,

त्रावणकोर, म्हैसूर वगैरे संस्थानांत साक्षरतेचें प्रमाण ब्रिटिश हिंदुस्थानापेक्षां किती तरी सरस आहे. त्रावणकोरांत शेंकडा पन्नास स्त्रिया साक्षर आहेत.

याप्रमाणें स्त्रीशिक्षणाचे बाबतींत अद्याप पुष्कळ कार्य व्हायचें असलें तरी आरंभापासून आतांपर्यंत सारखी प्रगति झालेली दिसते व त्यामुळें पुढील प्रगतीविषयीं पुष्कळच आशा वाटते. ही प्रगति कोणच्या दिशेनें व्हावयास पाहिजे याचा विचार करूं.

पहिली गोष्ट म्हणजे स्त्रीशिक्षणाच्या भरभराटीचा हा देखावा, हें वाढतें साक्षरतेचें प्रमाण फक्त शहरांतच नजरेस पडतें. एकंदर शहरांतील श्रीमंत व सुखवस्तु मध्यमवर्ग आपल्या मुलींना बिनबोभाट प्राथमिक व दुय्यम शिक्षण देतांना आढळतो. शिकलेल्या मुलांना शिकलेल्या बायका हव्या असतात, या व्यावहारिक कारणामुळें का होईना पण हे लोक आपल्या मुलींना शिकवूं लागले आहेत. सांपत्तिक दृष्टया त्यांना तें परवडतें व शिक्षण घेत असतांना मुलींचें वय मनुप्रणीत मर्यादेबाहेर गेलें तरी हे लोक त्याची फारशी फिकीर करीत नाहींत. पण ही गोष्ट झाली फक्त संपन्न, सुबुद्ध व सुधारलेल्या शहरांतल्या अल्पसंख्याक समाजाची. पुण्यामुंबईचे ब्राह्मण-सारस्वत प्रभू वगैरे लोक, पारशी लोक, उत्तरेकडील ब्राह्मी, आर्य व प्रार्थनासमाजाचे सदस्य, मद्रासकडील वरच्या ज्ञातींतील लोक एवढया लोकांपुरतीच ही सुधारणा घडून आली आहे. पण हिंदुस्थानांतील बहुजनसमाज असंख्य खेडयांतून अफाट समुद्रासारखा पसरला आहे; हे लोक बव्हंशीं अप्रबुद्ध आहेत. प्रौढविवाह, स्त्रीशिक्षण यांसारख्या सुधारणा अजून त्यांना पटलेल्या नाहींत व पटल्या तरी त्यांना त्या परवडत नाहींत. कारण हे लोक अत्यंत दरिद्री आहेत. स्वतःचा रोजचा संसार कसाबसा रेटीत, भावी संसाराचे आधार जे मुलगे त्यांच्या शिक्षणाची किंवा पोटापाण्याच्या धंद्याची कशीबशी तरतूद करतांनाच त्यांच्या नाकीं नऊ येतात. मग त्यांच्या दृष्टीनें फालतु, केवळ चैनीची गोष्ट जें मुलींचें शिक्षण, त्याच्यावर खर्चायला त्यांच्यापाशीं पैसा कुठला? दुसरें कारण म्हणजे धार्मिक समजुती, अंधश्रद्धेच्या वेडया समजुतीच्या कैचींतून त्यांचें मन अद्यापि सुटलेलें नसल्यामुळें प्रौढदशेपर्यंत मुलगी अविवाहित ठेवणें हें ते पाप समजतात. मनाची भीति व समाजाचा वचक यांच्या दडपणाखालीं वेळेनुसार कर्जपाणी करूनसुद्धां ते आपल्या पोटच्या पोरांच्या पायांत लग्नाची बेडी व आपल्या

मानेभोंवतीं सावकारी पाश टाकतात. कित्येक निष्ठुर बाप पैशाच्या लोभानें, तर कित्येक निरुपाय, हवालदिल झालेले बाप लाचारीनें, आपल्या मुली म्हाताऱ्या नवरदेवांना देऊन त्यांच्या भावी वैधव्याची व दैन्याची तयारी करून ठेवतात. एकंदरीनें बालविवाह ही स्त्रीशिक्षणाच्या मार्गातील एक मोठी धोंड आहे. ज्या प्रांतांतून पडद्याची चाल आहे तेथे तीही स्त्रियांच्या शिक्षणाच्या आड येते. सहशिक्षणासाठीं तर राहोच, पण मुलींच्या सरकारी वा खाजगी शाळांतून सुद्धां या पडदानशीन मुली जाऊं शकत नाहीत. आपल्याकडेसुद्धां पडदा नसला तरी लहान खेडगांवांतून मुलांच्या शाळांत मुलींना पाठवण्यास पालक तयार नसतात; स्वतंत्र मुलींची शाळा तर तेथें नसते व त्यामुळे त्या साऱ्या मुली निरक्षर राहतात.

स्त्रीशिक्षणाच्या आड येते म्हणून व शारीरिक ऱ्हासाला कारणीभूत होते म्हणून बालविवाहाची चाल मोडण्याचे सुधारकांनी किती व कसे प्रयत्न केले तें आपण मागें एका प्रकरणांत पाहिलेच. सरकारी कायदा बालविवाहाविरुद्ध झाल्याशिवाय खेडोपाडी बळावलेली ही अनिष्ट रूढि बंद पडणार नाहीं म्हणून सरकारी मदत घेण्याचे प्रयत्न कसे करण्यांत आले व ते बव्हंशीं कसे निष्फळ झाले याचा इतिहास वरील प्रकरणांत आलाच आहे. परंतु स्त्रीशिक्षणाच्या गाड्याला भली मोठी खीळ घालणाऱ्या या बालविवाहाच्या बाबतींत सरकारनें अशी ढिलाई चालू ठेवणें इष्ट नाहीं. बालविवाहाचा कायदा नुसता अनुज्ञापक स्वरूपाचा न होतां नियंत्रक स्वरूपाचा असावा. इतर शांतता-संरक्षक कायदे जसें सरकार सक्तीनें जनतेला पाळायला लावते त्याचप्रमाणें हा समाजहितसंरक्षक कायदा जनतेनें पाळावा याबद्दल सरकारनें अत्यंत दक्ष राहिलें पाहिजे व कायदा मोडणारास दंडिलें पाहिजे. याप्रमाणें बालविवाह सक्तीनें बंद झाल्याशिवाय स्त्रीशिक्षणाचें पाऊल कधीं तरी पुढें पडेल ही आशा करणें व्यर्थ आहे. पडद्याची चालही त्या त्या समाजांनी जोराची जागृति करून बंद पाडली पाहिजे. या चालीबद्दल पुढें एका प्रकरणांत स्वतंत्र विवेचन येईलच.

स्त्रीशिक्षणाला चालना देऊन स्त्रियांमधील साक्षरतेचे प्रमाण वाढवण्याचा दुसरा अत्यंत निकडीचा उपाय म्हणजे प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करणें हा होय. या बाबतींत सरकारनें आपल्यावरची जबाबदारी यथायोग्य

रीतीनें ओळखली नाहीं व पार पाडली नाहीं असें म्हणणे भाग आहे. खुद्द इंग्लंडमध्यें १८७० सालीं सक्तीच्या शिक्षणाच्या अंमलबजावणीला सुरुवात होऊन १८८० सालीं सक्तीचें व मोफत शिक्षण सार्वत्रिक झालें. पण तेंच तत्त्व हिंदुस्थानांत लागू करा म्हणून हंटर कमिशनपुढें आपल्या साक्षींत महात्मा फुले यांनीं विनति केली ती सरकारनें मान्य केली नाहीं. पाश्चिमात्य राष्ट्रांत सगळीकडे सक्तीचें व मोफत प्रायमरी शिक्षण या सुमारास होत होतें. जर्मनीनें १९ व्या शतकाच्या आरंभींच सक्तीचे तत्त्व अंमलांत आणले. १८३१ सालीं इटली, १८४४ सालीं पोर्तुगाल, १८८१ मध्ये फ्रान्स, १८८५ मध्यें स्पेन व पाठोपाठ डेन्मार्क, ऑस्ट्रिया-हंगेरी, स्वीडन, नॉर्वे, स्वित्झर्लंड या राष्ट्रांमध्यें ही सुधारणा अंमलांत आणली गेली. पौर्वात्य राष्ट्रांपैकी जपानमध्यें १८७२ सालीं ही सुधारणा झाली. खुद्द हिंदुस्थानांत बडोदा सरकारनें १९०९ सालीं सक्तीच्या व मोफत प्राथमिक शिक्षणाचें तत्त्व अंमलांत आणलें.

देशोदेशींचीं ही उदाहरणें पाहून १९११-१२ सालीं नामदार गोखले यांनीं दिल्लींतील विधिमंडळांत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याबद्दल ठराव मांडला, तरीही ऐच्छिक तत्त्वावर (Filtration) तत्त्वाने शिक्षण-प्रसार करण्याचा हट्ट सरकारनें सोडला नाहीं. वरिष्ठ वर्गाच्या शिक्षणावर ऐच्छिक तत्त्वामुळें साहजिकच भर पडला; सरकारला हवे असलेले नोकर या वरिष्ठ वर्गांतून मिळत होते व बहुजनसमाजाच्या शिक्षणाचा बोजा शिरावर घ्यायला सरकार तयार नव्हतें; यामुळें वरीलसारखे ठराव पुनःपुन्हां डावलले जात. सरकारला अनुकूल असें मत १८९३ सालीं जानेवारींत आंकडेशास्त्रज्ञ रावबहादूर जोशी यांनीं प्रसिद्ध केलें होतेंच. त्यांच्या मताप्रमाणें शैक्षणिक साधनांचा पुरवठा करण्याची तरतूद होण्याच्या आधीं सक्तीचे तत्त्व लागू करणें समर्थनीय नाहीं. ऐच्छिक तत्त्वावर प्रसार करण्यास जागा राहिली नाहीं असें दिसून आलें तरच मग सक्तीचें तत्त्व लागू करण्यांत यावें. पुन्हां १९१७ सालीं पटेल यांनीं म्युनिसिपालिटीच्या हद्दींत सक्तीचे तत्त्व लागू करतां यावें म्हणून एक कायदा पास करून घेतला. या कायद्यांत स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रथम निर्देश करण्यांत आला; नाहीं तर नामदार गोखले यांच्या ठरावांतसुद्धां जोराच्या विरोधामुळें मुलींच्या शिक्षणाचा प्रश्न टाळण्यांत आला होता. १९१९ च्या मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांनंतर शिक्षणखातें सोंपीव झालें.

शिक्षणांत नवयुगाचा प्रादुर्भाव झाला असें लोक मानू लागले. प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रचार करण्याचें धोरण घाटूं लागले व तें सक्तीचें व मोफत करण्याचें प्रांताप्रांताच्या मर्जीवर व सोयीवर सोंपविण्याचें ठरलें. १९२१ सालीं या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं चंदावरकर कमिटी नेमण्यांत आली व दहा वर्षांत मुंबई प्रांतांत सर्वत्र सक्तीचें शिक्षण करण्याबद्दल एक योजना या कमिटीनें तयार केली. त्या योजनेप्रमाणें १९२३ चा प्राथमिक शिक्षणाचा कायदा मंजूर करण्यांत आला.

याप्रमाणें कागदावर गोखले–फुले यांचा विजय झालेला दिसला तरी व्यवहारांत जोश्यांच्याच मताचा अंमल कायम राहिला. ‘ तण्डुला प्रस्थमूलाः।’ या न्यायाने पुरेसा पैसा नसल्यामुळें प्रांतोप्रांतीं इच्छा असूनही प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक सक्तीचे व मोफत करणें शक्य झाले नाही. स्थानिक संस्थांनीं सादर केलेल्या योजनांस सरकारनें मजुरी देण्याचें नाकारलें. १९३५–३६ अखेर फक्त दहा म्युनिसिपालिटयांनीं व दोन लोकलबोर्डांनीं अशतः आपल्या हद्दींत हे तत्त्व लागू केल्याचे सरकारी अहवालावरून दिसून येते.

याच पैशाच्या अडचणीमुळें मुलींच्या शिक्षणाचा प्रश्न तर कोंपऱ्यांत पडल्यासारखा झाला, व त्यांच्या शिक्षणाचे प्रमाण पूर्वीप्रमाणेंच निराशाजनक राहिलें. १९३२ त पंचवीस कोटी लोकसंख्येपैकीं अडीच कोटी साक्षर होते व त्यांपैकीं फक्त अर्धा कोटी स्त्रिया होत्या. या अपुऱ्या साक्षरतेच्या प्रमाणाचे कारण म्हणजे आमचें स्त्रीशिक्षणाबद्दलचें औदासीन्य. मुलींचें शिक्षण ही अजूनही कित्येकांना केवळ चैनीची गोष्ट वाटते. असहकारितेच्या दिवसांत स्वतःस सुधारक म्हणवणाऱ्या प्रागतिकांच्या राजवटींत सुद्धां मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न निघाला असतां अनेक समाजसुधारक मुलींचें नांव अजिबात वगळून मुलांचेंच तेवढें घेत. कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या राजवटींतही हाच प्रकार व हेंच औदासीन्य दिसून येत होतें. भावी पिढीच्या माता, कुटुंबाच्या अधिदेवता, समाजाच्या व राष्ट्राच्या घटक—जवळजवळ अर्धे राष्ट्र असणाऱ्या स्त्रिया अडाणी व निकामी ठेवणें हें केवढ्या थोरल्या राष्ट्रहानीस कारण होतें, ही गोष्ट सूर्यप्रकाशाप्रमाणें सर्वांना ढळढळीत केव्हां दिसून येईल बरें !

अर्थात् इतर राष्ट्रांपाशीं शिक्षणावर खर्च करण्यास पैसा आहे व

हिंदुस्थानजवळ नाहीं; याचा अर्थ हिंदुस्थान दरिद्री आहे असा मात्र नव्हे. हिंदुस्थानचें अर्धें अधिक उत्पन्न सैन्यआरमारावर खर्च होतें. उरलेल्या अर्ध्यांत शिक्षण, आरोग्य, शांतता, सुव्यवस्था वगैरे सर्व गोष्टी उरकाव्या लागल्यामुळें प्रत्येक खात्याच्या वांटणीस साहजिकच फार थोडा व अपुरा पैसा येतो. त्यांत सर्वसामान्य शिक्षणांतून खुद्द स्त्रीशिक्षणाच्या वांटयास किती थोडा पैसा येतो याची पुढील आंकडयांवरून कल्पना येईल. सध्यां सर्व हिंदुस्थान-मिळून २९ कोटी रुपये शिक्षणावर खर्च होतात. त्यांपैकीं १८ कोटी खाजगी फंडांतून व फक्त ११ कोटी सरकारी. मुलींच्या शिक्षणावर एकंदर फक्त २।। कोटी खर्च होतात. त्यांपैकीं दीड कोटी खाजगी व फक्त १ कोटी सरकारी. इतर सुधारलेल्या देशांतून स्त्रीशिक्षणावर जो पैसा खर्च होतो, त्याच्याशीं हे आंकडे ताडून पाहिल्यास ते फारच अपुरे व निराशाजनक वाटतात. हारटॉग कमिटीनें स्त्रीशिक्षणाचे फायदे आपल्या रिपोर्टांत विस्तारानें सांगून, शिक्षणप्रसाराच्या योजनेंत स्त्रीशिक्षणास नेहमीं अग्रेसरत्व दिलें पाहिजे असा दंडक घालून दिला; पण तो व्यवहारांत आचरण्याचे अजून हिंदुस्थानांतील नोकरशाहीस व लोकशाहीसही जमलेलें दिसत नाहीं. पैशाची अडचण हेंही त्याचे कारण असूं शकेल. मुंबई सरकारनें व इतर कॉंग्रेसपक्षप्रधान प्रांतांनीं संकल्पिल्याप्रमाणें अबकारी उत्पन्नाची चंदी जर बंद झाली तर शिक्षण-खात्याचा प्रश्न फारच बिकट होऊन बसेल. कारण सध्यां अबकारी खात्याचें उत्पन्न शिक्षणावर खर्च करण्यांत येत आहे. या बागुलबोवाला भिऊनच महात्मा गांधींना व वर्धा कमिटीला अव्यवहार्य व अप्रयोजक वाटणारी, पण स्वावलंबी व स्वयंपूर्ण असल्यामुळें पैशाचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोड-वणारी प्राथमिक शिक्षणाची योजना आंखणें भाग पडलें. 'शिक्षणतज्ज्ञां'चा या योजनेवर ठिकठिकाणीं खल चाललाच आहे; व त्याचीं फळें व अंतिम परिणाम आपणांस योग्य वेळीं पाहावयास सांपडेलच.

कशाही उपायानें असो, पण प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक सक्तीचें व मोफत झाल्याशिवाय हिंदी राष्ट्राला तरणोपाय नाहीं. सर्व सुधारलेल्या राष्ट्रां-तून व बडोदें–त्रावणकोरसारख्या प्रगतिप्रिय संस्थानांतून ही सुधारणा झाली आहे व तिचीं गोड फळें तीं तीं राष्ट्रें चाखीत आहेत. ब्रिटिश हिंदुस्थान-मध्येंही ही सुधारणा त्वरित झाली पाहिजे; नाहीं तर इतर लोकशाहीच्या तत्त्वा-

नुरूप राजकीय हक्कांच्या पाठीमागे लागून त्या महत्त्वाच्या प्राथमिक गोष्टीकडे दुर्लक्ष केल्यास Education Fellowship चे सदस्य प्रा. सार्टर डेव्हिस यांनीं हिंदुस्थानच्या आपल्या दौऱ्यांत उद्गार काढल्याप्रमाणें 'अडाणी लोकशाही 'चें (Ignorant Democracy) अनिवार दुर्दम्य संकट हिंदुस्थानवर ओढवेल.

प्राथमिक शिक्षणाचा तपशील व अवधि यांतही सुधारणा होणें जरूर आहे. तसेंच योग्य शिक्षणसाधनांचा व पुरेशा शिक्षकांचा अभाव यांमुळे सध्यां कागदोपत्रीं चालू असलेल्या पुष्कळ शाळा असून नसल्यासारख्याच आहेत. विशेषतः मुलींच्या शाळांची स्थिति—ज्या कांही अत्यत थोडया शाळा आहेत त्यांचीही स्थिति—अत्यंत निराशाजनक आहे. शिक्षणाच्या साधनांचा पूर्ण अभाव व शिक्षिका अत्यंत कमी. हीच स्थिति जिकडे तिकडे नजरेस पडते. कुठें कुठें तर सबंध चार वर्ग एकच शिक्षिका चालवतांना आढळते. मुलींचा अभ्यासक्रम मुलांप्रमाणेंच पहिलीपासून पांचवीपर्यंत पांच वर्षांचा आंखलेला असतो; पण दाखल झालेल्या मुलींपैकी किती जणी पांचवीपर्यंत पोंचून अभ्यासक्रम पुरा करतात याचा मात्र कुणीच विचार करीत नाहीं. तज्ज्ञांच्या मताप्रमाणें सहा वर्षे शाळेंत अभ्यास केल्याशिवाय पूर्ण साक्षरता येत नाहीं. दोनतीन वर्षे अभ्यास करून अर्धवट सोडलेलें शिक्षण कांहीं दिवसांनीं अजिबात लुप्त होतें; आणि मुलींमध्ये, विशेषतः खेडगांवांतल्या मुलींमध्ये तर, अर्धवट शिक्षण झाल्यावर, लग्न ठरलें म्हणून किंवा 'लग्नाला योग्य जाहली आहे' म्हणून शाळा सोडणारणींची संख्या फार मोठी असते. उदाहरणार्थ, पहिलींत शंभर मुली दाखल झाल्या असल्या तर त्यांपैकीं दहाच चिकाटी धरून चौथीपर्यंत पोंचतांना दिसतात व पांचवीपर्यंत तर सहासुद्धां जात नाहींत. त्यामुळें बाकीच्या ९४ मुली शिकूनच्या शिकून कोरडया निरक्षरच राहतात. त्यांच्या शिक्षणावर खर्च झालेला पैसा फुकट जातो व साक्षरतेचें स्त्रियांमधील प्रमाण तोकडें तें तोकडेंच राहतें. म्हणून साक्षरता–कायम टिकणारी अशी साक्षरता, येण्यासाठीं प्राथमिक शिक्षण कमींत कमी सहा वर्षांचें सक्तीचें व मोफत झालें पाहिजे, आणि शिवाय प्राप्त झालेली साक्षरता नंतर कायम टिकविण्यास खेडोपाडीं स्थायिक व फिरत्या लायब्ररऱ्या उघडून फुकट पुस्तकें साक्षरांना पुरविलीं पाहिजेत. तसेंच ग्रामोद्धारांचीं केंद्रें उघडून त्यांत शैक्षणिक

व्याख्यानें वगैरेचा कार्यक्रम वरचेवर ठेवला पाहिजे. लायब्ररींची सुधारणा बडोदें सरकारनें किती उत्तम रीतीनें अंमलांत आणली आहे हें सर्वश्रुतच आहे. ब्रिटिश हिंदुस्थाननें या बाबतींत बडोद्याचा कित्ता गिरवला पाहिजे.

प्राथमिक शिक्षणाबरोबर प्रौढांच्याही शिक्षणाचा विचार केला पाहिजे; कारण प्राथमिक शिक्षणाचा मुख्य उद्देश साक्षरता वाढवणें; आणि हिंदुस्थानांत प्रौढ स्त्रिया व पुरुष यांमध्यें निरक्षरतेचे प्रमाण फार भयंकर आहे. तेव्हां निरक्षर प्रौढांना साक्षर करण्यासाठीं ठिकठिकाणी, विशेषतः खेडेगांवांतून प्रौढशिक्षण केंद्रें उघडली पाहिजेत. दिवसभरचा कामधंदा करून शिकतां यावें म्हणून प्रौढांसाठी रात्रीच्या शाळा उघडल्या पाहिजेत, व या शाळांत जाण्याबद्दल सर्व निरक्षर प्रौढांवर सक्तीचे तत्त्व लाविलें पाहिजे. या शाळांतील शिक्षण-पद्धति व साधनें अर्थात् प्राथमिक शाळांतल्याहून भिन्न असलीं पाहिजेत. प्रौढांना अक्षरओळख चटकन् व सुलभ रीतीनें करून देण्यासाठी नव्या नव्या पद्धती शोधून काढल्या पाहिजेत. त्यांना ज्ञानाची गोडी लागावी व अक्षरज्ञान करून घेण्याची ओढ उत्पन्न व्हावी म्हणून रेडिओ, मॅजिक लॅटर्न, सोपीं व्याख्यानें इत्यादि साधनांनी त्यांना बाहेरच्या जगाची माहिती करून देऊन त्यांच्या ठिकाणीं कुतूहलबुद्धि व ज्ञानपिपासा जागृत केली पाहिजे. असे प्रयत्न ठिकठिकाणीं वाढत्या प्रमाणांत चालू आहेत. मुंबईत प्रौढ लोकांत साक्षरता झपाट्यानें वाढत आहे. पुण्यालाही सेवासदनाने प्रौढ स्त्रियांत साक्षरतेचा प्रसार अनेक साधनांनीं फार मोठ्या प्रमाणांत केला आहे. कलकत्त्याचें स्त्रीभारतमंडळ, नारीशिक्षासमिति व Women's Indian Association च्या ठिकठिकाणच्या अनेक शाखा प्रौढ स्त्रियांना साक्षर करीत आहेत. कर्वे व भागवत यांचे महाराष्ट्र ग्राम प्राथमिक शिक्षण मंडळ खेडेगांवांत साक्षरतेचा प्रसार करण्यासाठीं बरेच परिश्रम करीत आहे. मुंबई सरकारनें नेमलेल्या प्रौढशिक्षणविषयक जोशी कमिटीच्या शिफारशी अंमलांत येऊन प्रौढशिक्षणाचे पाऊल झपाट्यानें पुढें पडून हिंदुस्थानांतील साक्षरतेचें प्रमाण दिवसेंदिवस वाढत जाईल अशी आशा करावयास हरकत नाहीं.

स्त्रियांतील सारक्षतेच्या प्रसाराबरोबर स्त्रियांच्या धंदेवाईक शिक्षणाचाही विचार केला पाहिजे. हिंदुस्थान सरकारनें याही विषयाची चौकशी करण्यासाठीं (Vocational Training) ॲबटवुड कमिटी नेमली आहे. स्त्रियांना कोण-

कोणते धंदे करण्याजोगे आहेत याचा विचार पुढें एका प्रकरणांत येईलच. पण एकंदरीनें सर्वत्रांस, स्त्रीस व पुरुषास, वाङ्मयीन व सांस्कृतिक शिक्षणाबरोबरच औद्योगिक शिक्षणही मिळणें अत्यंत जरूर आहे यांत शंका नाहीं. दिवसेंदिवस बेकारी वाढत असल्यामुळें पुरुषांच्या बाबतींत व अनाथ विधवा स्त्रियांच्या बाबतींत हा प्रश्न फारच महत्त्वाचा होऊन बसला आहे. या प्रश्नाच्या निकडीमुळेंच महात्मा गांधींनीं प्राथमिक शिक्षणाच्या योजनेंतच औद्योगिक शिक्षणाच्या मूलभूत तत्त्वांचा समावेश केला; अर्थात् प्राथमिक शिक्षणाच्या खर्चाचा प्रश्नही सोडविण्याचा उद्देश या योजनेंत अंतर्भूत होताच, पण पुष्कळ शिक्षणतज्ज्ञांच्या मतें ही योजना व्यवहार्य व इष्ट नाहीं; कारण लहान लहान खेडगांवांतून सर्व धंद्यांचें शिक्षण देण्यास निरनिराळे शिक्षक नेमणें जमणार नाहीं व परवडणार नाहीं, आणि तें इष्टही नाहीं. कारण पुष्कळांच्या मतें प्राथमिक शिक्षण ज्या कोंवळ्या वयांत दिलें जातें त्या अपक्व वयांत औद्योगिक शिक्षण किंवा अर्थोत्पादन या अंगांवर भर देणें योग्य नव्हे. या वयांत फक्त वाङ्मयीन व सांस्कृतिक ज्ञानाचा पाया घातला पाहिजे. औद्योगिक शिक्षणाचा समावेश दुय्यम शिक्षणाच्या योजनेंत व्हावा असें बहुमत तज्ज्ञांमध्यें दिसतें. उच्च विश्वविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्यांचा अभ्यासक्रम निराळा व दुय्यम शिक्षणाच्या शेवटीं एकदम पोटापाण्याच्या धंद्यास ज्यांना लागावयाचें आहे त्यांचा अभ्यासक्रम निराळा, अशी व्यवस्था दुय्यम शिक्षण देणाऱ्या शाळांतून झाली पाहिजे; म्हणजे अनवश्यक विषय शिकण्यांत गरीब व गरजू मुलांचा वेळ व्यर्थ न जातां त्यांच्या स्वावलंबी जीवनाचा पाया या वयांतच घातला जाईल. याच उद्देशानें अखिल भारतीय महिला परिषदेनें School Leaving Certificate Examination व Matriculation Examination अशा दोन निराळ्या परीक्षा वर उल्लेखिलेल्या दोन तऱ्हेच्या मुलांसाठीं घ्याव्या, अशी मागणी केली होती. १९३५ मध्यें (Central Advisory Board of Education) मध्यवर्ती शैक्षणिक सल्लामंडळानें या विषयांत फार विचारणीय सूचना केल्या होत्या. त्यांच्या मतें दुय्यम शिक्षण दोन भागांत विभागिलें जावें : (१) लोअर सेकंडरी व (२) हायर सेकंडरी. पहिल्या भागांत निरनिराळ्या धंद्यांचें शिक्षण द्यावें व दुसऱ्यांत विश्वविद्यालयीन शिक्षणाची पूर्वतयारी असावी. ज्या

मुलांमुलींना विश्वविद्यालयांत शिक्षण घ्यावयाचें नसेल त्यांनीं लोअर सेकंडरी-नंतर शिक्षण सोडून स्वतंत्र धंद्याला लागावें. विद्यालयांत जाऊं इच्छिणाऱ्या मुलांनीं हायर सेकंडरीचा अभ्यास करावा. हेंच तत्त्व मुलींनाही लागू करतां येईल. संसारांत पडणाऱ्या मुलींसाठीं निराळा अभ्यासक्रम व उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींसाठीं निराळा अभ्यासक्रम अशी व्यवस्था करतां येईल.

शाळेंतील शिक्षणाखेरीज प्रौढ स्त्रियांना धंदेवाईक शिक्षण देण्यासाठीं शहरांतून व खेडेगांवांतून वर्ग उघडले पाहिजेत. या केंद्रांतून स्त्रियांना निरनिराळे धंदे शिकवणें, त्यांना कच्चा माल पुरवून विक्रेय माल तयार करून घेणें व तो विकून देण्याची व्यवस्था करणें—इत्यादि कार्य झालें पाहिजे. पुण्या-मुबईचीं सेवासदनें हें कार्य अत्यंत कसोशीनें करीत आहेत. बडोद्याचें महिला उद्योगालय ( Women's Industrial Home) ही तर एक नांवाजण्या-जोगी संस्था असून, अत्यंत उपयुक्त काम करीत आहे. अशाच संस्था ठिक-ठिकाणीं निघाल्या पाहिजेत.

प्राथमिक प्रौढ ( Adult ) व धदेवाईक (Vocational) शिक्षण-पद्धतीचा याप्रमाणें थोडक्यांत विचार केल्यानंतर आतां स्त्रियांच्या दुय्यम व उच्च शिक्षणाकडे वळूं.

दुय्यम व उच्च शिक्षणाचा प्रश्न स्त्रियांच्या बाबतीत फार वादग्रस्त व भानगडीचा होऊन बसला आहे. स्त्रियांना दुय्यम शिक्षण द्यावें हें तत्त्व मान्य झालें तरी दोन प्रश्न पुढें दत्त म्हणून उभे राहतात. पहिला म्हणजे हे दुय्यम शिक्षण एकाच ठिकाणीं मुलामुलीना द्यावे किंवा काय ? व दुसरा प्रश्न म्हणजे मुलांमुलींचा अभ्यासक्रम सारखाच असावा काय ? सहशिक्षण व समान अभ्यासक्रम यांवर अनेक भिन्न भिन्न मतांचा गलबला आहे; व दोन्ही बाजूंचे मुद्देसूद कोटिक्रम विचारांत घेतल्यानंतर निर्णायक मत निश्चित करणे मोठें कठिण काम आहे.

प्रथम सहशिक्षणावर काय मते आहेत हें पाहू : सहशिक्षण बहुतेक प्रांतांतून कमीअधिक प्रमाणांत आहे. ब्रह्मदेशांत शेंकडा ८१ मुली सहशिक्षण घेतात, मद्रासेंत शेंकडा ५१·१, आसाममध्यें ५०·३, व मागसलेल्या पंजाब व वायव्य सरहद्दीवरील प्रांतांत अनुक्रमें ११·२ व ५·९ असें सहशिक्षणाचें प्रमाण आहे; परंतु सहशिक्षण इष्ट आहे किंवा अनिष्ट आहे याबद्दल मात्र समाजाचें

ात अजून निश्चित झालेलें नाहीं. सहशिक्षणाचा प्रश्न प्राथमिक शिक्षणा- ाया क्षेत्रांत फारसा किंबहुना मुळींच वादग्रस्त नाहीं. उलट लहान लहान ेडेगांवांत शिकणाऱ्या मुलींची संख्या फार थोडी असल्यामुळें त्यांच्या शिक्षणासाठीं निराळी शाळा उघडणें आर्थिक दृष्टया व्यवहार्यच नसतें. अगदी ान्या मताच्या लोकांस सुद्धां प्राथमिक पायरीवर म्हणजे सुमारें दहा वर्षांचें य होईपर्यंत मुलेंमुली एकत्र शिकलीं तरी त्यांत फारसें कांहीं गैर वाटत नाही. रीं मोठया कुटुंबांतून नाहीं का दहाबारा वर्षांचीं मुलेंमुली एकत्र खेळत हुतुतू हमामा घालीत ? अभ्यासक्रमांतही प्राथमिक अवस्थेत कांहीं फरक रण्याचें कारणच नसते. लेखन, वाचन व आंकडेमोड या तिन्हींचे ज्ञान ुलांमुलींना सारखेंच जरूरीचें असते.

परंतु हे दोन्ही प्रश्न दुय्यम शिक्षणाच्या क्षेत्रांत मात्र उग्र स्वरूपांत द्भवतात. दुय्यम शिक्षणांत मुलांमुलींचा अभ्यासक्रम निराळा असावा हा द्दा तर आहेच; पण अभ्यासक्रम एक असला तरीसुद्धां शाळांतून व कॉलेजां- न मुलांमुलींना एकत्र शिक्षण दिलें जाऊं नये अशा मताचे बरेच लोक ाहेत. याचें कारण म्हणजे अर्थात् मुलांमुलींचें हें वय मोहसुलभ असल्यामुळे विचाराच्या भरांत त्यांच्या हातून प्रमाद होण्याचा व शिवाय अभ्यासाकडेही ्लक्ष होण्याचा संभव आहे. दुसरे म्हणजे सहशिक्षणाच्या संस्थेत मुली या भावसहज संकोच व विनयामुळे मागेमागे राहतात; खेळ, वादविवाद, ामाजिक करमणुकीचे कार्यक्रम, सामुदायिक समारंभ वगैरेमध्यें त्या लज्जेमुळे ोकळेपणीं भाग घेत नाहींत व त्यामुळें त्यांची सर्वांगीण वाढ व उन्नति ात नाहीं व त्यांना स्वच्छंद, स्वतंत्र जीवनाच्या सौख्याचा आस्वाद घेतां ा नाहीं.

आतां सध्यां ज्या प्रकारानें सहशिक्षण शाळाकॉलेजांतून दिलें जातें त्या काराचा विचार केला असतां, हे दोन्ही मुद्दे बरोबर आहेत यांत शंका नाही. का वर्गात पण एका बाजूला मुलींना बसवणें हा सध्यां सहशिक्षणाचा अर्थ तो. या वर्गीकरणामुळें अर्थात् मुलांना मुली समोर दिसतात, पण ांच्याशीं स्वाभाविक वाटणाऱ्या ओढीप्रमाणें ओळख तर करून घेण्याची किंवा त्री करण्याची संधि मिळत नाहीं. अशा प्रसंगीं केवळ मोह व जिज्ञासा चेत- ली जाऊन मुलांकडून चमत्कारिक व कधींकधीं असभ्य आणि उतावळें वर्तन

झालें तर आश्चर्य नाहीं. पण मुलांमुलींना खेळीमेळीनें एकत्र मिसळूं दिलें तर हे सर्व अनिष्ट परिणाम दूर होतील. एकमेकांच्या सहवासाची तहान एकत्र खेळ, बरोबर अभ्यास, सार्वजनिक स्वरूपाच्या शाळेंतील कामकाजांत सहकारिता, इत्यादि योग्य मार्गांनीं राजरोसपणें भागत असल्यामुळें चोरट्या व्यवहाराची गरज कोणासच भासणार नाहीं. या प्रकारच्या सहशिक्षणांत मुलींच्या कर्तृत्वशक्तीचा कोंडमाराही होणार नाही व त्यांचें शालेय जीवन परिपूर्ण व यशस्वी होईल. मुलांमुलींमध्यें एक प्रकारची स्तुत्य व गोड ईर्ष्या राहून दोघांचीही अभ्यास, खेळ, वादविवादनिपुणता वगैरेंत प्रगति होईल. दोघे एकाच ठिकाणी एकत्र अभ्यासक्रम शिकत असल्यामुळें स्त्रिया या आपल्यापेक्षां बुद्धीनें, कर्तृत्वानें कमी आहेत ही भावना पुरुषांच्या मनांतून नाहींशी होईल व स्त्रियांचाही न्यूनगंड नाहीसा होऊन आत्मविश्वास त्यांच्या अंगीं बाणेल.

याप्रमाणे प्राथमिक, दुय्यम व उच्च या तिन्ही अवस्थांतून मुलांमुलीना सहशिक्षणच दिलें तर परस्परांविषयीं संकोच उत्पन्न होण्यास त्यांना अवकाशच राहणार नाहीं. सध्यांची, दुय्यम शिक्षणांत मुलांमुलींना विभागून कॉलेजांत त्यांना पुन्हां एकत्र आणण्याची—व तेही सध्यांच्या सहशिक्षणाच्या विकृत स्वरूपांत—ही पद्धत अत्यत घातुक आहे. दुय्यम शिक्षणांत परस्परांपासून विभक्त असल्यामुळें मुलांमुलींचे परस्परविषयक कुतूहल दडपून, दाबून राहिलेलें असते. कॉलेजमध्ये एकत्र आल्याबरोबर एकदम उसळी मारून तें जागृत होतें, व त्याच्या तृप्तीचे राजरोस मार्ग बंद असल्यामुळें अनेक अनिष्ट प्रकार मुलांमुलींच्या हातून घडून येतात. तेव्हां तीनही अवस्थांत सहशिक्षण त्याच्या यथार्थ स्वरूपांत दिल्यानें निरनिराळ्या संस्थांत विभागून जाणारा पैसा, काळ व शक्ति यांचा अपव्यय थांबेल व मुलांमुलींचें जीवन व शिक्षण यशस्वी व आदर्शभूत होईल.

आतां दुसरा महत्त्वाचा व विशेष वादग्रस्त प्रश्न म्हणजे अभ्यासक्रम मुलांमुलींसाठीं एकच असावेत किंवा निराळे असावेत. जगांतील पहिला शिक्षणतज्ज्ञ जो प्लेटो त्याचें मत असें होतें कीं, स्त्रीपुरुषांच्या शिक्षणांत भेद नसावा, कारण पुरुष जें जें करूं शकतो तें तें स्त्रीही करूं शकते; मग तिनें पुरुषांचीं म्हणून ठरलेलीं सर्व कामें कां करूं नयेत? व तीं योग्य रीतीनें कर-

ण्याची माहिती तिला व्हावी म्हणून पुरुषाला जे ज्ञान व शिक्षण मिळते तेंच तिला द्यावयास नको काय? आतां स्त्री ही माता व्हावयाची असते, व गृहिणी-पदाची जबाबदारी तिच्यावर असते म्हणून त्या कामीं तिला योग्य शिक्षण द्यावें असें कांहीं लोक म्हणतात. पण प्लेटोनें एक काल्पनिक समाज निर्माण करून कुटुंबाचें व गृहाचें हल्लीं अस्तित्वांत असलेलें स्वरूपच बदलून टाकलें आहे; व स्त्रियांवरील ती जबाबदारी बव्हंशीं कमी त्रासाची करून पुरुषांच्या बरोबरीनें त्यांना कामें करण्यास सवड करून दिली आहे. इंग्लंडमध्यें १९२३ सालीं प्रसिद्ध झालेल्या हॅडो कमिटीच्या रिपोर्टांत दुय्यम शिक्षणांत स्त्री-पुरुषांच्या अभ्यासक्रमांत फरक करावा किंवा नाहीं याबद्दल दोन्हींतर्फे पुरावा जनतेपुढे मांडला गेला व हॅडो कमिटीनें स्त्रीपुरुषांच्या बुद्धींत, भावनेंत कोठल्याही दृष्टीनें लैंगिक दृष्टयासुद्धां कांहींच फरक नसल्यामुळे, त्यांच्या अभ्यासक्रमांत फरक करण्याची जरूरी नाही असे आपलें निर्णायक मत दिले. जर स्त्री व पुरुषामध्यें एकाच प्रकारची मानवता (Humanity) आहे, जर स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें समाजांत हिंडावें फिरावें लागतें, जबाबदारीचीं कामें करावीं लागतात व वेळेनुसार पुरुषांच्या स्पर्धेला टक्कर देऊन स्वतःची उपजीविका कामधंदा मिळवून चालवावी लागते तर त्यांना पुरुषांहून निराळे शिक्षण देऊन कसें चालेल? उत्तम पत्नी किंवा माता होण्यास सुद्धां पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घेण्याची जरूरी आहे. कारण पत्नीला पतीच्या व आईला मुलांच्या आवडीनिवडींशी समरस होण्याचा किंवा निदान तीं ओळखून ठेवण्याचा प्रसंग पुढें संसारांत वारंवार येणारच, ही हॅडो कमिटीची विचार-सरणी आहे. Ethics of Feminism लिहिणारे प्रा. वाडिया यांचें मत असें आहे कीं, स्त्रीला शिक्षण, ती स्त्री आहे हें ध्यानांत घेऊन तिच्या मातृपदा-च्या जबाबदारीला उपयोगी पडेल असेच दिलें पाहिजे. श्री. गो. मा. चिपळूणकर यांनीं या विषयावर एक पुस्तक लिहून मुलांचा अभ्यासक्रम मुलींवर लादल्या-मुळें त्यांचें शारीरिक स्वास्थ्य बिघडतें व त्यांचे लग्न झाल्यावर मातृपदाची जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडण्यास त्या असमर्थ ठरतात, असें सिद्ध करून दाखवलें आहे. शिवाय मुलांचा अभ्यासक्रम मुलींना शिकवल्यानें त्या पुरुषी बनतात; त्यांच्यामधील सुगृहिणी व सुमाता होण्यास जरूर असलेल्या कोमल व प्रेमळ मनोवृत्ती मरून जातात; सुगृहिणी व सुमाता होण्यास जरूर असलेलें

ज्ञान बाजूलाच राहून अनावश्यक अशा भाराभर विषयांच्या घोकपट्टीनें बुद्धीचा व शक्तीचा व्यर्थ अपव्यय मात्र होतो. याच विचारसरणीवर हिंगणें येथील कर्वे विश्वविद्यालयाचा शालेय व विद्यालयीन अभ्यासक्रम आंखला असून सुगृहिणी व सुमाता तयार करण्याचें ध्येय या विश्वविद्यालयानें आपणापुढें ठेवलें आहे.

याप्रमाणें याविषयीचे दृष्टिकोण तीन प्रकारचे आहेत असे दिसून येईल. पहिला म्हणजे स्त्रियांना शिक्षणाची मुळींच जरूरी नाहीं; कारण त्या पुरुषांपेक्षां कमी दर्जाच्या आहेत. त्यांना फक्त पुरुषाला आपल्या नटवेपणानें आपल्याकडे आकृष्ट कसें करून घ्यावे एवढें समजलें म्हणजे पुरे. एकदां पुरुष आकर्षला जाऊन त्याचे लग्न झालें म्हणजे स्त्रियांच्या जीवनाचा प्रश्न सुटला. त्यांना मग दुसऱ्यातिसऱ्या कुठल्याही गोष्टीत लक्ष घालण्याची जरूरी नाही, व म्हणून त्यांना कुठलेंही ज्ञानगम्य शिक्षण देण्याचीही आवश्यकता नाहीं असें प्रामाणिकपणे मानणारे बरेच लोक आहेत; पण ही विचारसरणी पुरुषाच्या व स्त्रीच्या सुखाला परिणामी विघातक आहे हें आतां बहुतेक सर्व विचारवंत माणसांना पटलें आहे. समाजाचे अर्धे अंग व भावी समाजाला वाढवणारी शक्ति निव्वळ सुंदर व आकर्षक बाहुली बनण्यांत समाधान मानू लागली तर समाजाचा अधःपात होण्यास वेळ लागणार नाहीं. दुय्यम शिक्षणाची स्त्रियांना जरूरी आहे म्हणणारांमध्ये दोन दृष्टिकोण आहेत. एक म्हणजे स्त्रीपुरुष समान असल्यामुळे त्यांना समान शिक्षण देणें जरूर आहे; व दुसरा म्हणजे स्त्रीपुरुषांमधील लैंगिक फरकामुळे त्यांचीं जीवितकार्यें निराळीं असल्यामुळें त्यांना निरनिराळ्या अभ्यासक्रमाची आवश्यकता आहे. स्त्रीपुरुषांमधील लैंगिक भेद समान शिक्षणाने नाहींसा करून टाकल्यास कुटुंबाची व समाजाची हानि होईल. तो भेद लक्षांत घेऊन स्त्रीपुरुषांचे विशिष्ट गुण विकास पावतील असेच शिक्षण उभयतांस दिलें पाहिजे, व तें अर्थात् भिन्न असणारच.

दुसऱ्या पक्षाच्या कोटिक्रमास उत्तर देण्याचा प्रयत्न केला म्हणजे पहिलें मत आपोआपच सिद्ध होईल. या पक्षाचें मत स्त्रियांचें क्षेत्र संसार व बालसंगोपन हें असल्यामुळें पुरुष ज्या विषयांचा अभ्यास करतात ते विषय अभ्यासण्याची स्त्रियांना जरूरी नाहीं; त्यांनीं फक्त गृहविज्ञानशास्त्र, बाल-

मानसशास्त्र व बालसंगोपन या व अशाच दुसऱ्या विषयांचें अध्ययन करावें. हा मुद्दा खरोखर फार वादग्रस्त आहे. स्त्रीचें क्षेत्र फक्त चूल व मूल असावें का? लग्न हाच तिचा धंदा व जीवितध्येय असावें काय? का स्त्रीनें पुरुषाप्रमाणें समाजाचा घटक व स्वतंत्र नागरिक बनावें? दोन्ही मतांना मोठमोठ्या विद्वान् लेखकांचे व समाजशास्त्रज्ञांचे आधार आहेत. या विषयाचा स्वतंत्र विचार निराळ्या प्रकरणांत केला पाहिजे. येथे एवढेच सांगून ठेवावेसें वाटतें कीं, He for God, and she for the God in him; पुरुषांनीं देवाला भजावें व बायकांनी नवऱ्याला—हे मत दिवसेंदिवस मागें पडत आहे व ते तसें पडणें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें फार इष्ट आहे. स्त्रियांचे कर्तव्य फक्त चूल-मूल ठरवून टाकून त्यांना फक्त त्याच विषयाचें शिक्षण देणें व इतर व्यापक स्वरूपाच्या विषयांपासून त्यांना दूर ठेवणें म्हणजे अर्ध्या राष्ट्राची बुद्धिमत्ता खुंटवून टाकणें आहे व अर्ध्या राष्ट्राची शक्ति फुकट दवडणें आहे. हिंदुस्थानांत याप्रमाणें अर्धे राष्ट्र अव्यंग, दुर्बळ, परावलंबी व राष्ट्रकार्यास निरुपयोगी असल्यामुळे व ते राष्ट्राच्या दुसऱ्या अर्ध्याच्या प्रगतींत अडथळा करीत असल्यामुळें हिंदुस्थान अखिल जगाच्या जीवनकलहार्थ चढाओढींत मागें पडला आहे. रशियामध्यें अर्ध्या राष्ट्राची ही फुकट जात असलेली शक्ति व बुद्धिमत्ता कारणी लागल्यामुळे त्या राष्ट्राची किती भराभर प्रशंसनीय प्रगति झाली पहा! हिंदुस्थाननेंही हल्लींचें प्रतिगामी धोरण टाकून रशियाचा धडा गिरवला पाहिजे. जर हिंदुस्थानांतील साऱ्या स्त्रिया सक्तीनें प्राथमिक शिक्षण घेऊन साक्षर होतील, दुय्यम शिक्षणानें स्वावलंबी बनतील व उच्च शिक्षणानें राष्ट्राच्या व समाजाच्या कर्तबगार घटक बनतील, तर पुरुषांच्या जोडीनें त्यांना राष्ट्रसेवेंत भाग घेतां येईल व हिंदुस्थानच्या भाग्योदयाचा काल किती तरी वर्षांनीं अलीकडे ओढला जाईल.

आतां समान शिक्षणानें स्त्रियांच्या शरीरप्रकृतीवर वाईट परिणाम होतो, या चिपळूणकरांच्या आक्षेपाचा विचार करूं. यावर प्रथम असें उत्तर देतां येईल कीं, सध्यां शाळाकॉलेजांतून चालू असलेल्या अभ्यासाप्रमाणें केवळ मुलींच्याच नव्हे तर मुलांच्याही शरीरप्रकृतीवर वाईट परिणाम होतो, हें शाळांकॉलेजांतून पास होऊन दरवर्षी बाहेर पडणाऱ्या मुलांच्या छातीच्या कोनाड्यावरून उघड होत आहे. हा दोष दूर करावयाचा असल्यास केवळ मुलींचे

नव्हे, पण मुलांचेही सध्यांचे अभ्यासक्रम आमूलतः बदलले पाहिजेत. सध्यांच्या अभ्यासक्रमांत अनावश्यक गोष्टींवर विनाकारण मुलांमुलींची शक्ति व बुद्धि खर्च होऊन त्यांना त्यांच्या भावी जीवनांत उपयोगी पडेल असे ज्ञान मिळत नाहींच. हल्लींच्या शिक्षणांत व्यवहार्य गोष्टींपेक्षां पुस्तकी अंगावरच फार भर दिलेला असतो. हें अव्यवहार्य व महाग शिक्षण अर्थातच फार थोडयांना परवडतें व बहुजनसमाज अशिक्षित राहतो. अल्पसंख्याक सुशिक्षित, अज्ञ बहुजनसमाजांत हळुहळू ज्ञानाचा व शिक्षणाचा प्रसार करतील असा मॅकेन्झी, मेकॉले प्रभृतींचा प्रथम अंदाज होता; पण तो अंदाज साफ चुकीचा ठरला आहे. हल्लींच्या शिक्षणानें अल्पसंख्याक सुशिक्षित व अज्ञ बहुजनसमाज एकमेकांपासून दिवसें-दिवस दुरावत आहेत. पहिल्या पिढींतील सुशिक्षित मुलीत ही गोष्ट फार ठळकपणें दिसून येई. या मुलींना विलायती पद्धतीचें पुस्तकी व नकली शिक्षण मिळालें होतें. त्यानें त्यांचे डोळे फिरून जाऊन हिंदी गोष्ट तेवढी त्याज्य व गचाळ असें त्यांना वाटूं लागलें. आपले आचारविचार, संस्कृति यांबद्दल त्यांना अनादर वाटूं लागला व त्यामुळें साहजिकच हे हिंदु आचारविचार भाविक-पणें पाळणाऱ्या लाखो अज्ञ हिंदी स्त्रियांविषयी या सुशिक्षित मुलींना तिरस्कार वाटूं लागला. उलट या अज्ञ स्त्रियांना शिकलेली मुलगी म्हणजे एक अजब वस्तु, नवलाची, पण व्यवहारांत निरुपयोगी अशी चीज वाटूं लागली. याप्रमाणें सुशिक्षित व अशिक्षित स्त्रिया मनानें परस्परांपासून दुरावल्यामुळे या पहिल्या सुशिक्षित पिढीचा, आपल्या भगिनींची सुधारणा करण्याकडे त्यांच्यांत ज्ञानाचा, शिक्षणाचा प्रसार करण्याकडे कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या ॲग्लो इंडियन बायकांप्रमाणे नुसत्या मेमसाहेब बनून राहिल्या.

सारांश, हल्लींची शिक्षणपद्धति अत्यंत सदोष आहे. ती अव्यवहार्य असून शिवाय कठिण पण अनावश्यक असे भाराभर विषय तींत अभ्यासिले जात असल्यामुळे मुलांमुलींच्या शक्तीवर तिचा फाजील ताण पडतो. हा ताण पडण्याचे आणखीही एक कारण येथेंच विचारांत घेण्यास हरकत नाहीं. मेकॉले-साहेबानें दुय्यम व विद्यालयीन अभ्यासक्रमांत इंग्लिश हें माध्यम असावें असें ठरवून टाकलें. या माध्यमावर प्रभुत्व मिळण्यांतच मुलांमुलींचा दुय्यम शिक्षणांतील सारा वेळ व कॉलेजांतीलही किती तरी वेळ खर्च होतो. हा वेळ प्रत्यक्ष भिन्न भिन्न विषयांच्या कारणीं लावल्यास मुलींचा वेळ व मेहनत किती

तरी वांचेल ! परकीय माध्यमाचा अभ्यास करण्यांत सारा वेळ खर्च झाल्यानें स्वभाषा व स्वदेशीय संस्कृति वगैरेंच्याकडे दुर्लक्ष होतें. मातृभाषा माध्यम ठेवण्याची सुधारणा करण्याच्या अग्रपूजेचा मान कर्वे विश्वविद्यालयाला दिला पाहिजे. बनारस विश्वविद्यालयानेंही इंटरमीजिएटपर्यंत मातृभाषेचें माध्यम इंग्लिशोत्तर सर्व विषयांस वापरण्याची सवलत ठेवली आहे. मुबई व इतर विश्वविद्यालयांनींही मॅट्रिकपर्यंत ही सवलत बऱ्याच ठिकाणीं ठेवलेली दिसते. दुय्यम व उच्च शिक्षणांत ही सवलत सार्वत्रिक झाल्यास मुलांमुलींवर पडणारा फाजील ताण व त्यामुळे त्यांच्या प्रकृतीची होणारी हानि किती तरी कमी होईल.

शाळाकॉलेजांतून शिकत असतांना मुलीची व मुलांची शरीरप्रकृति खराब होण्याचें आणखी एक कारण म्हणजे व्यायामाकडे (Physical Culture) व शरीरस्वास्थ्याकडे होणारें पूर्ण दुर्लक्ष. मेकॉलेसाहेबांना दिवसभर खुर्चीटेबलाशीं जखडून राहणारे कारकुनीपेशाचे नोकर शाळाकॉलेजाच्या कारखान्यांतून तयार करावयाचे होते; त्यामुळें ही निव्वळ पुस्तकी शिक्षणयोजना आंखली गेली असावी, व इंग्रजांना अत्यंत प्रिय असे मैदानावरील खेळ (out-door games) गाळले गेले असावेत. इंग्लिश भाषेवर प्रभुत्व मिळवण्याची सक्ति मूळ योजनेंत आहे, याचेंही कारण इंग्रजी भाषेंत वाकबगार असे कारकून राज्यकारभारांत मदत करावयाला हवे होते हेंच होय. असो. शारीरिक शिक्षणाकडे दिवसेंदिवस जास्त लक्ष साऱ्या हिंदुस्थानभर पुरवलें जात आहे; शाळांतून व कॉलेजांतील खालच्या वर्गांतून मुलांमुलीना सक्तीचें शारीरिक शिक्षण दिलें जात आहे, व त्याचे सुपरिणाम लौकरच दिसून आल्याशिवाय राहणार नाहींत.

सारांश, मुलींच्या शरीरप्रकृतीवर वाईट परिणाम होतो म्हणून त्यांना मुलांपेक्षां निराळा अभ्यासक्रम ठेवावा हें म्हणणें सयुक्तिक नाहीं. हल्लींच्या सदोष शिक्षणपद्धतीत व शारीरिक शिक्षणाच्या अभावानें मुलांच्याही प्रकृतीवर वाईट परिणाम होत असलेला दिसून येतो.

स्त्रियांची बुद्धि कमी दर्जाची, त्यांचा मेंदू पुरुषांच्या मेंदूपेक्षां आकारानें लहान असल्यामुळें पुरुषांच्या बुद्धीला सहज आकलन होणारे विषय स्त्रियांच्या बुद्धीला झेंपणार नाहींत असेंही कित्येकांचें मत आहे; याबद्दल हॅंडो कमिटीचे

मत वर दिलेंच आहे. स्त्रीपुरुषांच्या बुद्धिमत्तेत मूलतः कांहींच फरक नसल्यामुळें व दोघांनाही एकाच धर्तीच्या सांस्कृतिक व वाङ्मयीन शिक्षणाची जरूर असल्यामुळें अभ्यासक्रम निराळा ठेवण्याची जरूरी नाहीं असें कमिटीचें मत आहे व तें पश्चिमेंत बहुतेक सर्व ठिकाणीं ग्राह्य व व्यवहार्य ठरलें आहे. निरनिराळ्या क्षेत्रांत पुरुषांच्या बरोबरीनें नांव मिळवणाऱ्या मादाम क्युरि, पर्ल बकसारख्या स्त्रियांवरून स्त्रीपुरुषांच्या बुद्धिमत्तेत उच्चनीचत्वाचा भाव नाहीं हें अलीकडे सिद्ध झालें आहे. असो.

याप्रमाणें पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनाही प्राथमिक, दुय्यम व उच्च शिक्षण मिळण्याची जरूरी आहे हें आपण पाहिलें. स्त्रीशिक्षणाची भरभराट शहरांतून झालेली दिसली तरी खेडोपाडींच्या मुलीबाळी अजून निरक्षरच आहेत. त्यांच्यांत शिक्षणप्रसार होण्याकरितां खाजगी व सरकारी प्रचंड प्रयत्न झाले पाहिजेत. स्त्रिया सुशिक्षित झाल्याशिवाय त्यांना स्वाधीनता प्राप्त होणार नाहीं व स्त्रियांचा उद्धार झाल्याशिवाय राष्ट्राचा उद्धार होणें शक्य नाही.

---

**प्रकरण ९ वें : : :**

# .... .... स्त्रियांचे कायदेशीर हक्क

या प्रकरणामध्यें कै. कृ. के. गोखले यांनीं " हिंदु स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा " या शब्दसमुच्चयानें प्रसिद्धीस आणलेल्या हिंदु स्त्रियांच्या मालमत्ताविषयक कायदेशीर हक्कांचा किंवा हक्कांच्या अभावाचा विचार करावयाचा आहे. कै. गोखले यांनीं ' मनोरंजन ' मासिकांत सातआठ लेख लिहून हिंदु स्त्रियांवर होत असलेल्या कायदेशीर अन्यायांची हकीकत समाजापुढें अत्यंत सुबोधरीत्या व सोप्या भाषेत मांडली होती. त्या लेखांच्या मदतीनें या अन्यायाचें स्वरूप प्रथम आपण मांडूं.

कै. गोखले यांनीं ' हिंदु लॉ ' ही काय चीज आहे तें प्रथम समजावून सांगितलें आहे. इंग्रज सरकार ज्या कायद्यांप्रमाणें हिंदु स्त्रीपुरुषाचे वारसा हक्क

वगैरे ठरवतें, त्या कायद्यांच्या समूहाला ' हिंदु लॉ ' असें नांव आहे. हा हिंदु लॉ कसा संकलित करण्यांत आला? इंग्रज सरकारनें हिंदुस्थानचें साम्राज्य व राज्यसत्ता आपल्या ताब्यांत घेतांना सर्व हिंदी प्रजेस असें अभिवचन दिलें कीं, आम्ही तुमचे कायदेकानु, तुमचा धर्म, रीतिरिवाज यांमध्यें कांहीं ढवळाढवळ न करतां त्यांना अनुसरूनच तुमच्यावर राज्य करूं. मुसलमान लोकांचे कायदे कुराणांत एकत्र संकलित स्वरूपांत होतेच. पारशी लोकांनी (Indian Succession Act of 1935) १९३५ चा वारसा हक्काबाबतचा कायदा मान्य केला. ख्रिश्चनांना तोच लागू होतो. पण हिंदु व शीख या लोकांना कोठले कायदे लावावयाचे? एका ठिकाणीं एका ग्रंथांत संकलित केलेले असे हिंदूचे कायदे नव्हतेच. पुढील अनेक ग्रंथांतून हिंदूंचे कायदे विखुरलेले होते. मनु व याज्ञवल्क्य यांच्या स्मृतींत याज्ञवल्क्याची स्मृति विस्तृत व पद्धतशीर रीतीनें लिहिलेली असून त्यांत वारसाहक्काचे फार सुदर व मुद्देसूद विवेचन केलेलें आहे. या दोन स्मृतींबरोबरच ' मिताक्षरा ' हा ग्रंथही कायदाग्रंथ म्हणून प्रमाण मानला जातो. मिताक्षरा ही विज्ञानेश्वर यांनीं याज्ञवल्क्याच्या स्मृतीवर लिहिलेली एक सुंदर टीका आहे. विज्ञानेश्वर हा फार मार्मिक टीकाकार असून मौलिक लेखकही आहे. याज्ञवल्क्यस्मृतीचें नुसते शब्दशः अर्थनिरूपण करीत न बसतां त्यानें स्वतःच्या गाढ व बहुरंगी विद्वत्तेनें व आपल्या तर्कशास्त्र, न्यायशास्त्र इत्यादि शास्त्रांच्या ज्ञानाच्या साहाय्यानें मूळ स्मृतीच्या आधारानें त्या स्मृतीच्या तोडीचा एक स्वतंत्र कायदाग्रंथच तयार केला आहे. सध्यां मिताक्षराचा कायदा बंगाल व मुंबई इलाख्यांच्या पश्चिमेकडील कांही भाग सोडून इतर साऱ्या हिंदुस्थानांत प्रमाण मानला जातो. वरील भागांत चालू असणारा दायभाग हा कायदा मिताक्षरापेक्षां स्त्रियांच्या हक्काच्या बाबतींत बराच पुरोगामी आहे. हे हिंदु कायद्याचे मुख्य आधारभूत ग्रंथ. या मुख्य ग्रंथांखेरीज निरनिराळे हिंदु कायदे, वेद, वेदांगें, उपनिषदें, स्मृतिसूत्रे, धर्मसूत्रे यांतून विखुरलेले आहेत. मुख्य स्मृतींपैकीं वरच्या दोनखेरीज नारदस्मृति, पराशरस्मृति, कात्यायनस्मृति, देवलस्मृति वगैरेंतून कायदे दिलेले आहेतच. या स्मृतींवर असंख्य टीका आहेत. नंतर हे सर्व कायदे संकलित करूं पाहणारे नीलकंठाचा व्यवहारमयूख, लक्ष्मीधराचा कल्पतरु, जीमूतवाहनाचा दायभाग, नदपंडिताची दत्तकमीमांसा, धर्मसिंधु, निर्णयसिंधु वगैरे अनेक ग्रंथ आहेत. हे सर्व ग्रंथ पाहून

त्यांत ' कलिवर्ज्य ' सांगितलेले कायदे वगळून रूढीकडे लक्ष देऊन प्रत्येक दाव्याचा निकाल करणे हें अत्यंत कठिण काम आहे. इंग्रज सरकारनें न्यायमंदिरांतून नेमलेले गोरे न्यायाधीश कितीही विद्वान् व कुशाग्रबुद्धीचे असले तरी त्यांच्या सस्कृत भाषेच्या अज्ञानामुळें व हिंदी सस्कृति, चालीरीति वगैरेंच्या अनभिज्ञतेमुळें हिंदी खटल्यांतून हिंदी कायद्यांप्रमाणे योग्य न्यायदान करणे त्यांना शक्य नव्हते. तेव्हां या परिस्थितीवर तोड म्हणून या गोऱ्या न्यायाधिशांच्या मदतीला संस्कृतज्ञ विद्वान् शास्त्री पंडित नेमण्याची प्रथा कित्येक वर्षे सरकारनें चालू ठेवली. अर्थात् या पडितांच्या सल्ल्यानंतरही आपल्या सारासार विचारशक्ति व न्यायबुद्धीला अनुसरूनच न्यायाधीश निकाल देत. हे सर्व निकाल आधार म्हणून छापून ठेवले जात. पुन्हां तसल्याच तऱ्हेचा दावा उपस्थित झाल्यास शास्त्री पडितांची सल्ला न विचारतां पूर्वीच्या निकालाप्रमाणें निकाल दिला जाई. याप्रमाणे अनेक वर्षे काम चालल्यावर सर्व तऱ्हेचे दावे कोर्टाच्या हाताखालून गले व हळहळू शास्त्रीपडितांची गरज नाहींशी होऊन पूर्वीच्या निकालांप्रमाणे न्यायाधीश निकाल देऊ लागले व वकील लोकही पूर्वीचे निकाल शोधून काढून ते न्यायाधिशाच्या नजरेस आणणे यावरच आपल्या वकीलपत्रांत भर देऊं लागले.

हें झालें दिवाणी कायद्याविषयीं. फौजदारी कायद्यांत ही पद्धत अनुसरणे सरकारास शक्य नव्हते. दिवाणी दाव्यांत बंगालमध्ये दायभाग व मुंबईत मिताक्षरा लावणे ठीक दिसते. पण बगालमध्ये चोरी केल्यास एक शिक्षा व मद्रासमध्ये दुसरीच हे नैतिक दृष्टया विसगत व अन्याय्य झालें असतें, म्हणून सरकारनें फौजदारी गुन्ह्यासाठी पीनल कोड म्हणून सर्व हिंदुस्थानला लागू पडेल असा नवीनच कायद्यांचा समुच्चय सुरू केला. दिवाणी कायद्यांतही सरकारनें कधीं आपल्या मर्जीप्रमाणे तर कधी लोकाग्रहास्तव फरक केलेच आहेत. हिंदु लॉच्या विरुद्ध सतीप्रतिबधक कायदा, संमतीवयाचा कायदा, पुनर्विवाहाचा कायदा, सारडा कायदा व देशमुखांचा वारसा कायदा वगैरे फरक सरकारनें करून दिले आहेत. हिंदु कायद्यांत असे फरक सरकार करूं शकते ही हिंदु स्त्रियांना मोठया समाधानाची जागा आहे. स्त्रियांना अत्यंत प्रतिकूल असे अन्यायानें किंबहुना प्राचीन भिन्न परिस्थितीमुळें बनले गेलेले कायदे आंदोलनानें सरकारकडून बदलून घेतां येतील अशी आशा हिंदु स्त्रियांस

आहे. आतां तर कित्येक प्रांतांत ‘ स्वराज्य ’ झालें असल्यामुळें उजळ माथ्यानें अशा सुधारणा सरकार करूं शकेल. परकी सत्तेच्या ढवळाढवळीचा आतां प्रश्नच उरला नाहीं. स्वतःच्या घरचा कायदा आपली मर्जी व सोय यांप्रमाणें बदलण्याचा राजरोस हक्क मालकाला असतोच. मुंबई विधिमंडळांत गतवर्षी पास झालेलें हरिजनमंदिरप्रवेश बिल, मध्यवर्ती विधिमंडळांत पास झालेलें दासांचें बाल-विवाह प्रतिबंधक कायद्यांत सुधारणा करणारें छोटेंसें बिल, हीं उदाहरणें पाहून हिंदु स्त्रियांची स्वतःची कायदेशीर स्थिति सुधारण्याबद्दलची उमेद वाढत आहे. सौ. मुनशी यांचें विषमविवाहविषयक बिल व सौ. सुब्बारायन् यांचें एकपत्नी-त्वाच्या सक्तीचें बिल या आकांक्षा खऱ्या ठरवतील असे वाटते.

आतां सध्यांच्या हिंदु लॉप्रमाणे वारसाहक्काच्या बाबतींत हिंदु स्त्रियांची कायदेशीर स्थिति काय आहे हे पाहू.

हिंदु लॉप्रमाणे एकत्र कुटुंब हा समाजाचा घटक समजला जातो. या एकत्र कुटुंबपद्धतीविरुद्ध आजपावेतो पुष्कळच लिहिलें गेलें आहे. ही संस्था सध्यां जगांत दुसऱ्या कुठल्याही सुधारलेल्या समाजांत सांपडत नाहीं. एकत्र कुटुंब हा प्राचीन युगांतील ( patriarchal group ) अवशेष असावा; कारण त्या पद्धतीचे सर्व गुणदोष या एकत्र कुटुंबपद्धतींत सांपडतात. Patriarchal group हा जीवनांतील संकटांना व अडचणींना एकजुटीनें टक्कर देण्यासाठीं एकत्र आलेल्या लोकांचा एक गट असल्यामुळें सर्व सत्ता एका पुढाऱ्याच्या हातांत असणें, जीवनकलहाच्या धकाधकींत प्रत्यक्ष भाग घेऊं न शकणाऱ्या, लढाईत व स्थलांतरांत प्रजाधारणाच्या निसर्गदत्त जबाबदारीमुळें गळ्यांतल्या लोढण्यासारख्या जड होणाऱ्या स्त्रियांना दुय्यम किंबहुना अगदीं खालच्या गुलामांचा दर्जा असणें व याच कारणास्तव पुरुषसततीला महत्त्व असणें वगैरे गोष्टी व कायदे तेव्हांच्या समाजस्थितीला साजून जाण्यासारखे होते. पण त्याच कल्पना व रूढि आज विसाव्या शतकांत एकत्र कुटुंबपद्धतीच्या स्वरूपांत हिंदूंनीं उराशीं कवटाळून धराव्या ही खरोखरच आश्चर्याची गोष्ट आहे. हल्लींचा जीवनकलह हा रानटी युगांतल्या सारखा पाशवी, केवळ शारीरिक बलाचा नाहीं; बौद्धिक, नैतिक, आध्यात्मिक सामर्थ्याचा आहे. यामुळें पुरुषांप्रमाणें स्त्रियाही या जीवनकलहांत योग्य संधि मिळाल्यास बरोबरीनें भाग घेऊं शकतील. ती योग्य संधि प्रथम त्यांना न देणें व नंतर त्यांना

परावलंबी, दुबळ्या, असमर्थ समजून गुलामांच्या पायरीवर उभ्या करणें हा दुहेरी अन्याय आहे. हा अन्याय प्रत्येक हिंदु कुटुंबांत सर्रहा चालू आहे. एकत्र कुटुंबांत इस्टेटीचा भागीदार, मालक हा नेहमीं पुरुषच असूं शकतो. हातपाय नुकतेच नाचवूं लागणाऱ्या पाळण्यांतल्या चिमण्यापासून तों मान लटलट हलूं लागलेल्या वृद्धापर्यंत पुरुष तेवढे कुटुंबाचे मालक, आणि स्त्रिया तेवढ्या सगळ्या—मग ती परकरी पोर असो; न्हातीधुती, जाणती युवति असो किंवा वृद्ध आजीबाई असो—गुलाम; मालमत्तेच्या, वारसाहक्काच्या अनधिकारी व अन्नवस्त्राच्या तेवढ्या मालक असतात.

स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायांखेरीज दुसरेही कित्येक दोष या एकत्र कुटुंबपद्धतींत आहेत; ते जातां जातां थोडेसे पाहूं.

इंग्रजी अंमलांत नोकरीपेशाचे शहरी जीवन सुरू होण्यापूर्वीं बहुतेक कुटुंबे शेतीवर उपजीविका करणारीं असत. त्या वेळीं पन्नाससाठ माणसांचीं मोठमोठीं कुटुंबे एकत्र असणें आर्थिक दृष्ट्या फारसें जड होत नसे. सर्व माणसें एका ठिकाणीं, एका सावलींत एकोप्यानें राहात. कृषिप्रधान समाजांत खेडगांवची राहणी फारशी खर्चाची नसते. पण आजकाल कुटुंबांतल्या तरुण पिढींतले बहुतेक कर्ते पुरुष खेडगांवांतील शेती सोडून शहराकडे धांव घेत आहेत व बुद्धिजीवि बनून हातावर पोट भरीत आहेत. पूर्वींसारखी खरोखर एकत्र कुटुंबपद्धति आतां राहिलेलीच नाहीं. प्रत्येक मिळवत्या पुरुषाचें तो व त्याचीं बायकामुलें मिळून एक छोटेंसें विभक्त कुटुंब बनतें. अशा वेळीं मूळ एकत्र कुटुंबांत डोके देऊन राहिलेल्या कांहीं वृद्ध व अपंग, तर कांहीं आळशी, निरुद्योगी व ऐतखाऊ सोम्यागोम्यांना उचलून पैसा देऊन पोसणें कर्त्या पुरुषाला जड होतें. शिवाय या पद्धतीनें कामचुकार माणसांच्या आळसाला उत्तेजन दिल्यासारखें होते ते निराळेच. युरोपादि देशांत एकत्र कुटुंबपद्धतीचे हे दोष लक्षांत येऊन बदलत्या कालानुरूप सरंजामी पद्धतीच्या युगांतलीं मोठीं एकत्र कुटुंबे मोडून, जो तो आपल्यापुरता, अशी पद्धत पडली असावी. एकानें मिळवणें व अनेक आळशांनीं बसून फुकट खाणें ही कल्पना अन्यायाची आहे असें पुष्कळांस हिंदुस्थानांतसुद्धां आतां वाटूं लागलें आहे व तींतून पळवाट काढण्याचे प्रयत्न सुरू आहेत. मद्रासेंत श्री. अयंगार यांचें ( Gains of Learning ) बिल व वरिष्ठ कायदे कौन्सिलांत बॅ. जयकर यांनीं

पास करून घेतलेला विद्याधनाचा कायदा यांनीं एकत्र कुटुंबपद्धतींत होणारा अन्याय पुष्कळ कमी झाला आहे.

शिवाय व्यक्तीच्या कर्तबगारीला पूर्ण अवसर मिळेल अशीच कोठल्याही समाजाची रचना व घटना असणें जरूर आहे. जी संस्था व्यक्तीची कर्तबगारी खुंटविते ती नामशेष करून टाकणें समाजोत्कर्षाच्या दृष्टीनें अत्यंत जरूर आहे. एकत्र कुटुंबपद्धतींत एकट्या मिळवत्या पुरुषाचें व्यक्तित्व व कर्तबगारी साऱ्या कुटुंबाला पोसण्याच्या जड जोखमीखालीं दडपून मारली जाते. कुटुंबांतील बाकीच्या माणसांचें व्यक्तित्व व कर्तृत्व आळसाखालीं दडपलेलें असतें; व याप्रमाणें समाजाचा घटक असें सारें एकत्र कुटुंब समाजाच्या हिताच्या दृष्टीनें निरुपयोगी ठरतें व समाजाचें व व्यक्तीचें—दोघांचें नुकसान होतें. जॉन क्रोसिअर यांनीं एकत्र कुटुंबपद्धतीखालीं व जातिभेदाखालीं व्यक्तिमत्वाचा कसा चुराडा होतो याचें सुंदर वर्णन केलें आहे. ते म्हणतात, " जातिभेद हा जसा कांहीं मुख्य देव—जगन्नाथ. याच्या प्रचंड रथाच्या अजस्र चाकाखालीं हिंदु बुद्धिमत्ता, व्यक्तित्व चिरडलें जातें. (जातिभेदांत विशिष्ट जातींच्या माणसानें अमुक एकच धंदा करावा, असा दंडक असतो. यामुळें नीच जातींत जन्माला आलेल्या कर्तबगार बुद्धिमान् तरुणांच्या कर्तृत्वशक्तीला वाव न मिळून त्यांची बुद्धिमत्ता फुकट जाते, याला अनुलक्षून वरील उद्‌गार काढले आहेत.) एकत्र कुटुंबपद्धति हा या मिरवणुकींत जगन्नाथामागून येणारा छोटा देव. तोही आपल्या वकुबाप्रमाणें व्यक्तित्व चिरडण्याचें आपलें काम करीतच असतो." एकत्र कुटुंबपद्धतीमुळें वैयक्तिक सुखाला अंतरलेल्या अभागी जीवाचें अत्यंत हृदयद्रावक चित्र श्री. य. गो. जोशी यांनीं आपल्या, 'अहो अजून माझं लग्न व्हायचंय्' या सुंदर गोष्टींत रेखाटलें आहे.

मुख्य पुरुषाला नाहींच पण घरांतील इतर मंडळींना सुद्धां सुखसमाधान मिळतांना एकत्र कुटुंबपद्धतीत आढळत नाहीं. पुष्कळ सोळभोक, ' खायला काळ व भुईला भार, ' असे घरांत गोळा झालेले मनसोक्त चरत असतात; पण समाधानाची, उपकाराची किंवा कृतज्ञतेची भावना मात्र एकाच्याही मनांत डोकावत नाहीं. उलट आपणां सर्वांना पोसणें हें त्या मुख्य पुरुषाचें कर्तव्यच असें खुशाल धरून चालून, त्या कर्तव्यांत तो कांहीं कमी करीत नाहीं ना, कुणाला जाणून वा नेणून पक्षपातानें तर वागवीत नाहीं ना. हें डोळ्यांत तेल

घालून पाहावयास सर्वजण टपलेले असतात, व यःकश्चित् कारण मिळाल्याबरोबर व्रणावर टोंची मारणाऱ्या कावळ्याप्रमाणें कावकाव करून आदळआपट, भांडणें करून मिळवत्या पुरुषास नको जीव करून टाकतात; 'पण लक्षांत कोण घेतो' मध्यें अशा एकत्र कुटुंबाचें सुंदर चित्र काढलें आहे. कमी पैसे मिळवणाऱ्या पण जास्त खर्च असणाऱ्या शंकरमामंजींचा घरांत केवढा टेंभा! आणि सर्वांत जास्त पैसे मिळवून घरांतलें संसाराचें गाडें सुरळीत चालू ठेवणाऱ्या सालस गोपाळमामंजींच्या कपाळीं तेवढ्या असंतुष्टांच्या शिव्या व वाईटपणा.

आणि एवढे सगळे सोसून, एवढा स्वार्थत्याग करून शेवटीं या मुख्य पुरुषाला काय फायदा व बक्षिस मिळते? एवढेच की, त्याचा अकालीं अंत झाल्यास त्याचे भाऊबंद त्याच्या कष्टार्जित इस्टेटीचा ताबा घेऊन त्याच्या बायकामुलींना घराबाहेर काढतात किंवा मोठ्या मेहेरबानीनें त्यांच्याकडून उरापोटीं कष्ट करून घेऊन, शिळा कोरडा तुकडा त्यांच्या तोंडावर टाकतात! खरोखर एकत्र कुटुंबपद्धतीसारखी अन्यायी व समाजविघातक सस्था विरळाच.

आतां कोणी कोणी असें म्हणतात कीं, ज्या एकत्र कुटुंबानें मुलाचे शिक्षण केलें, त्या कुटुंबाचे भरणपोषण करणें हें त्या मुलाचें कर्तव्यच आहे; पण हे म्हणणें बरोबर नाहीं. मुलांना वाढवणें व त्यांचें शिक्षण करणें हें आईबापांचें कर्तव्यच आहे. आदर्श समाजांत व राष्ट्रांत हें कर्तव्य आईबापांकडून योग्य रीतीनें पार न पडल्यास तें राष्ट्राला करावें लागतें. मुलांना आपल्या सुखासाठीं बुद्धिपुरःसर वा अबुद्ध्या आईबाप जन्म देतात. बिचाऱ्या मुलांच्या इच्छेचा किंवा आवडीनिवडीचा प्रश्नच नसतो त्यांत; मग तीं मुलें निरोगी व सद्गुणी निपजून समाजाचे हित करतील, निदान समाजाला भारभूत तरी होणार नाहींत, याविषयी खबरदारी बाळगणें हें प्रत्येक आईबापावरील एक सामाजिक ऋणच आहे. आपल्या प्राचीन संस्कृतीप्रमाणें सुद्धां संततिवर्धन पितृऋण फेडण्यासाठीं अवश्य समजलें जातें. तेव्हां वंशवृद्धि करणें, वंश वाढत्या वैभवानें चालू ठेवणें हें एक प्रकारचें आईबापांनीं फेडावयाचें समाजाचें म्हणा, मागील पिढीचें किंवा हवें तर पुढील पिढीचें म्हणा, ऋण आहे; तो कांहीं मुलांवर केलेला उपकार नव्हे व म्हणून त्याच्या मोबदल्याची आईबापांनीं किंवा एकत्र कुटुंबानें अपेक्षा करणें योग्य नव्हे.

शिवाय वडील मुलाच्या डोक्यावर धाकट्या भावंडांच्या शिक्षणाचा व पोषणाचा भार टाकण्यास आईबाप मोकळे असले म्हणजे ते साहजिकच संततीच्या संख्येविषयीं व स्वतःच्या वार्धक्याच्या तरतुदीविषयीं बेफिकीर असतात. एकत्र कुटुंबपद्धति नाहींशी होऊन ज्याचा तो अशी स्वावलंबी वृत्ति बळावली म्हणजे संततिनियमनाची आठवण विवाहित जोडप्यांना खात्रीनें होईल.

असो. याप्रमाणें एकत्र कुटुंबपद्धतीचे कांहीं दोष आपण पाहिले. अर्थात् आपल्या विषयाच्या दृष्टीनें एकत्र कुटुंबपद्धतीचा सर्वांत गर्ह्य दोष म्हणजे स्त्रियांना तींत मिळालेला किमान दर्जा याविषयीं आतां जास्त विचार करूं.

पाश्चात्य सुटसुटीत कुटुंबपद्धतींत स्त्रियांना मोठ्या मानाचे स्थान मिळालें आहे. तेथें स्त्री ही गृहसाम्राज्ञी समजली जाते; व कुटुंबाच्या सर्व प्रकारच्या काळज्या व जबाबदाऱ्या आपल्या शिरावर घेऊन त्याबद्दल योग्य तो मान मिळवते. पण हिंदु एकत्र कुटुंबांत मात्र घरांतील सर्व खस्ता खाऊनही स्त्रियांची योग्यता साधारण नोकरापेक्षां किंवा गुलामापेक्षां जास्त ठरत नाहीं. कारण नोकर हवा तेव्हां नोकरी सोडून जाण्यास तरी मोकळा असतो व त्या जोरावर आपला मान सांभाळून असतो व प्रसंगीं शिरजोरही होतो. पण हिंदु स्त्रीला मात्र घराच्या चार भिंतींपलीकडे तरणोपाय नसतो. त्यामुळें अनेक हाल, कष्ट काढून अपमान सोसूनही ती घरांतच डोके टेकून पडते; आणि हें साहजिकच आहे.

स्त्री ही पश्चिमेकडे नवऱ्याची सखी व मुलांची गुरु म्हणून तिला यथायोग्य मान मिळतो. पण आमच्याकडे लहान वयांतच संसाराचा व मातृपदाचा बोजा अंगावर पडल्यामुळें तिच्या मनाची व शरीराची पुरी वाढ होण्याला अवसरच नसतो. शिक्षणाच्या नांवानें पूज्य; मोठ्या वडीलधाऱ्या माणसांनीं गजबजलेल्या घरांत सूनबाईच्या इच्छाशक्तीचा प्रथम कोंडमारा व मग क्रमानें पूर्ण लोप झालेला. याच कारणामुळें अनुभवजन्य ज्ञानाचा अभाव; घरांतील सहानुभूतिशून्य वातावरणानें स्वभाव कुरठा, चिडखोर झालेला; मनोवृत्ति संकुचित व खुरटलेल्या पतिपत्नींनीं एकमेकांची ओळख करण्याचें, स्नेहबंधन गुंफण्याचें वय, वडील माणसांच्या बुजबुजाटांत मत्सर, कोत्या व बुरसलेल्या समजुतींनीं कोंदलेल्या वातावरणांत व्यर्थ जाऊन, एकमेक परस्परांना हळूहळूं दुरावत जाऊन कायमचीं परकीं बनतात. अशा परिस्थितींत

गृहिणी, 'सचिवः सखी प्रियः ।' कशी होणार? व अशी अडाणी माता मुलांना तरी कसलें वळण लावणार? मुलगा जरा मोठा होऊन र ट फ करूं लागला कीं आईला मूर्ख ठरवूं लागतो; मग अशा परिस्थितींत आईला व पत्नीला गृहांत मानाचें स्थान कसें मिळणार? बरें, स्त्रीला गृहांत बौद्धिक दर्जा नाहीं तो नाहींच, पण आर्थिक दर्जा तर त्याहूनही नाहीं; त्यामुळें स्त्रीची किंमत एकत्र कुटुंबांत अगदींच कवडीमोल होते. घरांतले सगळे पुरुष मिळवणारे म्हणून त्यांना मान; घरांतील कर्त्या वडील बायका म्हणून त्यांना मान. (अर्थात् हा मात्र फक्त सूनबाईपुरताच; कारण त्यांचीही एका कार्डीवरही सत्ता नसल्या-मुळें एकत्र कुटुंबांत पुरुषांच्या दृष्टीनें त्यांना कांहींच मान नसतो.) घरांतील पांच वर्षांच्या मुलाला जेवढा मालमत्तेवर हक्क तेवढा पांच मुलांच्या कर्त्या आईलाही नसतो ही गोष्ट सर्वांना ठाऊक असते; मग स्त्रीला कोणीं व कां मान द्यावा? 'पण लक्षांत कोण घेतो' मध्यें अरेराव शंकर मामंजी मूर्ख बापा-च्या शिक्षेंत वाढलेली अचरट पोरें व कर्त्या सासूबाई—यांच्या कैचींत उमा-सासूबाईची जी अवस्था होई तीच जवळजवळ साऱ्या स्त्रियांची होते असें म्हणावयास हरकत नाहीं. ज्या स्त्रीला मूळ आर्यांनीं देवस्थानीं मानून तिची पूजा केली, वंशवेली म्हणून तिला व्यवहारांत गौरविली, माता म्हणून 'गुरूणां सहस्रेषु' श्रेष्ठ मानली त्या स्त्रीला स्मृतिकारांनीं

**भार्या पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः ।**
**यत्ते समाधिगच्छन्ति यस्य ते तस्य तद्धनम् ॥** —मनु.

असे म्हणून गुलामांच्या व अज्ञ लेंकरांच्या ओळीला बसवावे व पैशाचा प्रश्न निघाला असतां तिच्या तोंडाला पानें पुसावीं! ही नीति व हा कायदा लबाडीचा व ढोंगीपणाचा आहे असें म्हटले तर फारसें चुकीचें होणार नाहीं.

आतां स्त्रीला कुंवार, सवाष्ण व वैधव्यदशेंत, एकत्र कुटुंबांत काय काय हक्क असतात हें क्रमशः कै. गोखले यांच्या उपरोक्त लेखमालेच्या मदतीनें पाहूं.

सध्यांच्या हिंदु लॉप्रमाणें एकत्र कुटुंबांतले पुरुष हेच फक्त कुटुंबाचे घटक मानले जातात. सर्व स्त्रियांना दुय्यम आश्रितांचा दर्जा मिळतो. समजा, एक पुरुष व त्याचे कर्ते पांच मुलगे असें कुटुंब असलें तर ते सहा जण कुटुंबाचे घटक. पुरुष मृत झाला तर मग पांचच घटक. माता ही फक्त कष्टाची व अन्नवस्त्राची मालक; पांच कर्त्या मुलांपैकीं, एकादा मृत झाला

तर त्याची विधवा स्त्री पुन्हां कष्टाची व पोटगीची मालक. मुलींचीही हीच अवस्था; ती लग्न होईपर्यंत अन्नवस्त्राची मालक; तिचें लग्न करून देण्याची जबाबदारी कायद्यानें एकत्र कुटुंबावर टाकली आहे. पण लग्न अमुक पैसा खर्च करून करावें, किंवा मुलीला स्थळ अमुक दर्जाचें बघावें अशी कांहींच सक्ति कायदा एकत्र कुटुंबावर करीत नाहीं. लग्न केलेंच पाहिजे अशी सक्तीही कायद्याने एकत्र कुटुंबावर केलेली नाहीं. लग्न होईपर्यंत किंवा सज्ञान होईपर्यंत कुमारिकेला अन्नवस्त्र देणे एवढ्यापुरतीच कायद्याची सक्ति आहे; म्हणजे केवढा अन्याय पहा. एकाच आईबापाच्या उदरीं आलेल्या भावांना बापाची मालमत्ता वांटून घेण्याचा हक्क; पण बहिणींना मात्र जन्मदात्यांच्या तनसडीवर सुद्धां हक्क सांगतां येत नाहीं.

मूळ याज्ञवल्क्यस्मृतींत स्त्रियांना मालमत्तेवर हक्क दिला आहे,

**यदि कुर्यात्समानंशान् पत्न्यः कार्याः समांशिकाः ।**

**न दत्तं स्त्रीधनं यासां भर्त्रा वा श्वशुरेण वा ।।**

" जर मालमत्तेचे सारखे वांटे पाडण्याची वेळ आली तर ज्या स्त्रियांना नवऱ्याकडून किंवा सासऱ्याकडून स्त्रीधन मिळालेलें नाही अशा स्त्रियांचा सारखा हिस्सा पाडावा." अविवाहित बहिणीबद्दल म्हटलें आहे,

**असंस्कृतास्तु संस्कार्या भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः ।**

**भगिन्यश्च निजादंशाद्दत्वांशं तु तुरीयकम् ।।**

संस्कार झालेल्या भावांनीं संस्कार न झालेल्या बहिणींचे संस्कार (लग्नादि) करावे व आपल्या वाट्यापैकीं चौथा हिस्सा त्यांना द्यावा.

या श्लोकाप्रमाणें मातेला व बहिणीला, बायकोला व मुलींना एकत्र कुटुंबाच्या मालमत्तेंत हिस्सा मिळावा असें याज्ञवल्क्याचे स्पष्ट मत दिसतें. पण पुढें भरूचीसारख्या टीकाकारांनीं अर्थ फिरवून विधवेला पोटगीची व कुमारिकेला पोटगीची व लग्नखर्चाचीच फक्त मालकीण बनवून टाकलें. हिंदु लॉंत सर्वमान्य झालेल्या मिताक्षरानें याज्ञवल्क्याचा मूळ अर्थ मान्य केला आहे. पण न्यायमंदिरांत खटले चालवतांना मिताक्षरा दुर्दैवानें धाब्यावर बसवला जाऊन भरूचीचीच मल्लिनाथी मान्य केली गेली! आतां सुधारकांनीं व सुबुद्ध स्त्रियांनीं चळवळ करून मूळ अर्थ पुन्हां मान्य करून घेण्याची खटपट केली पाहिजे. आतां लोकपक्षीय विधिमंडळें झालीं आहेत तेंव्हां पूर्वींच्या 'परकी'

सरकारप्रमाणें मुळमुळीत व भित्रें धोरण न स्वीकारतां स्पष्ट व धीट कायदे झाले पाहिजेत.

देशमुखांनीं या बाबतींत लक्ष घालून स्त्रियांना वारसाहक्क देण्याबद्दलचें बिल दोन वर्षांपूर्वी विधिमंडळांत आणलें होतें. त्या बिलान्वयें पुढील दोन सुधारणा व्हावयाच्या होत्या. (१) कोणच्याही हिंदू स्त्रीस जी मिळकत मिळावयाची ती संपूर्ण मालकीच्या स्वरूपाची मिळावी, नुसत्या भोगवटयापुरती नसावी. (२) एकत्र कुटुंबांतील ज्यास पुत्र नाही अशा भागीदाराची पत्नी व मुलगी यांस त्याच्या मरणानंतर त्याचा कुटुंबांतील वारसाहक्क मिळावा व त्यास पुत्र असल्यास पत्नी व मुलगी यांस पुत्राच्या बरोबरीनें हिस्सा असावा.

या बिलाला सनातनींकडून व इतरत्रही फार विरोध झाला. खरे पाहतां या बिलांत गैरवाजवी असें कांहींच दिसूं नये. स्त्रियांविषयीं फारशी उच्च भावना न बाळगणाऱ्या मुसलमानी कायद्यांत सुद्धां स्त्रियांना वरील हक्क दिलेले आहेत. मुसलमान स्त्रीला तिच्या पित्याच्या व पतीच्या मालमत्तेवर हक्क कायद्यानें सांगतां येतो. लग्नानंतर सुद्धां पित्याच्या किंवा प्रथमपतीच्या मालमत्तेवरील तिचा हक्क उडत नाहीं. मनूच्या दंडकाप्रमाणें (यस्य ते तस्य तद्धनम्) स्त्रीचे द्रव्य मुसलमान नवरा घेत नाहीं; उलट लग्नाच्या करारांत त्यालाच तिच्या नांवानें आपल्या मालमत्तेतील द्रव्य उचलून द्यावें लागते. शिवाय लग्नानतर पत्नीला पतीच्या मालमत्तेत आठवा हिस्सा मुलें असल्यास मिळतो. मुले नसल्यास चौथा हिस्सा मिळतो. आईला मुलाच्या इस्टेटीत सहावा हिस्सा असतो. मुलगा नसल्यास मुलीला बापाची अर्धी इस्टेट मिळते. एकीपेक्षां जास्त मुली असल्यास प्रत्येकीला दोनतृतीयांश हिस्सा मिळतो: मुलगे असल्यास प्रत्येक मुलीला भावाच्या अर्ध्या हिश्याइतकी इस्टेट मिळते; याप्रमाणें मिळालेली मालमत्ता मुसलमान स्त्रीच्या पूर्ण मालकी हक्काची असते. ती त्याची हवी ती विल्हेवाट नवऱ्याच्या संमतीशिवाय लावं शकते.

याप्रमाणें मुसलमान स्त्रीला हिंदु स्त्रीपेक्षां किती तरी जास्त वारसाहक्क आहेत. ख्रिश्चनांच्या कायद्याप्रमाणें विधवेला मृत्युपत्र केलेलें नसल्यास, इस्टेटीचा तिसरा हिस्सा मुलगेमुली असल्यास मिळतो. मुलें नसल्यास अर्धा

हिस्सा मिळतो; पण तो कमींत कमी पांच हजार रुपये तरी असला पाहिजे. मुलगा व मुलगी यांना बापाच्या मिळकतींत सारखा हिस्सा असतो.

याप्रमाणें इतर कायद्यांशीं तुलना करून पाहातां देशमुखांची मुलीला मुलाच्या बरोबरीनें नाही तरी पण, अंशमात्र तरी हिस्सा पित्याच्या मालमत्तेंत मिळावा, ही मागणी रास्त होती. पण देशमुख बिल सिलेक्ट कमिटींतून हें कलम वगळून बाहेर पडले! कारण सनातनी लोकांनी असा मुद्दा पुढें आणला कीं, मुलगी ही परघरीं, परगोत्रांत जावयाची असते; तिचा सासरच्या कुटुंबाकडे ओढा असणार, तेव्हां माहेरच्या पैशांवर तिनें कां म्हणून हक्क सांगावा? बापाचें व कुटुंबाचें नांव पुढे चालवणारा मुलगा त्याच्या मालमत्तेचा मालक व्हावा व परगोत्रीं जाणारी, परघराचे तोंड उजळणारी मुलगी फक्त अन्नवस्त्राची व लग्नखर्चाची धनीण व्हावी, हें रास्त व न्याय्य आहे. हे न्याय्य असेल कदाचित्, पण व्यवहारांत मात्र स्त्री दोन्हींकडून फसली जाते असें अनुभवास येतें. शिवाय मुलगी जन्मभर अविवाहित राहिली किंवा विद्या शिकून, नांवारूपाला येऊन बापाचा लौकिक वाढवूं लागली तर मग हिंदु लॉमध्यें तिला बापाच्या मालमत्तेत हिस्सा देण्याची तरतूद आहे काय? ती जोंपर्यंत नाही, तोंपर्यंत वरील मुद्दा पुढे आणणें व्यर्थच ठरणार. दुसरे असें कीं, ज्या परगृहीं ती जाते त्या परगृही तरी हिंदु कायद्याने तिला मालमत्तेत कांही वारसाहक्क ठेवला आहे काय? याही प्रश्नाचे उत्तर नास्तिपक्षींच देणें भाग आहे. मग कुमारिकेला बापाच्या मालमत्तेत भाग न ठेवणें हें अन्यायाचें, त्यांना हीन दर्जा देणारें आहे असें म्हणावयास काय हरकत आहे?

याप्रमाणें कुमारिकेला वारसा हक्क नाहीत, तिच्या लग्नाचीही बापाभावावर सक्ति नाहीं, हे आपण पाहिले, मात्र तिच्या संमतीशिवाय तिला वाटेल त्याला दान करून पुण्य मिळवण्याचा हक्क बापास आहे. याप्रमाणें एकादी वस्तु यापलीकडे तिला किंमत नाहीं. ज्या विवाहाने तिच्या जीवनांत मोठें स्थित्यंतर व्हावयाचें असतें, त्या विवाहाच्या बाबतींत तिची कोणीही संमति विचारीत नाहीं; संमति विचारण्याजोगी ती जाणतीही नसते. आतां तिला सासरीं तिच्या हक्काच्या घरीं काय आर्थिक दर्जा प्राप्त होतो ते पाहूं.

लग्नांत व लग्नानंतर कांहीं दिवस, प्रथम प्रथम नववधूला मोठी मौज वाटत असते. प्रत्येक जण नव्या नवलाईनें कोडकौतुक करतो. पाटीभर दागिने,

ानवे उंची कपडे, वगैरे अगदीं चैन असते. पण तिचा हक्क यांपैकीं कशा-
ावर असतो ? गृहलक्ष्मी, गृहदेवता, गौरी, मातृदेव, अशा गोड गोड
ब्दांनीं तिला गौरवण्यांत येते. या तोंडी गौरवांत कांहीं भरीव हक्क किंवा
ार्थिक दर्जा असतो किंवा नाहीं ?

या प्रश्नाला नाहीं असेंच उत्तर द्यावें लागतें. पतिगृहींच्या डाम-
ौलाला, मानापानाला, गृहस्वामिनीच्या गौरवाला टिकाऊ किंमत शून्य
सते. हें सर्व वैभव व मानपान नवऱ्याची मेहेरबानगी म्हणून तिला मिळत
सतात. शिवाय पतीला आपल्या आर्थिक दर्जाचें, वैभवाचें समाजांत प्रद-
न करायचें कांहीं साधन हवें असतें. ते साधन त्याला बायकोमध्यें मिळतें.
ायकोच्या अंगावर उंची वस्त्रेलेणीं असलीं, फिरायला जायला मोटार, मागेंपुढें
ाकर, घरांत उठाबसायला कोचेंकपाटें असलीं म्हणजे नवऱ्याची सांपत्तिक
्थिति लोकांना दिसून येते. एक प्रकारची जाहिरात म्हणून या साऱ्या गोष्टी
ायकोला मिळत असतात. अर्थात् नवऱ्याच्या मर्जीप्रमाणें ती जोंवर वागेल,
ोंवरच या गोष्टी तिला मिळणार ! डॉल्स हाऊसमधील नोराप्रमाणें प्रत्येक
त्नी हें आपल्या पतीचे एक मनरंजक खेळणें, एक लडिवाळ करमणूक असते.
रीबाच्या संसारांत रांधणारी, पोराबाळांच्या खस्ता खाणारी, नवऱ्याची शारी
िक गरज भागवणारी ती एक जरूरीची वस्तु असते. ज्या दिवशीं या साऱ्या
ोष्टी ती नवऱ्याच्या मनांत भरण्याजोग्या करणार नाहीं, त्या दिवशीं ती
ापलें वैभव व मानपान यांना मुकते. गृहांतील लक्ष्मीचें, रंगमहालांतील
ाणीचें तिचें स्थान नाहींसें होऊन ती नुसत्या अन्नवस्त्राची एकदम माल-
ीण बनते. पतिराज खुशाल त्यांना पसंत पडेल अशा दुसऱ्या राणीची
्थापना गृहांत करूं शकतात. पत्नी त्याबद्दल कांहींही जाब पतीला कायदे-
ीर रीत्या विचारूं शकत नाहीं. कारण हिंदु लॉप्रमाणें बहुपत्नीकत्वाची
ुभा पतीला आहे. पति बाहेरख्याली असला; दारूबाज, जुगारी बनून संसाराचा
त्यानाश करूं लागला, तरीही हिंदु लॉप्रमाणें पत्नी त्याच्यापासून घटस्फोट
मेळवूं शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर, सुरक्षिततेसाठीं मालमत्ता घेऊन दूरही
सरूं शकत नाहीं. कारण हिंदु लॉप्रमाणें पत्नीला पतीच्या मालमत्तेंत हिस्सा
कधींच मिळूं शकत नाहीं.

पतिराजांनीं दुसरी मालकीण आणल्यावर त्राग्यानें पहिली स्त्री गृह-

त्याग करूं शकत नाहीं. तिनें पतीपाशीं राहिलेंच पाहिजे अशी कायद्यानें तिच्यावर सक्ति आहे. ती अपमान सोशीत नवऱ्याच्या घरीं राहिली तरच अन्नवस्त्र तरी तिला मिळतें. बाहेर कुठें पडली तर तें अन्नवस्त्रही जातें. शिवाय नवरा जबरदस्तीनें हवा तेव्हां तिचा ताबा घेऊं शकतो. अन्नवस्त्राची परवा न करतां, एकादी बाणेदार स्त्री घर सोडून गेलीच तर तिला आपलीं मुलेंबाळें बरोबर नेतां येत नाहींत. कारण माता ही वेदपुराणांतल्या मंत्रांनीं व सुभाषितांनीं वर वर कितीही गौरवलेली असली तरी, आपल्या बालकांची, स्वतःच्या रक्तामांसाच्या पिंडाची ती कायदेशीर पालक, मुलांचा पिता असतांना, ठरूं शकत नाहीं. बाप दुःशील, मूर्ख असला व माता सुशील, शहाणी असली तरी पिताच कधीं कधीं मुलांचा पालक ठरतो. मुसलमान स्त्रीला घटस्फोट घेतल्यानंतर सुद्धां आपल्या मुलांचे पालकत्वाचा हक्क असतो. सात वर्षांचा होईपर्यंत मुलाची व मुलगी वयांत येईपर्यंत तिची पालक आई असते. वरील वय उलटल्यावर मग बाप हा मुलांचा पालक ठरूं शकतो.

याप्रमाणें इतर धर्मांतल्या स्त्रियांना हिंदु स्त्रियांपेक्षां किती तरी जास्त सवलती आहेत. ख्रिस्ती व पारशी पुरुष दुसरें लग्नच कायद्याप्रमाणें करूं शकत नाहीं. तो व्यभिचारी असेल तर बायकोला नवऱ्यापासून दूर सरतां येतें व हक्कानें आपल्या दर्जाप्रमाणें अन्नवस्त्राकरतां रक्कम नवऱ्याकडून वसूल करतां येते. मुसलमान नवऱ्याला चारांपेक्षां जास्त बायका तरी करण्याची बंदी कुराणानें केली आहे! हिंदु नवऱ्याला मात्र सोळासहस्र एकशे आठ बायका करण्याचा सदर परवाना आहे. एवंच, हिंदु स्त्रीप्रमाणें अगदीं असहाय, पंकांत रुतलेल्या गायीसारखी दीनवाणी, कंगाल, अशरण, दुबळी, अपमानकारक स्थिति दुसऱ्या कुठल्याही परधर्मीय स्त्रीची नसते.

ही झाली सुवासिनींच्या आर्थिक हक्कांची हकीकत. खुद्द सुवासिनी सनाथ स्त्रीच जर नुसत्या अन्नवस्त्राची, पोटगीची मालक ठरते, तर मग विधवेची आर्थिक स्थिति जास्त हीन असणार हें उघडच आहे. देशमुख बिलापूर्वी विधवेची, विशेषतः एकत्र कुटुंबांतल्या विधवेची, स्थिति फारच हलाखीची होऊन जात असे. पतीच्या मृत्यूनंतर दिराकडे सर्व मालकी जाऊन ती पोटगीची मालक व निव्वळ एक आश्रित बने. भाऊबंदांच्या ताब्यांत एकदां इस्टेट गेल्यानंतर तिला दमकडी घेतां येत नसे. फक्त विधवेला आसरा देणें व तिच्या

पोटाला घालून तिला अंगभर वस्त्र देणें एवढीच जबाबदारी एकत्र कुटुंबावर असे. त्याबद्दल अर्थात् बिचारी किती तरी कष्ट एकत्र कुटुंबासाठीं करतेच, पण त्याबद्दल कृतज्ञतेची भावना किंवा सहानुभूतीच्या वागणुकीचें मात्र तिला दर्शन-ही होत नाहीं. ती जशी कांहीं निव्वळ ‘ खायला काळ व भुईला भार ’ आहे असें दीर-जावा तिच्या तोंडावर उघड दर्शवतात, व साऱ्या संसारसुखाला आधींच अंतरलेली व आपल्या जीवाचे त्राग्यानें हाल करणारी विधवा अश्रू गाळीत मरणाची वाट पाहात दिवस कंठीत असते.

ही झाली एकटया विधवेची हकीकत. आतां तिच्या पदरीं मुलें असलीं तर आर्थिक दृष्टया तिचा काय दर्जा व अवस्था होते हें पाहूं. या मुलांपैकीं एकादा जर मुलगा असला तर त्या मुलाच्यामुळें त्या विधवेला एकत्र कुटुंबा-च्या मालमत्तेवर दुरून तरी हक्क सांगतां येई (देशमुख बिलापूर्वी). तोही अर्थात् दुरूनच. कारण नवऱ्याच्या राजवटींत जसा स्त्रीचा मानपान नवऱ्याच्या मर्जीवर अवलंबून असतो, बाकी ती केवळ पोटगीचीच मालक असते; त्याच-प्रमाणें मातेचें आज्ञापालन, मातेची सत्ता, मुलाची लहर असेल तोंवर. त्याची मर्जी फिरली तर मग तो फक्त पोटगी आईला देण्यास बांधलेला. एकत्र कुटुंब असल्यास तें विधवेच्या पोटगीचा भार सोशी. पण कुटुंब विभक्त आहे व मुलाशीं पटत नाहीं अशी परिस्थिति असल्यास देशमुख बिलापूर्वी विधवा मातेला कोणीच वाली नसे.

आतां एकत्र कुटुंबांतल्या विधवेला फक्त मुलीच असल्या तर एकटया विधवेपेक्षां तिचा मालमत्तेतील हक्क वाढण्याचें बाजूलाच राहून उलट मुलींच्या बद्दल विवंचनेची मात्र ती धनीण होई. मुलींचीं लग्नें करून देण्याची नैतिक जबाबदारी एकत्र कुटुंबावर असे. पण अर्थात् तीं काय लायकीचीं करावीं हें एकत्र कुटुंबांतील कर्त्या पुरुषांच्या मर्जीवर अवलंबून असे. बिचारी विधवा माता दिरांनीं जरा पदराला खार लावून पैसा खर्चून मुली सुस्थळीं द्याव्या म्हणून दादापुता करी, नाकधुऱ्या काढी, शक्तीपलीकडे घरांतील कामाचा बोजा उठवी. दिरांना पाझर फुटून त्यांनीं मुलींचीं व्यवस्थित लग्नें करून दिलीं तर बिचारी निर्भ्रांत होऊन मरायला मोकळी होई; पण दिरांनीं तसें न केलें, फसवाफसवी केली, वेळेनुसार मुलींचा पैसा खाल्ला तरी विधवा मातेला कायदेशीर रीत्या दिरांना याबद्दल जाब विचारूं शकत नसे.

याप्रमाणें एकत्र कुटुंबांत देशमुख बिलापूर्वी स्त्रीला आर्थिक हक्क व दर्जा स्वतंत्रपणें असा मुळींच नसे. नवऱ्याच्या हयातींत त्याच्या इच्छेनुरूप ती वैभव भोगी. एकत्र कुटुंबांत नवरा मृत झाला व मुलगा नसला तर लक्षाधीशाची पत्नीसुद्धां भिक्षाधीश किंवा पोटगीची मालक बने. आतां देशमुख बिलान्वयें हा अन्याय कांहींसा दूर झाला आहे. या बिलाप्रमाणें एकत्र कुटुंबांत भागीदाराची निपुत्रिक विधवा ही भागीदाराच्या ठिकाणीं वांटणीच्या वेळीं मानली जाऊं शकते व त्याच्या हिश्श्याची मालक होऊं शकते. मूळ बिलांत पत्नीबरोबर मुलीलाही मृत भागीदाराच्या हिश्श्यांत भाग असावा असें कलम होते; पण आपण वर पाहिल्याप्रमाणें ते पास होऊं शकलें नाहीं. विधवेला पुत्र असल्यास तिला प्रत्येक मुलाला मिळेल इतका हिस्सा एकत्र कुटुंबांतील मालमत्तेचा देशमुख बिलाप्रमाणें मिळेल—पण—तो फक्त उपभोगापुरता. तिच्या मरणानंतर धक्का न लावतां ठेवलेली ती मालमत्ता मुलास व निपुत्रिक असल्यास दिरांस किंवा इतर भाऊबंदांस जाते. याप्रमाणें नवीन बिलाप्रमाणें सुधारणा थोडी झाली असली तरी स्त्रिया या संपूर्ण मालकी हक्काला नालायक आहेत हा अपात्रतेचा कलंक अद्यापि धुतला गेला नाहीं. देशमुख बिलांत कोणत्याही हिंदु स्त्रीस जी मिळकत मिळेल ती संपूर्ण मालकीच्या स्वरूपाची मिळावी असे स्पष्ट कलम होते; पण सनातनींचा विरोध ओळखून सिलेक्ट कमिटींत तें गाळण्यांत आलें. संपूर्ण मालकीच्या या हक्काबद्दल पुन्हां एकवार जोराची चळवळ हिंदु स्त्रियांनीं केली पाहिजे. तसेच सिलेक्ट कमिटीनें मुलीच्या व बहिणीच्या हिश्श्याचें कलम साफ गाळून टाकलें तेंही पास करून हा अन्याय दूर करण्याची खटपट केली पाहिजे. हल्लींच्या लॉप्रमाणें माहेरच्या कुटुंबांतील सर्व पुरुष वारस मृत झाले असले तरच शेवटच्या पुरुष वारसाच्या बहिणीला किंवा मुलीला मालमत्ता मिळते. मिताक्षरेप्रमाणें या मालमत्तेवर मुलीचा पूर्ण हक्क असतो. दायभागाप्रमाणें मुलगी फक्त उपभोग घेऊं शकते; पण माहेरचा निर्वंश झाल्यावर मुलीला मालमत्ता मिळण्यापेक्षां मुलांच्या बरोबरीनें, किंवा अंशमात्र तिचा माहेरच्या मालमत्तेवर पूर्ण मालकी हक्क असणें अत्यंत जरूर आहे. स्त्रियांना माहेरची, स्वतःच्या पूर्ण मालकी हक्काची मालमत्ता असली म्हणजे नवऱ्याच्या आहारीं त्या जात नाहींत, व विवाह-

विच्छेद करण्यास जरूर तर मोकळ्या असतात, हें मागील एका प्रकरणांत आपण पाहिलेंच. असो.

याप्रमाणें एकत्र कुटुंबांतल्या स्त्रीच्या आर्थिक हक्काचा आपण विचार केला. आतां विभक्त कुटुंबांतील स्त्रीच्या हक्काचा विचार करूं. विभक्त कुटुंबांतल्या स्त्रीचीही स्थिति मोठीशी लोभनीय असते असें नाहीं. तेथेंही ती दुय्यम दर्जाचीच असते; आश्रिताच्या पायरीनें आश्रयदात्यांच्या कृपेवरच तिला अवलंबून राहावें लागतें. अनेक पुरुष भाऊबंद आश्रयदात्याच्या ठिकाणीं, थोडे व जवळच्या रक्तामांसाच्या संबंधाचे आश्रयदाते असतात एवढेंच. तरी पण देशमुख बिलापूर्वी विभक्त कुटुंबपद्धतींत स्त्रीचा एकत्र कुटुंबापेक्षां जास्त फायदा निःसंशय असे; तो म्हणजे विभक्त कुटुंबपद्धतींत नवरा संततीशिवाय मरण पावला तर त्याची मालमत्ता विधवेला आमरण उपभोगतां येत असे. निव्वळ पोटगीचे मालक बनून दिराच्या तोंडाकडे तिला पाहावें लागत नसे. तसेंच मुली पदरीं असल्या तर त्यांच्या शिक्षणालग्नाला जरूर तितका पैसा आपल्या नवऱ्याच्या सामाजिक दर्जाप्रमाणें व ऐपतीप्रमाणें ती खर्चूं शकत असे. अर्थात् मालमत्तेची हवी तशी व्यवस्था आपल्या पश्चात् किंवा हयातींत ती करूं शकत असे. तिच्या पश्चात् मालमत्ता दिराकडे किंवा दूरच्या भाऊबंदाकडे जाई; पण निदान आपल्या हयातींत तरी स्वतंत्रपणें सुखवस्तुपणानें ती राहूं शके; बंगाल प्रांतांत एकत्र कुटुंबपद्धतीसुद्धां जाचक नव्हती. तेथें विज्ञानेश्वराचा मिताक्षरा प्रमाण नसून जीमूतवाहनाचा दायभाग मानला जातो. दायभागाप्राणें एकत्र कुटुंबांत पुरुष मृत झाला तर, त्याचा वारसा भावांकडे न जातां त्याच्या विधवेकडे जातो. पण मुंबई इलाख्यांत व हिंदुस्थानांत इतरत्रही 'दायभागा'चा उदार कायदा मान्य नसल्यामुळें विभक्त कुटुंबपद्धति ही एकत्र कुटुंबपद्धतीपेक्षां पूर्वी जास्त ग्राह्य होती, व समंजस मिळवते पुरुष वांटणी करून विभक्त होण्याविषयीं दक्षता बाळगूं लागले होते. पण आतां देशमुख बिलाप्रमाणें अविभक्त कुटुंबांतही मृत मुलाचा वारसाहक्क त्याच्या विधवेस मिळत असल्यामुळें दोन्ही पद्धतींत विधवेच्या दृष्टीनें फारसा तरतमभाव उरला नाहीं.

परंतु विभक्त कुटुंबपद्धतींत विधवेला मुलगा नसतांना मालमत्ता फक्त भोगवटयापुरती मिळावी हा कायदा अन्यायाचा आहे. देशमुखांचे अविश्रांत

परिश्रमही हें भोगवटयाचें कलम फिरवूं शकले नाहींत. यावरून पूर्वी व आतांही हिंदु कायदे रचणारांचा व अंमलांत आणणारांचा स्त्रियांवर मुळींच विश्वास नव्हता हें उघड दिसतें. स्त्रीच्या ताब्यांत मालकी हक्कानें मालमत्ता आली तर ती तिची योग्य वहिवाट करणार नाहीं, तिची वाटेल तशी उधळपट्टी करून वासलात लावून टाकील, अशी त्यांची समजूत दिसते. अर्थात् स्त्रियांना अशिक्षित, अडाणी बनवून घराच्या चार भिंतींपलीकडे बघण्याची त्यांना मनाई करून, वरील आक्षेपाला या शास्त्रकारांनींच, या समाजशासित्यांनींच, जागा करून दिली नाहीं काय? पण वस्तुतः स्त्रिया अशिक्षित असूनसुद्धां व्यवहारांत पुष्कळ वेळां पुरुषांपेक्षांही चतुरता दाखवितात. पांढऱ्यावर काळें करतां येण्यापुरतें सुद्धां शिक्षण नसतांना, मोठाल्या स्थावर इस्टेटी विधवांनीं अज्ञानासाठीं वहिवाटून दाखवल्याचीं उदाहरणें पुष्कळ दाखवतां येतील. अशा परिस्थितींत स्त्रियांवर सरसकट नालायकीचा शेरा मारून त्यांच्यापासून मालकी हक्क अजिबात हिसकावून घेणें अन्यायाचे नाहीं काय? दुसरें असें कीं, एकादा पुरुष वारस, पुष्कळ वेळां नालायक, शंख, उधळा निघतो; तेव्हां त्याच्यापासून त्याच्या मालमत्तेचें व त्याच्या बायकामुलांच्या हितसंबंधांचें रक्षण करण्यास कायदा कधीं पुढें होतो काय? मग स्त्रियांविषयींच तेवढा नालायकीचा काल्पनिक आक्षेप काढून त्यांचा मालकी हक्क कायद्यानें कां उडवावा?

या भोगवटयाच्या कलमामुळें बिचाऱ्या विधवेमागें सतरा भानगडी लागतात. तिच्या मरणानंतर जे दूरचे नातेवाईक मालक व्हावयाचे असतात, त्यांची काकदृष्टि विधवेच्या वागणुकीवर सारखी असते व ती मालमत्तेची नासधूसच करीत आहे; तिनें मालमत्तेंतील कांहीं भाग आपल्या नातेवाइकांना बक्षिसच दिला, अशा हजारों तक्रारी हे उत्तराधिकारी कोर्टाकडे करीत असतात, व कोर्टाकडून तिला ताकीद आणण्याचा प्रयत्न करीत असतात. विधवेनें आपल्या विधवाधनाचा चोख हिशेब ठेवला नाहीं असें कोणी म्हणतो, तर विधवा दुर्वर्तनी आहे म्हणून तिच्या हातांतून इस्टेट काढून घ्यावी असें दुसरा म्हणतो; पण या प्रकारच्या तक्रारी विधवेच्या सुदैवानें कोर्टानें वेळोवेळीं फेंटाळून लावल्या आहेत. विधवेनें उत्पन्नांतून शिल्लक टाकली तर ती मालमत्तेचा भाग बनते का काय, हाही प्रश्न कोणीं कोणीं उपस्थित केला आहे; पण आतां असें ठरलें आहे कीं, अशी शिल्लकी रक्कम

वा मालमत्ता विधवेनें आपल्या ह्यातींत वाटेल त्याला उचलून हवी तर द्यावी; मृत्युपत्रानें मरणोत्तर तिला ती कोणाला देतां येणार नाहीं. असो. विधवेच्या पाठीमागील वरील सर्व भगभग तिला संपूर्ण मालकी हक्क दिल्यानें मिटेल.

याप्रमाणें वारसाहक्काच्या बाबतींत स्त्रियांवर कोणते अन्याय होतात व त्यांत सुधारणा कशा प्रकारची करणें जरूर आहे हें आपण वर पाहिलें. राजरत्न श्री. वा. वि. जोशी यांनीं आपल्या या विषयावरील छोटयाशा पुस्तकांत केलेल्या सूचनाही अत्यंत ग्राह्य आहेत. याच्याच अनुषंगानें बडोदें संस्थानमध्यें स्त्रियांचे कायदेशीर हक्क या बाबतींत किती सुधारले आहेत हें पाहणें अप्रासंगिक होणार नाहीं.

स्वर्गस्थ लोकप्रिय धर्मावतार श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांची कारकीर्द बडोद्यांत सुरू होण्यापूर्वी बडोदें संस्थानांत ब्रिटिश गुजराथमध्यें लागू असलेला हिंदु लॉ म्हणजे मिताक्षरा व व्यवहारमयूख चालू होता. १९२९ सालीं श्रीमंत महाराजसाहेबांनीं एक कमिटी नेमून हिंदु लॉप्रमाणें हिंदु स्त्रियांचे जे वारसाहक्क आहेत त्यांचें शोधन करून आधुनिक युगांत त्यांत कोणकोणते फेरफार करणें जरूर आहे ते सुचववावयाचें काम तिच्याकडे सोंपवलें. कमिटीनें आपल्या शिफारशी स्टेट लेजिस्लेटिव्ह कौन्सिलपुढें ठेवल्या; कौन्सिलमध्यें त्यावर चर्चा होऊन सर्व रिपोर्ट शेवटीं श्रीमंत महाराजासाहेबांना सादर करण्यांत आला. श्रीमंत सरकारांना सर्व शिफारशी पसंत पडून १६ नोव्हेंबर १९३३ पासून त्यांना कायद्याचें स्वरूप आलें. बडोद्यांत चालू असलेले स्त्रियांच्या हक्काबाबतचे कायदे पुढीलप्रमाणें आहेत :—

एकत्र कुटुंबांतल्या विधवेला तिच्या मृत पतीचे वारसाहक्क मिळतात. त्याप्रमाणें आपली वांटणी करून मागण्याचा हक्क विधवेस पोंचतो. अशा विधवेस पुत्र असल्यास पुत्रांच्या बरोबरीनें हिस्सा व पुत्र नसल्यास नवऱ्याचा सर्व हिस्सा मिळतो.

स्वकष्टार्जित मिळकतीचा मालक मृत झाल्यावर जुन्या म्हणजे हिंदु लॉमध्यें ती मिळकत त्याच्या पुरुष वारसांनाच मिळत असे. नवीन कायद्याप्रमाणें तींत विधवेला मुलाच्या बरोबरीनें हिस्सा मिळतो. तसेंच विधवा सुनेला मयत सासऱ्याची मालमत्ता सासू ह्यात नसल्यास मिळते.

तसेंच जुन्या म्हणजे हिंदु लॉप्रमाणें मुलीला सर्व पुरुष वारस मृत असल्यास माहेरची मालमत्ता मिळूं शके; नाहीं तर माहेरच्या इस्टेटीवर तिचा फक्त पोटगी व लग्नखर्चापुरता हक्क असे. नवीन कायद्याप्रमाणें पोटगी व लग्नखर्चाऐवजी भावांच्या बरोबरीनें तिला मिळणारा हिस्सा ती वांटून मागूं शकते, मग भावाभावांत वांटणी झालेली असो वा नसो. विवाहित मुलगी विधवा झाल्यास व तिला सासरचा कांही आधार नसल्यास, पतीच्या मृत्यूपासून ती पितृगृहींच असल्यास आणि बाप चांगला सधन असल्यास, तिच्या योगक्षेमाचा बोजा पित्याच्या मालमत्तेवर कायद्यानें टाकला आहे. सर्व मुली सारख्याच हक्कानें पित्याच्या मालमत्तेंत वारसदार होतात. त्यांत विवाहित, अविवाहित, गरीब, श्रीमंत असा हिंदु लॉनें स्त्रीधनाच्या वारसाहक्काच्या बाबतींत मानला जाणारा भेद नाहीं. सर्व तऱ्हेच्या स्त्रीधनांनाही एकाच प्रकारचा वारसाहक्काचा नियम लागू केला आहे. मृत मुलांच्या जागीं आजाच्या इस्टेटींत, त्यांचे मुलगे व मुली वारस होतात. स्त्रीच्या वांटणीस जी मालमत्ता येईल तिच्यावर तिचा हिंदु लॉप्रमाणे नुसता भोगवटयाचा हक्क न ठेवतां पूर्ण मालकी हक्क ठेवला आहे. मात्र मालमत्ता बारा हजारांहून जास्त नसावी. जास्त असल्यास जास्ती भागावर फक्त भोगवटयाचाच हक्क, पण त्यांतून सुद्धां दानधर्म, संस्थांना मदत, वगैरेंप्रीत्यर्थ रक्कम उचलून द्यायचा हक्क तिला आहेच.

यावरून बडोद्यांतील कायदा स्त्रियांचे बाबतींत किती न्यायी आहे हें दिसून येईल. या सर्व सुधारणा ब्रिटिश मुलुखांत करण्यांत आल्या तर, स्त्रियांची आर्थिक व त्यामुळें एकंदर स्थिति किती तरी सुधारेल !

मलबार व त्रावणकोर यांमध्येही वारसाहक्काचे बाबतींत हिंदु लॉ चालूं नाहीं; तेथें मातृसत्ताक पद्धति चालू आहे. मातृसत्ताक पद्धतींत हिंदु लॉच्या बरोबर उलट तत्त्व आहे. हिंदु लॉ मालमत्तेच्या बाबतींत हिंदु स्त्रियांना समाजाचे घटक मानण्यास तयार नाहीं. हिंदु लॉला स्त्रीच्या द्वारें वारसा पुढें चालू राहिलेला पसंत नाहीं. किंबहुना एका कुटुंबांतून वारसा दुसऱ्या कुटुंबांत जाऊं नये, एका कुटुंबाची एका गोत्राची मालमत्ता त्यांच्यांतल्या त्यांच्यांतच राहावी परगोत्रीं जाऊं नये, म्हणून स्त्रियांच्या द्वारें वारसा पुढें चालू न ठेवतां तो परत मूळ गोत्रांत आणण्याची पद्धत हिंदु लॉनें पाडली आहे. पण मातृसत्ताक

पद्धतींत पुरुषाला गौण स्थान असून स्त्री हीच समाजाची मुख्य घटक मानली जाते. पुरुषाची मालमत्ता त्याच्या मुलांना न मिळतां त्याच्या बहिणीच्या मुलांना मिळते. स्त्रियांना दिलेल्या प्राधान्यामुळें तेथील समाजाचें कांहींही नुकसान झालेलें नाहीं. उलट स्त्रिया कर्तबगार व पाणीदार बनल्या आहेत. हिंदु लॉच्या अंमलाखालीं असलेल्या हिंदु समाजासारखें तेथील समाजाचें अर्धे अंग लुलें नसल्यामुळें तो सर्वांगानें तेजस्वी आहे. तेव्हां हिंदु लॉनें विनाकारण इतकीं शतकें स्त्रियांवर अन्याय चालवला आहे असें सिद्ध होत नाहीं काय?

आतां हिंदु स्त्रियांच्या स्त्रीधनावरील हक्कांचा विचार करूं. स्त्रीधनाची हिंदु लॉमधील कल्पना मोठी मौलिक व उदार आहे यांत शंका नाहीं. पाश्चात्य देशांमध्ये ज्या वेळीं स्त्रीला स्वतःची अशी एक कवडीही मालकी हक्कानें मिळत नसे, अशा वेळीं आमच्या स्मृतिकारांनीं स्त्रियांसाठीं 'स्त्रीधना'ची योजना आंखली. वाईट एवढेंच आहे कीं, इतर देश विसाव्या शतकाची सावली पडण्यापूर्वींच भराभर पुढें गेले; आपल्या स्त्रियांना त्यांनीं पुरुषांच्या बरोबरीनें संपूर्ण मालमत्तेत पूर्ण मालकी हक्क दिला. पुरुषांपेक्षां कांकणभर जास्तच हक्क बायकांना दिले, पण आमचा देश मात्र अजून स्मृतिकालच्या स्त्रीधनाच्याच कायद्यांना चिकटून राहून त्यांतच मोठें भूषण मानीत आहे. हे स्त्रीधनाचे कायदेही मोठे समाधानकारक आहेत असें नाहीं, हें पुढील विवेचनावरून आपणांस दिसून येईल.

स्त्रीधनें निरनिराळ्या सहा प्रकारचीं हिंदु लॉमध्यें सांगितलेलीं आहेत. (१) यौतिक स्त्रीधन; म्हणजे लग्नाच्या वेळीं स्त्रीला जे जिन्नस लोकांनीं बक्षिस दिले ते. त्यामध्यें दोन प्रकार : (अ) आध्यग्निक. विवाहहोमाच्या वेळच्या देणग्या व (२) आध्यावहनिक; म्हणजे वरातीच्या वेळच्या देणग्या. (३) अयौतिक स्त्रीधन; म्हणजे विवाहाशिवाय इतर प्रसंगीं मिळालेल्या देणग्या; पैकीं (अ) आन्वदेयिक; विवाहविधि पुरा झाल्यावर स्त्रीच्या किंवा तिच्या नवऱ्याच्या इष्टमित्रांनीं तिला दिलेल्या देणग्या व (४) आधिवेदनिक; म्हणजे नवऱ्यानें दुसरें लग्न करतांना पहिलीच्या सांत्वनार्थ दिलेल्या देणग्या (५) सौदयिक स्त्रीधन; पति अथवा त्याचे नातलग अथवा तिचे नातलग, यांनीं प्रेमानें दिलेल्या देणग्या; (६) शुल्क. मुलगी विकल्याबद्दल बापाला जी रक्कम मिळते ती.

हीं स्त्रीधनें स्त्रीच्या पूर्ण मालकीचीं असतात. अर्थात् अडचणीच्या प्रसंगीं नवऱ्याला आपल्या बायकोचें स्त्रीधन हिरावून घेण्याचा हक्क हिंदु लॉनें दिला आहेच. एकंदरीनें हिंदु लॉला हिंदु नवऱ्यांचा फार कळवळा येतो व कैवार घ्यावासा वाटतो खरा!

लग्नापूर्वी कुमारिकेला मिळालेल्या देणग्या तिचें स्त्रीधन होय. ती कुंवारपणीं मरण पावली तर तें स्त्रीधन तिच्या सख्या भावांना; भाऊ नसले तर आईला मिळतें. आई नसल्यास बापाला, नंतर बापाच्या सपिंडांना, नंतर आईच्या सपिंडांना व ते हयात नसल्यास कुमारिकेच्या सपिंडांना त्या धनाचा वारसाहक्क जातो.

विवाहित स्त्री मृत झाल्यास तिच्या स्त्रीधनाचा वारसा पुढीलप्रमाणें असतो:—(१) प्रथम अविवाहित मुली, (२) नंतर विवाहित पण गरीब मुली, (३) विवाहित श्रीमंत मुली, (४) मुलीची मुलगी, (५) मुलीचा मुलगा, (६) स्वतःचा मुलगा, (७) मुलाचा मुलगा, (८) नवरा, (९) स्त्रीचे सपिंड.

हा वारसा अर्थात् मृत्यूनंतर जावयाचा. स्त्रीच्या हयातींत तिला सौदयिकाखेरीज इतर स्त्रीधन नवऱ्याच्या संमतीवाचून कोणाला देतां येत नाहीं. म्हणजे हिंदु लॉच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें हक्काला मुरड पडून तो नुसता नांवाचाच राहिला. मृत्युपत्रानें कोणाला स्त्रीधनाचें दानही तिला नवऱ्याच्या संमतावाचून करतां येत नाहीं. सौदयिक धनसुद्धां अडचणीच्या वेळीं घेण्याचा नवऱ्याला हक्क आहेच.

मिताक्षराप्रमाणें केव्हांही कोणत्याही रूपानें स्त्रीकडे आलेलें धन तें स्त्रीधन. त्यांत नाना तऱ्हेचे भेद करून त्याबद्दल निरनिराळे हक्कविषयक नियम करणें व स्त्रीचा त्यावरील हक्क संपुष्टांत आणणें हें विज्ञानेश्वराला बिलकुल मान्य नाहीं; पण हिंदु स्त्रियांच्या दुर्दैवानें हे सारे बारीकसारीक भेद व पोटकायदे प्रीव्ही कौन्सिलनें मान्य केले आहेत.

याप्रमाणें स्त्रीला नवऱ्याच्या संमतीशिवाय तिच्या मालकीच्या म्हणून म्हटल्या गेलेल्या मालमत्तेची व्यवस्था करतां येत नाहीं. एका बाईनें एकदां त्राग्याच्या भरांत उद्गार काढले होते कीं, "नायकिणी आमच्यापेक्षां पुष्कळ बऱ्या; त्या पुरुषांची खुशामत करून जे पैसे, दागिने मिळवतात ते त्यांच्या कायम मालकीचे होतात. लग्नाच्या बायकांना मात्र नवऱ्याची तात्पुरती

मेहेरबानी असेल तोंवरच सारे हक्क. मर्जीची गैरमर्जी झाल्यास राणीची भिकारीण केव्हां होईल याचा नियम नाहीं. " असो. आतां स्त्रीनें आपल्या श्रमावर व बुद्धीवर मिळवलेल्या धनाची काय वाट ! हिंदु लॉप्रमाणें तिच्या पूर्ण मालकीची ती ठरत नाहीं. नवऱ्याच्या संमतीशिवाय ती त्याची विल्हेवाट करूं शकत नाही असे कात्यायन म्हणतो. या चमत्कारिक कायद्यामुळें पुष्कळ मिळवत्या स्त्रिया आधुनिक काळांत लग्न करण्यास नाखुष असतात; व त्यामुळें समाज कर्तबगार, बुद्धिमान् मातांना मुकतो. सबब जयकरांच्या विद्याधनाच्या कायद्याच्या धर्तीवर, स्त्रियांच्या स्वकष्टार्जित धनाबद्दलही एक कायदा पास करून घेतला पाहिजे. इंग्लंडमध्यें सुद्धां बायकोचें स्वकष्टार्जित धन नवऱ्याचेंच असा कायदा अनेक वर्षें होता. कारखान्यांत काम करणाऱ्या स्त्रियांचे दारुडे नवरे खुशाल त्यांचा पगार आठवडयाच्या शेवटीं परस्पर घेऊन जात व कायद्यानें तो त्यांचाच असल्यामुळें कारखान्यांतूनही तो बिनहरकत दिला जाई. १८७० पर्यंत ही स्थिति चालू होती. स्वतःची मालमत्ता नसल्यामुळें स्त्रियांचे जीवन कसे परावलंबी व अनिश्चित होतें; खाजगी मालमत्तेच्या तत्त्वावर आधारलेल्या समाजांत अशा अकिंचन स्त्रिया शरीरानें व मनानें कशा दिवसेदिवस दुबळ्या होत गेल्या आहेत, हें सुधारकांनीं व स्त्रियांच्या पुढाऱ्यांनीं समाजावर व सरकारवर बिंबवल्यामुळें १८७० सालीं कायदा सुधारून प्रथम स्त्रियांची स्वकष्टार्जित मिळकत त्यांच्या पूर्ण मालकीची ठरली. १८८२ मध्यें ( Married Women's Property Bill ) विवाहित स्त्रियांच्या मालमत्ताविषयक कायदा पास झाला व स्त्रियांना नवरा, पिता व मुलगा यांच्या मालमत्तेंत हिस्सा मिळूं लागला. सध्यांचा इंग्लिश कायदा पुरुषांपेक्षां बायकांनाच जास्त अनुकूल आहे. नवऱ्याला चालू कायद्याप्रमाणें बायकोला पोसण्याची, तिला आश्रय देण्याची व तिच्या प्राप्तीवरील कर भरण्याची सक्ति आहे ! पण बायकोवर मात्र नवऱ्याला पोसण्याची सक्ति नाहीं. बायकोला झालेल्या कर्जाबद्दल नवरा जबाबदार धरला जातो; तिला कायद्यानें कांहीं दंड वगैरे झाला, तर तो नवऱ्याला भरावा लागतो. स्त्रीला कर्जाबद्दल कैदेची शिक्षा सुनावली गेली तर ती नवऱ्याला भोगावी लागते, तिला नाहीं ! याप्रमाणें हक्कांचें स्त्रियांना जसें कांहीं अजीर्ण झाल्यामुळें आम्हांला ही मेहेरबानी व जास्त हक्क नकोत.

म्हणून आतां इंग्लंडांतील स्त्रीस्वातंत्र्यवादिनी म्हणूं लागल्या आहेत. कारखान्यांत स्त्रियांना जास्त सवलती देणें, कष्टाचीं कांहीं कामें त्यांना न सांगणें वगैरेही त्यांना बिलकुल पसंत नाहीं. आम्हांला पुरुषांप्रमाणेंच समान हक्क पाहिजेत, जास्त नकोत; कारण त्यांनीं स्त्री ही पुरुषापेक्षां कमी दर्जाची आहे असें सूचित होतें असें त्या म्हणतात. असो.

आतां हिंदु स्त्रियांच्या कायदेशीर हक्कांपैकीं दत्तक घेण्याचा हक्क तेवढा राहिला. त्याचा आतां विचार करूं.

पतिपत्नीला औरस संतति नसल्यास त्यांना दत्तक घेतां येतो. हा दत्तक, पुरुष आपल्या हयातीत बायकोच्या संमतीशिवाय घेऊं शकतो. पुढें दत्तक बापाच्या मृत्यूनंतर तो दत्तक पुत्र मालक होऊन दत्तकाच्या आईला सर्वस्वीं त्याच्यावर अवलंबून राहावें लागते. असें असूनही दत्तक घेतांना आईची संमति किंवा खुषी कायद्याने विचारली जात नाही. पति हयात असतांना दत्तक घेऊं शकला नाहीं, तर त्याच्या पाठीमागे त्यानें मृत्युपत्रांत लिहून ठेवलेल्या इच्छा व हुकूम पत्नीनें पाळलेच पाहिजेत असें दत्तकविषयक हिंदु लॉ सांगतो. बंगाल व बनारसमध्यें नवऱ्याची मृत्युपत्रांत दत्तक घेण्याबद्दल पत्नीला स्पष्ट आज्ञा नसेल तर तिला त्याच्या पाठीमागे मुळीं दत्तकच घेतां येत नाहीं. मद्रास वगैरे द्रविड देशांत नवऱ्याची अनुज्ञा नसल्यास नवऱ्याच्या सर्व सपिंड भाऊबंदांच्या परवानगीवाचून विधवेनें दत्तक घेऊं नये असा कायदा आहे. महाराष्ट्रांत एकत्र कुटुंब असेल व दत्तकामुळें दीर-पुतण्यांचें नुकसान होत असेल तर विधवेने दिरापुतण्यांची स्पष्ट परवानगी असल्याशिवाय दत्तक घेऊं नये असा कायदा आहे. (अर्थात् दीरपुतणे अशी परवानगी खुषीनें देतील हें शक्यच नाहीं.) मिथिल देशांत तर पत्नी कधींच दत्तक घेऊं शकत नाहीं, फक्त पतीच घेऊं शकतो. त्यानें घ्यायचें अडचणीमुळें राहून गेलें कीं हुकलें. नवऱ्यानें दत्तक घ्यायची स्पष्ट बंदी मृत्युपत्रांत केली असेल तर अर्थात् कुठल्याही प्रांतांत स्त्रीला दत्तक घेतां येत नाहीं. शिवाय इस्टेट एकदां भाऊबंदांच्या ताब्यांत गेली कीं, नवऱ्याची परवानगी असूनही तिला दत्तक घेतां येत नाहीं. शिवाय नवऱ्याच्या आज्ञेबरहुकूम दत्तक घेतल्यावर सुद्धां दत्तविधान बेकायदेशीर ठरवून दत्तक रद्द करून घेण्यासाठीं भाऊबंदांची धडपड व बिचाऱ्या विधवेचा छळ सुरू असतोच. एवढ्या सगळ्या भानगडींतून पार

पडून दत्तविधान कायदेशीर ठरल्यावर दत्तक मालमत्तेचा पूर्णपणें मालक बनतो, व बिचारी विधवा आई हिंदु लॉच्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें केवळ पोटगीची मालक होऊन बसते. दत्तक मुलानें व त्याच्या मूळ घरच्या नातेवाइकांनीं दत्तक आईला छळून जीव नकोसा केल्याचीं उदाहरणे प्रत्यक्ष व्यवहारांत आपण पुष्कळ पाहतोंच. खरें म्हणजे कायद्यानें हिंदु विधवा आई दत्तक घेतांना तो सज्ञान असल्यास त्याच्याशीं व तो अज्ञान असल्यास त्याच्या पालकाशीं आपल्या मालमत्तेविषयक करार करूं शकते व तो दत्तकाला बंधनकारक असतो. मालमत्तेचा एकादा भाग स्वतःसाठीं किंवा स्वतःच्या मुलींसाठीं ती कराराने राखून ठेवूं शकते. पण अडाणी विधवेच्या कायद्यांच्या अज्ञानानें असा करार ती करून घेत नाही. दत्तकाच्या कृतज्ञताबुद्धीवर ती अवलंबून राहते व शेवटीं पस्ताव्यांत पडते.

याप्रमाणें परिणामीं स्त्रीला त्रासदायक होणारा हा दत्तक घेण्याचा हक्क—हक्क कशासाठीं म्हणावयाचे त्याला ? इतर अनेक कायदेशीर दुर्दशांपैकीं ती एक दुर्दशाच आहे. एकत्र कुटुंबांत भाऊबंदांच्या घशांत तिच्या हयातींत ( व देशमुख बिलाप्रमाणें तिच्या मृत्यूनंतर ) जाऊं पाहणारी इस्टेट त्यांच्याकडून काढून घेण्याची निपुत्रिक विधवेची ती एक युक्ति आहे, एवढेंच ! शिवाय मगराच्या दाढेतून बाहेर काढलेल्या या माणकाचा उपयोग तिला प्रत्यक्ष किंवा तिच्या मुलीस ( करार करून न घेतल्यास ) नसतोच; तिला पोटगी ती पोटगीच. अशा तुटपुंज्या हक्कावर सुद्धां गदा आणण्याचे अश्लाघ्य प्रयत्न कोणी कोणी करतात. मुंबई कौन्सिलांत, स्त्रियांच्या दत्तक घेण्याच्या हक्कावर निर्बंध घालण्याचें बिल १९३५ सालीं आलें होतें, तें सर्वांच्या स्मरणांत असेलच. नवऱ्याच्या परवानगीनंतरही भाऊबंदांच्या संमतीवाचून, विधवेनें दत्तक घेऊं नये अशा अर्थाचे तें बिल होतें. पण पुण्यामुंबईच्या महिलांच्या अविश्रांत व जोराच्या आंदोलनानें ते हाणून पाडलें गेलें.

याप्रमाणें वारसाहक्क, स्त्रीधनाची वासलात लावण्याचा हक्क व दत्तक घेण्याचा हक्क, या बाबतींत हिंदु लॉप्रमाणें हिंदु स्त्रियांची होणारी कायदेशीर दुर्दशा आपण पाहिली, व कायद्यांत कोणत्या प्रकारच्या सुधारणा होणें जरूर आहे याचेंही दिग्दर्शन केलें. या सुधारणा होण्यासाठीं स्त्री व पुरुष पुढाऱ्यांनीं आंदोलन व स्त्रीसमाजांत जागृति केली पाहिजे. हें काम स्त्री-वकील अर्थात्

जास्त कुशलतेनें व कर्तबगारपणें करतील. स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा अज्ञ महिलांच्या लक्षांत आणून देणें, त्यांतून त्यांना सुटकेचे मार्ग दाखवणें, गरजू व भाऊबंदांकडून फसविल्या गेलेल्या विधवांना तारणें, हिंदु लॉमध्यें स्त्रियांना अनुकूल अशी सुधारणा करून घेण्यासाठीं चळवळ करणें, वगैरे गोष्टी करण्यासाठीं जितक्या नवीन कायदेपंडिता सालोसालीं होतील तितक्या हव्या आहेत. प. वा. कृ. के. गोखले, राजरत्न वा. वि. जोशी यांसारखे कुशल कायदेपंडित स्त्रियांचे कैवारी आहेतच. त्याबद्दल त्यांना साऱ्या हिंदु स्त्रिया धन्यवाद देतीलच; पण कायदे जाणणाऱ्या स्त्रिया अज्ञ स्त्रियांच्या कैवारानें, पुढें सरसावल्या तर कार्य आणखी पुढें सरकेल. हळुहळू स्त्रिया वकिलीची परीक्षा देऊ लागल्या आहेत. मिस् कॉर्नेलिया सोराबजी या हिंदुस्थानांतील पहिल्या कायदेपंडिता. १८९२ मध्ये ऑक्सफर्डला त्यांनीं Bachelor of Civil Law ची परीक्षा दिली. अलाहाबाद युनिव्हर्सिटीची एल्एल्. बी. पदवीही त्यांनी संपादन केली; पण त्यांना प्रॅक्टिस करण्यास परवानगी मिळाली नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील पडदानशीन स्त्रियांना कायदेशीर सल्ला देण्यासाठीं म्हणून त्यांची नेमणूक करण्यांत आली. आणखीही पुष्कळ स्त्रियांनीं प्रांतोप्रांतीं वकिलीची परीक्षा दिली; पण न्यायमंदिरांतून प्रॅक्टिस करण्याची परवानगी मिळेपर्यंत त्या कांही विशेष कार्य करूं शकल्या नाहींत. १९२३ मध्यें ही परवानगी Legal Practitioners' (Women) Act अन्वये मिळाली. १९२४ मध्ये मिस् टाटा या मुंबई हायकोर्टांतील पहिल्या प्रॅक्टिस करणाऱ्या बॅरिस्टर. अलीकडे सौ. सुभद्राबाई तारकुंडे, कु. चंद्राबाई पोंक्षे वगैरे बऱ्याच स्त्रीवकील प्रॅक्टिस करूं लागल्या आहेत व कु. गोदावरी गोखले सारख्या एल्एल्. बी. झालेल्या समाजसेविका निर्माण होत आहेत. अशा स्त्रियांनीं विवाह, विवाहविच्छेद, वारसा, पालकत्व वगैरे बाबतींत हिंदु लॉ सुधारून घेण्याची खटपट केल्यास फार फायदा होईल. त्यांच्या डोळ्यांपुढून व हाताखालून नाना तऱ्हेचे दावे रोज जात असल्यामुळें, या क्षेत्रांत त्या जास्त अधिकारवाणीनें बोलूं शकतील.

---

करण १० वें : : :

## .... .... स्त्रियांचे कायदेशीर हक्क (पुढें चालू)

गेल्या प्रकरणांत आपण हिंदु स्त्रियांचे मालमत्तेवरील कायदेशीर हक्क व त्यांचा तदनुषंगे आर्थिक दर्जा यांचा विचार केला. या करणांत स्त्रियांच्या राजकीय हक्काचा व दर्जाचा विचार करणें आहे.

स्त्रियांचे राजकीय हक्क किंवा दर्जा प्राचीन हिंदुस्थानांत काय होता ाचा इतिहास सौ. हंसा मेहेता यांनीं *Our Cause* मधील आपल्या सदरहू वेषयावरील लेखांत दिला आहे. डॉ. अळतेकर यांनींही 'हिंदु संस्कृतींतील स्त्रयांचे स्थान' या आपल्या विद्वत्तापूर्ण इंग्रजी पुस्तकांत यासंबंधीं साधार ाहिती दिली आहे. यावरून असे दिसते की, अगदीं प्राचीन वेदकाल फार ूर व अस्पष्ट म्हणून सोडून दिला तरी मध्ययुगीन हिंदुस्थानांत स्त्रियांना यांच्या स्त्रीत्वामुळे राजकीय हक्कांपासून दूर ठेवलें होतें असे मानावयास ागा नाहीं. रामायणांत राम वनवासास जायचा ठरल्यावर सीतेला राज्या-भिषेक करावा अशी सूचना आली होती; पण सीता रामाला सोडून एकटी अयोध्येत राहण्यास तयार नसल्यामुळे ती अंमलांत आणतां आली नाहीं असें र्णन आहे. "महाभारतांत लढाईत कामीं आलेल्या राजांना पुत्र नसल्यास यांच्या कन्यांना त्यांच्या देशांतून राज्याभिषेक कर" असे भीष्म युधिष्ठिरास ांगतो. इतिहासांतही स्त्रियांनी आपल्या अज्ञान पुत्रासाठीं स्वतंत्रपणें राज्य-ारभार उत्कृष्ट रीतीने चालवल्याचीं उदाहरणें आहेत. राज्यपदावर त्या स्वतः र बसूं शकतच. नवव्या शतकाच्या शेवटीं ओरिसामध्यें राजा ललिताभरण ेव मरण पावल्यानंतर मांडलिकांच्या विनंतीवरून त्याची विधवा राणी सेंहासनावर बसली असा इतिहासांत उल्लेख आहे. गुप्त घराण्यांतील ाहिला राजा चंद्रगुप्त हा महादेवी कुमारदेवीसहित राज्य चालवीत असे असें म्हटलें आहे. नाण्यावर तिचे नांव व मुखवटा राजाच्या बरोबरीने काढलेला आढळतो. कौशांबीचा राजा उदयन कारागृहांत अडकून पडलेला असतांना याच्या आईनें मोठ्या हुषारीनें राज्यकारभार चालविला. इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकांत दक्षिणेंतील शातवाहन साम्राज्य राणी नयनिका आपल्या मुलाच्या अज्ञानदशेंत चालवीत होती. तसेंच चौथ्या शतकांत मध्यप्रांतांत प्रभावती

गुप्ता व काश्मीरमध्ये सुगंधा आणि दिद्दा या राण्या अज्ञानांच्या पालिका म्हणून राज्यशकट हाकीत होत्या. राजपूत इतिहासांत तर संकटाच्या व अडचणीच्या वेळीं स्त्रियांनीं राज्यकारभार कर्तबगारीनें केल्याचीं किती तरी उदाहरणे आहेत. ११९३ मध्ये मेवाडमध्ये पतीच्या मृत्यूनंतर कुर्मादेवीनें राज्य-सूत्रें आपल्या हातांत देऊन कुतुबुद्दीनाच्या सैन्याशीं टक्कर दिली. गुजराथ-मध्यें राणी कर्णावतीनें बहादूरशाहाच्या विरुद्ध चितोड झुंजविले. गुजराथमधील मिनालदेवी व राठोड राणी दुर्गावती यांनींही राज्यकारभार अज्ञानांसाठी चालविला होता. मराठयांच्या इतिहासांत कोल्हापूरच्या ताराबाई, इदूरच्या अहिल्याबाई होळकर व झांशीच्या लक्ष्मीबाई त्यांच्या शौर्यमुत्सद्दीपणाबद्दल प्रसिद्धच आहेत. अगदी परवांपर्येत ग्वाल्हेर, त्रावणकोर, कुचबिहार या संस्था-नांचा कारभार तेथील महाराण्या आपल्या अज्ञान मुलांच्या रीजंट म्हणून पाहात असत. याप्रमाणें या सर्व इतिहासावरून दिसून येईल कीं, स्त्रीचे स्त्रीत्व समान राजकीय दर्जा मिळविण्याच्या आड कधींच येत नसे.

मुसलमान कायद्याप्रमाणें तर स्त्री ही राज्याची प्रत्यक्ष वारसच समजली जाते, व अशा आपल्या स्वतंत्र हक्कानें मुसलमान स्त्रियांनीं राज्य केल्याचीं उदाहरणें हिंदुस्थानच्या इतिहासांत अनेक आहेत. रेझिया बेगम, चांदबिबी, यांचीं नांवें सर्वत्रांस ठाऊक आहेत. अगदीं अलीकडच्या इतिहासांत भोपाळ-च्या बेगमांच्या तीन पिढ्या भोपाळच्या गादीवर आल्या व त्यांनीं कुशलतेनें राज्यकारभार चालविला होता.

प्राचीन काळीं लोकसत्ताक पद्धति नव्हतीच. अगदी पूर्वी वेदकाली प्रातिनिधिक स्वरूपाच्या संस्था होत्या असे डॉ. अळतेकरांचे मत आहे. या संस्थांतून स्त्रिया भाग घेत. विवाहमंत्रामध्यें वधूनें या सभांतून उत्कृष्ट रीतीने भाग घेतल्याबद्दल आशीर्वचनें आहेत. पण वेदकालच्या उत्तर खंडांत ही स्थिति पालटली.

**तस्मात्पुमांसः सभां यान्ति न स्त्रियः ।**

असें मैत्रायणीय संहितेमध्यें स्पष्ट निषेधवचन आहे. नंतर पुढे या प्राति-निधिक संस्थांचा लोपच झाला. फक्त पंचायतीसारख्या लहान प्रमाणांत प्रातिनिधिक स्वरूपाच्या संस्था खेडेगांवांत होत्या; यांतही स्त्रियांना मज्जाव नसे, असे एकदोन स्त्रिया पंचायतीवर काम करीत असल्याचें आढळतें,

यावरून दिसतें. या पंचायती खेडेगांवांतील सर्व कारभार चालवीत. जमिनी वांटून देणें, करवसुली करून राजाकडे पोंचवणें, न्यायदान करणें हीं सर्व कामें यांच्याचकडे होतीं व स्त्रिया तीं पुरुषांच्या बरोबरीनें करूं शकत.

मुसलमानी अंमलानतर मात्र हें सारे बदललें. स्त्रियांची स्वतंत्रता नाहींशी होऊन त्या या काळांत परतत्र बनल्या. बाहेरच्या जगापासून त्यांचा संबंध तोडण्यांत आला. अज्ञान व अननुभव यांमुळे बाहेरच्या जगांत भाग घेण्यास स्त्रिया दिवसेदिवस नालायक ठरवण्यांत येऊं लागल्या. स्त्रियांनाही आपल्या पूर्वीच्या दर्जाचा विसर पडून चूलमूल हेच आपले राज्य, बाहेरचे व्यवहार हें पुरुषांचे क्षेत्र, अशी आपली प्रामाणिक समजूत करून घेऊन त्या बसल्या.

नंतर ब्रिटिशांचे राज्य सुरू झाले. पहिली राजसत्ताक पद्धति लोपली; पण लोकसत्ताक पद्धति मात्र सुरू झाली नाही. नोकरशाहीचें राज्य हिंदुस्थान-वर सुरू झालें. पण इंग्लिश वाङ्मयाच्या वाचनाने पाश्चात्य देशांत प्रचलित असलेल्या लोकसत्ताक पद्धतीची तत्त्वे लौकरच हिंदुस्थानांतील लोकांना समजून आलीं व पटली. आपल्या देशातलें राज्य चालवण्यांत आपला हात असला पाहिजे, राज्यकारभारांत आपले मत विचारले गेलें पाहिजे, ही जाणीव हिंदी लोकांच्या मनांत उत्पन्न होऊन राजकीय हक्क मिळवण्याचे प्रयत्न सुरू झाले. १८८५ मध्ये इंडियन नॅशनल कॉंग्रेस स्थापन झाली व तिनें हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा एकमुखानें सरकारपुढें मांडण्यास सुरुवात केली. १८८२ मध्ये लॉर्ड रिपननें स्थानिक स्वराज्याचा बिंदुमात्र आरंभ केला होताच; पण कॉंग्रेसच्या चळवळीनतर खऱ्या लोकशाहीला मुंगीच्या पावलानें का होईना पण सुरुवात झाली. १८९२ मध्यें पहिला इडिया ॲक्ट पास होऊन व्हाइस-रॉयच्या कौन्सिलमध्ये अप्रत्यक्ष रीत्या का होईना पण निवडणुकीचे तत्त्व शिरलें. नगरपालिकांतून हेंच तत्त्व जरा मोठ्या प्रमाणांत लागूं करण्यांत आले; तरी अर्थात् सरकारी सभासदांची संख्या ही लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधींच्या संख्येपेक्षां नेहमीच जास्त असे. १९०९ च्या मोर्ले-मिंटो सुधारणांनंतर या सस्था जास्त प्रमाणांत प्रातिनिधिक स्वरूपाच्या होऊं लागल्या. भिन्नप्रांतीय विधिमंडळांतून लोकप्रतिनिधींची संख्या सरकारी सभासदांपेक्षां जास्त प्रमाणांत राखण्यांत येऊं लागली.

याप्रमाणें हिंदी पुरुषवर्ग राज्ययंत्रांत आपला प्रवेश जास्त जास्त व्हावा म्हणून खटपट करीत असतांना हिंदी स्त्रिया मात्र अज्ञाननिद्रेत खुशाल घोरत पडल्या होत्या. बाहेरच्या जगांत आपल्याला हक्कानें प्रवेश मिळणें जरूर आहे, याची जाणीवही अद्याप त्यांना आली नव्हती. पण हळुहळू स्त्रीशिक्षणाच्या वाढत्या प्रसाराबरोबर स्त्रीवर्गात जागृति होऊं लागली व स्वदेशाच्या राज्यकारभारांत नागरिक या नात्याने भाग घेण्याचा आपला हक्क प्रस्थापित करण्याचे महत्त्व त्यांस पटूं लागले. १९१९ मध्ये मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा शिजत असतांना, मतदानाचा हक्क पुरुषवर्गामध्ये जास्त फैलावण्याचा विचार घाटत असतांना, हिंदी स्त्रीपुरुषांचे एक शिष्टमंडळ पार्लमेंटपुढे गेले, व स्त्रियांनाही पुरुषांच्या बरोबरीने मतदानाचा हक्क असावा अशी त्याने मागणी केली. पण ब्रिटिश पार्लमेंटने तरी आपल्या स्त्रियांना सार्वत्रिक मतदानाचा हक्क अजून कुठे दिला होता ? तेव्हां हिंदी स्त्रियांची मागणी ते चटकन् कबूल करील असा संभवच नव्हता. त्यामुळे मॉंटेग्यु-चेम्सफर्ड रिपोर्ट जेव्हां बाहेर पडला तेव्हां पुरुषांमध्यें मतदानाचा हक्क जास्त प्रमाणांत प्रसृत करण्याची योजना जरी त्यांत होती, तरी स्त्रियांच्या हक्काच्या प्रश्नाला मात्र अजिबात बगल दिली होती असे आढळून आलें. १९१८ मध्ये साउथबरो फ्रँचाइज् कमिटी हिंदुस्थानांत आली असतांना, हिंदी स्त्री पुढाऱ्यांनी सपाटून चळवळ करून हिंदी स्त्रियांची हक्कांची सार्वत्रिक मागणी कमिटीच्या नजरेस आणण्याचा प्रयत्न केला होता; पण ते सर्व अरण्यरूदनवत् ठरले. हिंदुस्थानांतील सामाजिक परिस्थिति स्त्रियांच्या मतदानास अद्यापि अनुकूल नाही, या सबबीवर स्त्रियांना तो हक्क देण्याची शिफारस करण्याचे कमिटीने साफ नाकारले. ही कमिटी आपल्या रिपोर्टांत म्हणते, " कांही प्रांतांत स्थानिक स्वराज्य संस्थांतून स्त्रियांना मतदानाचा हक्क दिलेला आहे; पण तो सुद्धां मुंबईसारखी कांहीं पुढारलेलीं शहरें सोडल्यास, वापरतांना स्त्रिया दिसत नाहीत. जेथें पुरुष मतदारांनाच अजून अज्ञानामुळें आपल्या हक्काचा योग्य व जबाबदाररीत्या उपयोग करतां येत नाही तेथे स्त्रियांना मतदार बनवणें वेडेपणा होईल ! शिवाय गोषाची चाल पुष्कळ ठिकाणी अंमलांत असल्यामुळें तेथें स्त्रियांना मतदानाचा हक्क देणें म्हणजे निवळ फार्सच होईल. "

या सर्व आक्षेपांना मिसेस् कझन्स् यांनीं त्या वेळीं टाइम्समधल्या

ापल्या एका लेखामध्ये चांगलें सणसणीत उत्तर दिलें होतें. त्या लिहितात,
 कांहीं ठिकाणीं स्त्रिया आपल्या हक्काचा अजून उपयोग करीत नसल्या
री, खात्रीनें लौकरच त्या आपलें कर्तव्य ओळखून आपला हक्क गाजवूं
ागतील. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं स्त्रियांना आपल्या हक्कांची जाणीव करून
णाऱ्या संस्था निघत आहेत. इंग्लडमध्यें सुद्धां मतदानाचा हक्क मिळाल्यावर
र्व स्त्रियांना त्यांच्या नागरिकत्वाच्या हक्कांची जाणीव करून देण्याला
नेक संस्था काढून पुष्कळ दिवस प्रयत्न करावा लागला. हिंदुस्थानांत तर
ोकशाहीचे तत्त्व व लोकप्रातिनिधिक संस्था या अगदीं नवीन गोष्टी आहेत.
ामुळे कित्येक पुरुष मतदारसुद्धा आपला मतदानाचा हक्क उपेक्षितांना
ाढळतात. तेव्हां उपेक्षेच्या सबबीवर स्त्रियांना हा हक्क देण्याचे टाळणें उचित
ाही. शिक्षणाच्या वाढत्या प्रसाराबरोबर त्यांची स्वकर्तव्याबद्दलची जाणीवही
ाढेल. दुसरे म्हणजे कांही पुरुष मतदार अजून अडाणी आहेत, म्हणून
र्वच स्त्रियांना मताधिकार न देणें हें तर्कशुद्ध आहे काय? मद्रास मुबईसारख्या
ांतांत बायका शिक्षणांत किती तरी पुढे गेल्या आहेत. त्याचप्रमाणे पडद्याच्या
ालीची सबबही अगदीं फोल आहे. एक तर हिंदुस्थानांत सर्व प्रांतांत
डदा नाही, व जरी कांहीं प्रांतांत असला, तरी तेथेसुद्धां 'स्पेशल' व्यवस्था
रून स्त्रियांचीं मते गोळा करतां येणार नाहींत असे नाही. ऑस्ट्रेलियामध्यें
व्हां स्त्रियांना प्रथम मतदानाचा हक्क देण्यांत आला, तेव्हां मुद्दाम नेमलेल्या
ीऑफिसर्स् घरोघर जाऊन स्त्रियांची मते गोळा करीत. तशी व्यवस्था
डदाप्रांतांसाठीं करणें सरकारला कांहीं जड नाही."

असो. सारांश एवढाच कीं, साउथबरो कमिटीनें फुसक्या सबबी
ांगून स्त्रियांच्या तोंडाला पानें पुसली. तरी स्त्रियांनीं आपला प्रयत्न
वकाटीनें चालू ठेवलाच. १९१९ मध्ये गव्हर्मेंट ऑफ् इंडिया बिल पार्लमेंट-
ढे विचारासाठी आलेले असतांना पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांच्या जॉइंट
मिटीपुढें हिंदी प्रतिनिधींच्या साक्षी झाल्या. तेव्हां मिसेस् सरोजिनी नायडू,
ासेस् ॲनी बेझंट आणि मिसेस् व मिस् हेराबाई यांच्या कमिटीनें साक्ष देऊन
्रयांच्या मतदानविषयक हक्कांची मागणी पुन्हां एकदां जोरानें पुढें मांडली.
वटीं पार्लमेंटनें हा प्रश्न ठिकठिकाणच्या प्रांतीय विधिमंडळांकडे सोपवला.
ग यामुळें स्त्रीवर्गाचा फायद्याच झाला. कारण साउथबरो कमिटोचा

कांहींही ग्रह झालेला असो, हिंदी सुबुद्ध लोकमत कांहीं स्त्रियांना मतें देण्याच्या विरुद्ध नव्हतें. इंडियन नॅशनल काँग्रेसनें स्त्रियांना आपल्या घटनेंत प्रतिनिधि होण्याचा व चर्चेंत भाग घेण्याचा हक्क केव्हांच देऊन टाकला होता. १९१७ मध्यें तर श्रीमती सरोजिनी नायडू या काँग्रेसच्या अध्यक्षस्थानीं होत्या. याप्रमाणें काँग्रेसनें, हिंदुस्थानच्या सर्वांत मोठ्या व व्यापक प्रातिनिधिक संस्थेनें, स्त्रिया या पुरुषांच्या बरोबरीनें जबाबदार नागरिक होण्यास पूर्ण लायक आहेत अशी कबुली आपणहून केव्हांच देऊन टाकली होती. हिंदी सोशल कॉन्फरन्सनेंही स्त्रियांना केवळ त्यांच्या स्त्रीत्वामुळें कुठल्याही क्षेत्रांत अटकाव असू नये अशी घोषणा वारंवार केली होती. तेव्हां प्रांतीय कौन्सिलांकडे स्त्रियांच्या हक्काचा प्रश्न पार्लमेंटनें सोंपवतांच एकामागून एक सर्व कौन्सिलांनीं स्त्रियांना भराभर मतदानाचा हक्क देऊन टाकला, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. मद्रासनें या बाबतींत इतर गोष्टींप्रमाणेंच आघाडी मारून १९२१ मध्यें मोठ्या बहुमतानें स्त्रियांना मतदानाचा हक्क दिला. मुंबईत त्याच साली व संयुक्त प्रांतानें १९२३ त एकमतानें स्त्रियांना मतें देण्याचा ठराव पास केला. १९२५ त बंगाल, १९२६ त पजाब व १९२७ त मध्यप्रांतामध्यें स्त्रियांना हा हक्क मिळाला. आसामनें तर आणखी एक पाऊल पुढे टाकून कौन्सिलसाठीं निवडणुकीस उभें राहण्याचाही हक्क स्त्रियांस दिला. सर्व प्रांतांचा कल व मत याप्रमाणे अजमावल्यावर मध्यवर्ति कायदेमंडळानेही ज्या ज्या प्रांतांत प्रांतीय कौन्सिलांसाठीं स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळाला होता त्या त्या प्रांतांत मध्यवर्ति कौन्सिलांसाठीही मत देण्याचा हक्क त्यांना दिला. नंतर कौन्सिल ऑफ् स्टेटनेंही मतदानाचा हक्क व निवडणुकीसाठीं उभे राहण्याचा हक्क स्त्रियांस दिला. मुडिमन कमिटीनें सर्वच प्रांतीय कौन्सिलांना व लेजिस्लेटिव्ह असेंब्लीला स्त्रियांना कौन्सिलांत प्रवेश असावा किंवा नाहीं याबद्दल कायदे करण्याची व्यक्तिशः परवानगी द्यावी अशी शिफारस केली, व १९२१ त ती अंमलांत आणली गेली. ताबडतोब मद्रास, मुंबई व पंजाबनें स्त्रियांना कौन्सिलमध्ये प्रतिनिधि म्हणून बसण्याची मोकळीक दिली. बाकीच्या प्रांतांनींही या तीन प्रांतांचा धडा गिरवला.

याप्रमाणें मताधिकार ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्त्रियांना मोठ्या मुष्किलीनें पुष्कळ चळवळ केल्यानंतर मिळाला; पण पाश्चात्य देशांमध्यें, विशेषतः

इंग्लंडमध्यें, या 'सफरेज'साठीं स्त्रियांना जी अचाट धडपड करावी लागली, जे हाल सोसावे लागले, जो आत्मयज्ञ करावा लागला, त्या मानानें हिंदी स्त्रियांना हा हक्क अगदीं हंसत खेळत मिळाला असें म्हटलें तरी चालेल. इंग्लिश स्त्रियांनीं केलेल्या आत्मयज्ञाचें गोड फळ हिंदी स्त्रियांच्या ओठांवर आयतेंच येऊन पडलें. इंग्लंडमधील 'सफरेजेट्स्'च्या चळवळीचा इतिहास मोठा मनोरंजक व हृदयंगम आहे. त्यांची प्रमुख पुढारी मिसेस् पॅंखर्स्ट हिनें या चळवळीच्या इतिहासाचें एक सुंदर पुस्तक लिहिले आहे. त्या चळवळीचें आपण येथें थोडक्यांत दिग्दर्शन करूं.

पाश्चात्य देशांमध्यें स्त्रियांना समान मताधिकार देण्याची कल्पना खरें पाहिलें असतां फार जुनी आहे. पहिला राज्यशास्त्रज्ञ प्लेटो आपल्या रिपब्लिकमध्ये स्त्रियांना नागरिकत्वाचे हक्क व दिवाणी आणि लढाऊ खात्यांत कामें करण्याची मोकळीक पुरुषांच्या बरोबरीनें द्यावी असे म्हणतो. त्याचें म्हणणें असें की, स्त्रिया या कांही बाबतीत जरी अबला असल्या तरी बलाचा हा फरक फक्त प्रमाणांत आहे, मूळ गुणाच्या स्वरूपांत नाही. तेव्हां स्त्रियांना राष्ट्राचे पालक (गार्डियन्) नेमण्यास मुळींच हरकत नाहीं. हे अर्थात् एका ध्येयवाद्याचें नुसतें एक गोड स्वप्न होते. प्रत्यक्ष व्यवहारांत कांहीं स्त्रियांना कुठल्याच देशांत समान राजकीय हक्क दिले जात नव्हते. स्त्रियांना राज्यपदाचा हक्क असे, पण इतर कोठल्याही नात्यानें राज्यकारभाराशी सबंध ठेवण्यास त्या अपात्र समजल्या जात; ही कल्पना एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत चालू होती. फ्रान्समधल्या राज्यक्रांतीमध्यें स्वातंत्र्याच्या अनेक मूलतत्त्वांचा प्रथम उच्चार झाला व तेव्हांपासून समान हक्कांची—स्त्रियांना सुद्धां राज्यतत्रांत मत असावें—ही कल्पना व्यवहारांत हळुहळू संचारूं लागली. तरी पण हें तत्त्व पूर्णपणें गळीं उतरण्याला व व्यवहारांत अंमलांत आणावयाला सर्वच राष्ट्रांमध्यें खूप अवधि लागला. इंग्लंडमध्यें मेरी वुल्स्टनक्रॅफ्ट ही स्त्रीस्वातंत्र्याची घोषणा धीटपणें करणारी पहिली बाई होय. हिनें १७९२ मध्यें आपलें '*A Vindication of The Rights of Women*' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. पण तिचा प्रयत्न एकाकी पडला, व लोकविलक्षण मतांबद्दल तिची टर करण्यांत येऊं लागली. तिच्या चारित्र्याबद्दल लोकांचें मत चांगलें नव्हतें, त्यामुळें तिचीं मतें प्रभावीं ठरलीं नाहींत. नंतर १८६७ मध्यें जॉन स्टुअर्ट मिल् यानें आपलें

'स्त्रियांची परवशता' (*The Subjection of Women*) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकांतील कित्येक मतें जुनी झालीं आहेत; तरी पण अजूनही हा ग्रंथ स्त्रीस्वातंत्र्यविषयक तत्त्वज्ञानाचा प्रमाण ग्रंथ मानला जातो.

पण इंग्लंडमध्ये लोकशाहीच्या पुरस्कर्त्या अशा प्रमुख राष्ट्रांपैकीं तें असूनही अजून पुरुषांना तरी मताधिकाराचे समान हक्क कुठें मिळाले होते ? १८३२ च्या रिफॉर्म ॲक्टाअन्वयें फक्त मध्यम स्थितींतील लोकांना मत मिळालें. १८८४ मध्यें मजूर वर्गाला मतें मिळालीं; तरी स्त्रिया अजून कोरड्याच राहिल्या होत्या. हळुहळू स्त्रियांमध्यें जागृति होऊन प्रथम समान हक्क मिळविण्यासाठी सनदशीर चळवळ सुरू झाली. स्त्रियांनीं आपले निरनिराळे संघ करून लोकजागृति करण्यास व पार्लमेंटकडे अर्जावर अर्ज पाठण्यास सुरुवात केली. जॉन स्टुअर्ट् मिल्सारखे खंदे वीर त्यांच्या वतीने पार्लमेंटमध्ये भांडण्यास त्यांनी तयार केले. १८६९ मध्ये म्युनिसिपल कारभारांत स्त्रियांना मत मिळाले. व एज्युकेशनल बोर्डावर त्या निवडून येऊं लागल्या. पण सार्वत्रिक मताधिकार देण्याची राष्ट्राची अजून तयारी नव्हती. १८७० मध्यें जेकब ब्राइटने पार्लमेंटरी मताधिकार स्त्रियांना देण्याबद्दल एक बिल पार्लमेंटपुढें आणलें; पण तिसऱ्या वाचनापलीकडे त्याची मजल गेली नाहीं. या विरोधामुळे स्त्रियांच्या चळवळीला उत्तरोत्तर जास्त तीव्र व दंगेखोरपणाचें स्वरूप येऊं लागलें. ग्लॅडस्टनसारखा विचारी व उदारमतवादी म्हणवणारा मुत्सद्दीसुद्धां आपल्या मार्गांत वरचेवर अडथळे उत्पन्न करतो हें पाहून स्त्रिया फारच चवताळल्या. १८९७ त देशामध्ये इतस्ततः विखुरलेल्या साऱ्या सफरेजेट संघांचे नॅशनल युनियन ऑफ् सफरेजिट्स्मध्यें एकीकरण झालें, व मिस् पॅंखर्स्टसारख्या कर्तबगार व चिकाटीच्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं ही चळवळ बंडखोरीच्या स्वरूपांत सुरू झाली. सभा बंद पाडणें, मोठमोठ्या सार्वजनिक इमारतींचीं तावदाने फोडणें, सभाबंदीचे व भाषणबंदीचे हुकूम तोडणें, व कायदेभंगाबद्दल तुरुंगांत जाणें, दंड न भरणे, तुरुंगांतही कायदेभंग चालू ठेवणें, अन्नत्याग करणें, वगैरे दंडेलीच्या प्रकारांनीं, बंडखोर, पुरुषी सफरेजेटस्विषयीं कांहीं लोकांचें मत तर विटलें व राज्यकर्त्यांचा प्रतिकार वाढत गेला. १९११ मध्यें मुख्य प्रधान ॲस्क्विथसाहेब यांनीं स्त्रियांच्या मागणीला साफ नकार दिला व लढाई सुरू होईपर्यंत चळ-

वळीला वरचेवर सारखें भरतें येत गेलें; त्या वेळेस तुरुंगांत अन्नत्याग करून हाल सोसणाऱ्या चळवळ्या स्त्रियांची हकीकत वाचून अंगावर कांटा उभा राहतो. जबरीनें अन्न घालण्याचा प्रयत्न केल्यामुळे कित्येक स्त्रियांना प्राणघातक अपाय झाले. राज्यकर्त्यांच्या या क्रौर्यामुळें सर्वसाधारण जनतेची सहानुभूति थोडथोडी मतवाल्या बायकांकडे वळूं लागली. इतक्यांत १९१४ त घनघोर युद्ध सुरू झाले, व साऱ्या यूरोप खंडांत अशांततेचा वणवा पसरला. या वेळीं सफरेजेट् स्त्रियांनी आपले कर्तव्य ओळखलें. आपला पुरुषवर्गाशीं चालू असलेला घरगुती लढा तात्पुरता तहकूब करून, राष्ट्राच्या या सार्वत्रिक संकटाच्या वेळीं त्यांनीं राष्ट्राच्या हांकेला ओ दिली व मताधिकाराच्या झगड्यासाठीं आयतेंच एकवटलेलें आपलें संघटित मत राष्ट्रकार्यासाठी त्यांनी कामी लावलें; व पुरुषांप्रमाणेच—त्यांच्याइतक्या कौशल्याने स्त्रिया पुरुषांचे सारे धंदे व सारीं कामें उरकूं शकतात, हे साऱ्या जगापुढे सिद्ध करून आपला समान हक्क, समान जबाबदाऱ्या उचलून त्यांनी युक्तीने प्रस्थापित केला. स्त्रियांच्या नवीन १,४०० संस्था निघाल्या व पडेल ते काम त्या उत्साहानें उरकूं लागल्या. ४०,००० स्त्रियांनी Emergency Crops ( आणीबाणीच्या वेळेसाठीं राखून ठेवलेलें बल ) मध्यें नांवें नोंदविलीं. १९१७ च्या आरंभी स्त्रियांचे Land Army निघालें व शेतकीखात्याची स्त्रीशाखा निघाली. लढाईवर गेलेल्या साऱ्या पुरुषांच्या जागा, पोलिस बनून, ट्रामगाड्या व रेल्वे चालवून व राज्यशकट हांकून स्त्रियांनी बिनबोभाट भरून काढल्या.

या साऱ्या कामगिरीचें राष्ट्रानेही चीज केले. १९१८ च्या आरंभी घरवाल्या व घरवाल्यांच्या बायका याना मताधिकार देण्यांत आला. मात्र त्या तीस किंवा जास्त वयाच्या असल्या पाहिजेत. नंतर त्यांना पार्लमेंटमधील हाऊस ऑफ् कॉमन्ससाठीं उभे राहण्याचा हक्क देण्यांत आला. लायकीच्या अटी पुरुषांप्रमाणेंच होत्या. परंतु या तोटक्या हक्कानें अर्थातच सफरेजेटांच्या संस्थांचे समाधान होण्याजोगें नव्हतें. पुरुषांच्या बरोबरीनें मतदानाचे हक्क मिळेपर्यंत स्त्रियांना १९२८ पर्यंत वाट पाहावी लागली. १९१९ मध्यें ( Sex Disqualification Removal Act ) लैंगिक भेद काढून टाकण्याबद्दल कायद्याप्रमाणे कोणताही धंदा, व्यवसाय किंवा नोकरी करायला स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें मोकळीक मिळाली होतीच. लीग ऑफ् नेशन्सनेंही

आरंभींच सेक्रटरीएटसकट सर्व शाखांतील जागा लायकीप्रमाणें स्त्रिया व पुरुष यांना सारख्याच उघड्या राहतील, अशी घोषणा केली होती; त्याहीपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्त्रीपुरुषांना सारख्या प्रमाणांत कामाप्रमाणें वेतन दिलें जावें हे तत्त्व मान्य केले होते. नुसत्या राजकीय समान हक्कांच्या कागदी घोड्यापेक्षां हें आर्थिक समान हक्काचें तत्त्वच स्त्रियांच्या अंतिम उन्नतीला व उद्धाराला केव्हांही कारण होते.

स्त्रियांना नागरिकत्वाचे समान हक्क असण्याबद्दलची ही चळवळ केवळ इंग्लंडांतच झाली असे नाहीं; इतर पाश्चात्य देशांतही स्त्रियांची चळवळ चालू होतीच. पण इंग्लंडचा हिंदुस्थानशीं निकट संबध असल्यामुळें इंग्लंड-मधील चळवळ हिंदवासीयांच्या डोळ्यांत जास्त भरली. शिवाय इंग्लड-मधल्या स्त्रियांना जास्त बडखोरीचें धोरण स्वीकारावे लागल्यामुळें त्यांचा बोलबाला सगळीकडे लौकर झाला; पण अमेरिकेमध्यें तर १८४८ मध्येंच 'Women's Rights Convention' या नांवाची संस्था स्थापन होऊन तिच्या धुरीणखाखालीं मतदानाच्या समान हक्कासाठीं स्त्रियांची चळवळ सुरू झाली होती. १८६९ मध्ये न्यू यॉर्कमध्ये नॅशनल वुइमेन्स सफरेज असोसिएशन म्हणून आणखी एक संस्था निघाली, व तिनेही या चळवळीला आणखी चालना दिली. युनायटेड स्टेट्स् ऑफ् अमेरिकामध्यें निरनिराळ्या संस्थानांनीं वेळोवेळीं स्त्रियांना मताधिकार दिला व सार्वत्रिक मतदानाचा हक्क स्त्रियांना १९२० मध्ये मिळाला. स्त्रीपुरुष हा भेद नाहीसा होऊन नागरिकत्वाचे समान हक्क सर्वांना खुले झाले. १९२८ नंतर बहुतेक सर्व युरोपियन राष्ट्रांनी स्त्रियांना मतदानाचा हक्क दिला. फ्रान्स, इटली व स्पेननें फक्त अजून दिला नाहीं व जर्मनीनें एकदां दिलेला काढून घेतला आहे! जर्मनीच्या या प्रतिगामी धोरणाचा निषेध सर्व विचारवंत युरोपीय स्त्रिया करीत आहेत.

आशिया खंडांतही युरोपांतल्या या सार्वत्रिक चळवळीचे पडसाद उमटल्याशिवाय राहिले नाहींत. ब्रह्मदेशांत एकंदर पौर्वात्य राष्ट्रांच्या मानानें स्त्रियांची सुधारणा बरीच पोंचली आहे असे म्हटलें पाहिजे. उच्च शिक्षण व सार्वत्रिक शिक्षण यांचा प्रसार त्यांच्यांत फार मोठ्या प्रमाणांत आहे. जातिभेद, पडदा, बालविवाह वगैरे अनिष्ट रूढींनीं त्यांचे पाय

जखडले नाहींत. ब्रह्मदेशांतील लेजिस्लेटिव्ह कौन्सिलनें पार्लमेंटकडे एक-मुखानें स्त्रियांना मताधिकार देण्याबद्दल मागणी केली होती.

मागसलेल्या म्हणून समजल्या गेलेल्या चीनांतही स्त्रिया आतां जागृत झाल्या आहेत. १९२१ सालीं एक हजार बंडखोर स्त्रीस्वातंत्र्यवादिनींनीं कंतान-मध्यें सभा भरवून मताधिकाराच्या चळवळीची रूपरेखा आंखली; व तेव्हांपासून ही चळवळ विरोधाला व जुमानतां त्या देशांत युद्धकालापर्यंत सारखी चालू होती. युद्धामध्यें इंग्लिश स्त्रियांप्रमाणेंच महत्त्वाची कामगिरी बजावून चिनी स्त्रियांनीं आपली योग्यता जगाला पटवून दिली.

जपाननें इतर गोष्टींप्रमाणेच स्त्रीसुधारणेच्या गोष्टींतही पाश्चात्यांचें वळण धीटपणें गिरवून आघाडी मारली आहे. तेथें शेकडा नव्वद स्त्रिया साक्षर असून ट्रॅम चालवणें, टाइपिंग, डिटेक्टिव्ह, क्लार्क, टीचर, पब्लिक इंटरटेनर वगैरे सारखे धंदे स्त्रिया करूं लागल्या आहेत. स्त्रियांची इतकी प्रगति असूनही स्त्रियांना राजकीय हक्क मात्र १९२१ पर्यंत मिळाले नव्हते. त्या सालीं पदवीधर स्त्रियांनीं पुष्कळ चळवळ करून एक प्रचंड अर्ज Diet पुढें नेला व त्याप्रमाणें स्त्रियांना राजकीय समान हक्क देण्याबद्दलचें एक बिल खालच्या प्रातिनिधिक सभेमध्यें आलें व प्रचंड बहुमतानें पासही झालें; परंतु बड्या लोकांच्या सभागृहामध्ये शेवटीं तट्टू अडलेंच. स्त्रियांना राजकीय क्षेत्रांत समान हक्क मिळाल्यास त्या सुगृहिणी व सुमाता होणार नाहींत, ही ठराविक सबब तेथें पुढें आणण्यांत आली. जपानी स्त्रियांनीं आपली चळवळ जोरानें चालू ठेवली आहे व हळुहळू त्यांना एक एक राजकीय हक्क मिळूं लागले आहेत.

याप्रमाणें मतदानाच्या हक्काच्या चळवळीचा पूर्व व पश्चिम राष्ट्रांतील इतिहास थोडक्यांत आहे. मताधिकार आतां बहुतेक राष्ट्रांत स्त्रियांना मिळाला आहे; पण मताधिकार मिळाल्याबरोबर पूर्ण लढाई जिंकली असे मात्र स्त्रियांना वाटतां कामा नये. हक्काबरोबर जबाबदारी व कर्तव्ये आलींच. हिंदी स्त्रियांना मताधिकार मिळाला ( तो काय स्वरूपाचा आहे हें पुढें येईलच ). त्याच्या-बरोबर नागरिकत्वाची आलेली जबाबदारीही हिंदी स्त्रियांनीं ओळखली पाहिजे. मत हें फक्त एक साधन आहे. साधनप्राप्तीवर जोर देऊन साध्य डोळ्यांआड करण्याची चूक स्त्रियांनीं होऊं देऊं नये. मत मिळाल्यानंतर प्रथम

तें योग्य रीतीनें वापरलें जाण्यासाठीं, शिक्षणाचा व ज्ञानाचा प्रसार हिंदी स्त्रियांत सगळीकडे खेडोपाडीं सुद्धां झाला पाहिजे. राष्ट्रीय मंत्रिमंडळें, राष्ट्रांतील पुढारलेल्या स्त्रिया व त्यांच्या प्रातिनिधिक सस्था यांच्यावर ही मोठी जबाबदारी आहे. मत कसें वापरावे हें कळूं लागल्यावरच त्याचा फायदा हिंदी स्त्रियांना इंग्लिश स्त्रियांप्रमाणें करून घेतां येईल. पुरुषांच्या हातांत सर्व राज्ययंत्र असल्यामुळें इतके दिवस फक्त एकतर्फी, केवळ पुरुषांना उपकारक असे कायदे केले गेले व स्त्रियांवर कळत वा न कळत अनेक बाबतीत अन्याय झाला. स्त्रियांना राज्ययत्रावर नियंत्रण घालण्याची शक्ति मतद्वारां प्राप्त झाली म्हणजे त्यांना जुन्या रूढि, जुने कायदे बदलून स्वहितकारक असे न्यायी नवे कायदे करून घेतां येतील. इंग्लंडांत स्त्रियांना मते मिळाल्यापासून किती तरी नवे कायदे व नवनव्या स्त्रीहितरक्षक चळवळी निर्माण झाल्या. संततिवयाची मर्यादा तेराची सोळा करण्यांत आली ( १९२२ ). अनौरस संततीच्या उदरनिर्वाहासाठी पित्यानें देण्याच्या द्रव्याचे प्रमाण वाढलें ( १९२३ ). मादक द्रव्याबाबत नवीन कायदा होऊन अठरा वर्षांखालील मुलांना दारू विकण्यास बदी करण्यांत आली ( १९२३ ). विधवांना व वृद्धांना, मृतांच्या मुलांसाठीं पेन्शनाच्या रूपानें मिळणारी रक्कम वाढली ( १९२५ ). सुईणींची नांवें रजिस्टर करण्याबद्दल सक्ति करण्यांत आली ( १९२६ ). मूल जन्मण्याच्या वेळीं अविवाहित असली तरी, नंतर तिने मुलाच्या पित्याशी विवाह केल्यास, मूल औरस ठरावें, असा कायदा झाला ( १९२६ ). १९३२–३३ मध्यें मजुरांच्या मुलांच्या हिताबद्दल अनेक कायदे पास झाले. शिवाय Save the Mothers, Campaign, Infant Welfare Movement, National Association for the Prevention of Infant Mortality, Nursery School Movement, Birth Control Movement, School Feeding Movement वगैरे सारख्या चळवळी स्त्रियांनीं सुरू केल्या व आपल्याला हव्या तशा सुधारणा त्या बाबतींत करून घेतल्या. हिंदी स्त्रियांच्या गरजा तर वरील गोष्टीहून निकडीच्या व असंख्य आहेत. स्त्रियांना राज्यकारभारांत मत असल्यावांचून त्या पुऱ्या होणें शक्य नाहीं.

अर्थात् मत हें साधन मानलें तरी, ते निर्दोष असल्याशिवाय साध्य प्राप्त होणें शक्य नाहीं. नवीन सुधारणेप्रमाणें स्त्रियांना काय स्वरूपाचा

मताधिकार मिळाला आहे हें पाहूं. *Our Cause* मध्यें या हक्काचें सुंदर विवरण राजकुमारी अमृतकुंवर यांनी केले आहे.

आपण मागें पाहिलेंच कीं, जेव्हां हिंदुस्थानांतील प्रतिनिधींना राउंड टेबल कॉन्फरन्सला बोलावण्याचें ठरवले गेले, तेव्हां हिंदी स्त्रियांनीं आपल्या पसंतीचे आपले स्त्रीप्रतिनिधि पाठवण्याबद्दल परवानगी मागितली. निवडणुकीचा प्रश्न बाजूलाच राहिला; पण सरकारनें दोन स्त्रीप्रतिनिधींचीं नांवें प्रतिनिधींच्या यादीत घातलीं (१९३०). १९३१ च्या आरंभीं स्त्रियांचें एक प्रातिनिधिक स्वरूपाचे संमेलन श्रीमती सरोजिनी नायडूंच्या अध्यक्षतेखालीं मुंबईस भरलें, व तेथे सर्व उपशाखांच्या संमतीनें स्त्रियांच्या मताधिकाराबद्दल एक पत्रक तयार करण्यांत आलें. स्त्रियांच्या तीन प्रमुख सस्थांच्या [(1) All-India Women's Conference, (2) The Women's Indian Association; and (3) The National Council of Women in India] मान्यतेचे शिक्कामोर्तब या मेमोरॅडमवर झाल्यावर तो सरकारकडे पाठवण्यांत आला. त्यांत पुढील कलमांचा प्रामुख्यानें समावेश करण्यांत आला होता: (१) स्त्रीपुरुष हा लिंगभेद सर्वच हक्कांच्या बाबतींत दूर करणे; (२) सर्व सज्ञान स्त्रीपुरुषांना इतर कुठलीही अट न घालतां मताधिकार देणें (Adult Suffrage); (३) कायदेकारी व कार्यकारी संस्थांतून (Legislative, Executive व Administrative) स्त्रियांना प्रवेश मिळवण्यासाठीं स्पेशल सवलती साफ नाकारणे (स्वतंत्र मतदारसंघ, राखीव जागा वगैरेसारख्या सवलती).

या मेमोरँडममागें स्त्रियांना भावी राज्यघटनेंत नागरिकत्वाचे समान हक्क मिळतील असें कॉंग्रेसनें दिलेलें आश्वासन होतेच. इंग्लंडमध्यें जागतिक युद्धांत ज्याप्रमाणें इंग्लिश स्त्रियांनीं मोठमोठीं जोखमीचीं व कष्टाचीं कामें पुरुषांच्या बरोबरीने करून आपली समान हक्क मिळवण्याची लायकी प्रस्थापित केली होती, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही असहकारितेची चळवळ, मिठाचा कर तोडण्याची चळवळ, सभाबंदीची चळवळ वगैरेमध्यें धडाडीनें भाग घेऊन, हिंदी स्त्रियांनीं आपलें सामर्थ्य कॉंग्रेसला व जनतेला पटवून दिलें होतें.

श्रीमती सरोजिनी नायडू व बेगम शहानवाझ या स्त्रिया गोलमेज परि-

षदेला गेल्या. श्रीमती नायडूंना आपलें म्हणणें परिषदेपुढें मांडण्याचा हक्क सर्व हिंदी स्त्रियांच्या संस्थांनीं एकमुखानें दिला होता. पण गोलमेज परिषदेपुढें हे मतांचे व कौन्सिलाच्या सदस्यत्वाचे प्रश्न आलेच नाहींत. या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं लोथियन कमिटी नेमली गेली व १९३२–३३ सालीं ही कमिटी हिंदुस्थानांत माहिती गोळा करण्यासाठीं आली. पुन्हां या कमिटीपुढें स्त्रियांच्या सर्व संस्थांनीं मिळून आपलें म्हणणे सादर केले. वर उल्लेखिलेल्या मागण्यांप्रमाणेच याही मागण्या बव्हंशीं होत्या. Indian Statutory कमिशनच्या शिफारशींप्रमाणे स्त्रियांना मतदानाचा हक्क नवऱ्याच्या मालमत्तेच्या मापानें व साक्षरत्वावर देण्यांत येईल अशी सर्वांची कल्पना होती. यांपैकी पहिल्या कलमाला सर्व हिंदी स्त्रियांचा स्पष्ट विरोध होता. स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें स्वतंत्र समान हक्कांसाठी झगडत असतां, पुरुषांच्या मालमत्तेवर त्यांचा हक्क अवलंबून ठेवणें म्हणजे स्त्रियांची परावलंबित्वाची बेडी जास्त घट्ट करून त्यांच्या स्वातंत्र्याची गळचेपी करणे होय, असा हिंदी स्त्रियांचा कोटिक्रम होता व तो वाजवी होता. हिंदी स्त्रियांना हक्क त्यांच्या व्यक्तित्वावर, त्यांच्या स्वतंत्र लायकीवर हवे होते; पुरुषांच्या मोठेपणावर, पुरुषांच्या मध्यस्थीनें नको होते. पुरुषांच्या नांवावर विकून मिळालेले हक्क, हक्क या नांवाला लायकच नव्हत. दुसरे म्हणजे मालमत्तेच्या मापानें मतदान हक्काबद्दलची लायकी ठरवणें हेच तत्त्व मुळीं स्त्रियांना पसत नव्हते. लोकशाहीचें ध्येय पुढे ठेवल्यावर, मालमत्तेच्या कमजास्त प्रमाणावर, लोकांना राज्ययत्रांत भाग घेण्यास किंवा मत देण्यास मज्जाव करणे हें विसंगत नाहीं काय ? हिंदुस्थानसारख्या दरिद्री देशांत तर हा धडधडीत अन्याय व भांडवलशाहीची अरेरावी वाढवण्याचे साधन आहे. जेथे दोन वेळ पोटभर अन्न मिळण्याची भ्रांत अशा लोकांचीच संख्या अतोनात आहे, तेथे मालमत्तेच्या गोष्टी कशाला ? साक्षरतेच्या अटीलाही हिंदी स्त्रिया मान्यता देण्यास कबूल नव्हत्या. एक तर साक्षरता कशाला म्हणावें हें ठरवणें व ती खरोखरी मतदाराच्या अंगीं आहे किंवा नाहीं हें तपासणें फार कठिण काम आहे; व दुसरें म्हणजे साक्षरता म्हणजेच खरे शिक्षण किंवा सुसंस्कृतत्व असें थोडेंच आहे ? उलट पक्षीं नुसतें साक्षर असलें म्हणजे योग्य व न्याय्य बाजूला मत देण्याची लायकी हमखास येतेच असें तरी म्हणतां येईल काय ? मग साक्षरतेची

अट ठेवण्यांत काय वैशिष्टय साधलें ? म्हणून हिंदी स्त्रियांनीं सरसकट सर्व सज्ञानांना मतदान हक्काची (Adult Suffrage) मागणी केली. प्रत्येक प्रौढ स्त्रीपुरुषाला मताचा हक्क देणें म्हणजे खऱ्याखुऱ्या लोकशाहीचा योग्य पाया घालणें होय. याच वेळीं, आपल्याला जातिवार स्वतंत्र मतदार संघ, राखीव जागा सरकारकडून वर्णी लागणें (Nomination) वगैरेसारख्या खास सवलती नको असल्याचें पुन्हां एकवार निक्षून हिंदी स्त्रियांनीं सांगितलें. संयुक्त मतदार संघातर्फे खुल्या निवडणुकींत आपल्या व्यक्तिशः लायकीवर कायदेमंडळांतून निवडून येण्याची हिंदी स्त्रियांना महत्त्वाकांक्षा होती व तशीच संधि मिळणें हें आपल्या अंतिम हिताच्या दृष्टीनें त्यांना जास्त फायदेशीर वाटत होतें.

१९३२ मध्यें लोथियन कमिटीचा रिपोर्ट बाहेर पडला व हिंदी स्त्रियांची तीव्र निराशा झाली. एकमुखाने पुढे मांडलेल्या हिंदी स्त्रियांच्या मागण्या रिपोर्टांत बेलाशक फेटाळून लावल्या होत्या. सज्ञान प्रौढांना मत देण्याच्या कलमाला अजिबात बगल दिली गेली होती. प्रांतांप्रांतांतून स्त्रीपुरुषांच्या मतदानपात्रतेबद्दल निरनिराळे नियम सुचवले होते. पत्नीत्वावर, पतीच्या मालमत्तेवर मताधिकार मिळण्याचे स्त्रियांना मनापासून नको असलेलें तत्त्व कायमच ठेवण्यांत आलें होतें. जातवार मतदार संघ, अल्पसंख्याकांना राखीव जागा, वगैरे स्त्रियांनीं निषेधिलेल्या गोष्टी त्यांच्यावर लादण्याची शिफारस केली होती. Communal Award ला बाकी सर्व हिंदी राष्ट्राप्रमाणें हिंदी स्त्रियांनीही जोराचा विरोध केला. All-India Women's Conference नें एक वक्तव्य (Statement) प्रसिद्ध करून लोथियन कमिटीच्या सर्वच शिफारशींचा निषेध केला. पुढें White Paper मध्येंही स्त्रियांच्या मागण्यांचा विचार करण्यांत आला नाहीं. तेव्हां १९३३ मध्यें वर उल्लेखिलेल्या स्त्रियांच्या प्रमुख तीन संस्थांनीं तडजोडीच्या स्वरूपाचा दुसरा एक मेमोरँडम प्रसिद्ध केला, व तो जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढें पाठवला. त्यामध्यें खालील गोष्टींचा समावेश केला होता :—

(१) कोठलीही नोकरी, धंदा, व्यवसाय, पदवी, मानमरातब वगैरे देण्याच्या बाबतींत स्त्रीपुरुष हा भेद मानला जाणार नाहीं असें एकदां स्पष्ट जाहीर करावें. (२) प्रत्येक प्रौढ, सज्ञान स्त्रीपुरुषाला मत देणें हें अंतिम ध्येय

सध्यां अव्यवहार्य वाटत असल्यास, पुढील अटी तात्पुरत्या मान्य करून अंमलांत आणणें. (अ) साक्षरता या अटीनें १,२५५,००० स्त्रियांना मतें मिळतील. उच्च प्राथमिक शिक्षणाची अट ठेवल्यास (Upper Primary Standard) अवघ्या ५००,००० च स्त्रियांना मते मिळतील. (ब) प्रांतिक व फेडरल विधिमडळांसाठी पुरुषांना ज्या मालमत्ताविषयक अटी आहेत त्याच स्त्रियांना स्वतत्रपणे लावणें. या अटीने २,०००,००० स्त्रियांना मते मिळतील. (क) खेडोपाडीं नाहीं तरी प्रमुख शहरांतून (Adult Suffrage) प्रौढांस मतदानाचा हक्क अंमलांत आणण्यास हरकत नाहीं. या अटीने ४५ लाख स्त्रियांना मते मिळतील. (३) मध्यवर्ति विधिमंडळांत अप्रत्यक्ष निवडणूक न होतां प्रत्यक्ष व्हावी. (४) जातवार, राखीव जागा नसाव्या. (५) मतदारसघ संयुक्त स्वरूपांतच सर्वत्र असावे. (६) प्रत्यक्ष निवडणूक सर्वत्र असावी. परंतु पहिल्या मेमोरँडमप्रमाणे हे दुसरेही फुकट गेले. ब्रिटिश सरकारनें स्त्रिया व सर्वच हिंदी लोकांच्या तोडाला पाने पुसून शेवटी आपलाच हट्ट चालवला. याप्रमाणें हिंदी स्त्रियांची मतदानहक्काच्या बाबतीत सध्यां काय स्थिति आहे हे पाहू. प्रथम (१) दिवाणी खात्यांतली कुठलीही जागा किंवा मान केवळ लिंगभेदामुळे स्त्रियांना अमान्य ठरणार नाही असे अभिवचन देण्यांत आलें. (२) जुन्या जमान्यांत ७० लाख मतदार एकंदरीनें होते. त्यांत एक स्त्री तर वीस पुरुष असे प्रमाण होते. नवीन कायद्याअन्वयें स्त्रियांच्या पात्रतेच्या अटी जास्त व्यापक केल्या गेल्यामुळे हे प्रमाण एका स्त्रीस पांच पुरुष मतदार असे होईल. नव्या मनूने एकंदर ३५० लाख लोकाना मत मिळाले; त्यांपैकी स्त्रिया ६० लाख आहेत. सबध लोकसंख्येत शेकडा चौदा लोकांना मत आहे व प्रौढ लोकसंख्येपैकीं शेकडा २७ लोकांना मताचा हक्क आतां मिळाला आहे. शेकडा ४३ प्रौढ पुरुषांना मते आहेत, पण शेकडा फक्त ८·९ च प्रौढ स्त्रियांना मते आहेत. या स्त्रियांपैकीं २०लाख स्त्रियांना मालमत्तेच्या कसोटीवर, ४० लाख स्त्रियांना पतीच्या मालमत्तेवर व ३ लाख स्त्रियांना शैक्षणिक पात्रतेवर मते मिळालीं आहेत असे सर्वसाधारणपणें म्हणण्यास हरकत नाहीं. एकवीस वर्षांच्या किंवा त्याहून जास्त वयाच्या स्त्रियांना खालील कसोटींवर मतें मिळालीं आहेत.

(१) पुरुषांना मालमत्ताविषयक आणि कर भरण्याविषयक ज्या अटी

आहेत त्याच अटींवर स्वतंत्रपणें स्त्रियांना मत मिळतें. या अटी प्रांतवार भिन्न भिन्न आहेत. ( २ ) ज्या स्त्रियांना कुठलीही एकादी हिंदी भाषा ( जी देशाच्या कोठल्याही एका भागांत प्रचलित आहे ) लिहितां व वाचतां येते त्यांना. ( ३ ) जरूर त्या मालमत्ताविषयक कसोटीस उतरत असल्यामुळें, ज्या पुरुषांना मत मिळालें आहे अशांच्या बायका व असे पुरुष मतदार मृत झाल्यास त्यांच्या विधवा. ( ४ ) जरूर तेवढा प्राप्तीवरील कर आदल्या वर्षी ज्यांचा भरून झाला आहे अशा पुरुषांच्या स्त्रिया किंवा विधवा. ( ५ ) सैन्यांतील ऑफिसरांच्या किंवा सैनिकांच्या पत्नी किंवा मृत सैनिक वा ऑफिसरांच्या पेन्शन उपभोगीत असलेल्या विधवा स्त्रिया किंवा माता. ( ६ ) वर उल्लेखिलेल्या सेनानिवृत्त सैनिकांच्या व ऑफिसरांच्या बायका किंवा विधवा.

स्त्रियांना व्यक्तिशः मालमत्तेमुळें किंवा प्राप्तीवरील कर भरीत असल्यामुळें मतदानाचा हक्क प्राप्त होत असला तर त्यांचीं नांवें मतदारांच्या यादींत सरकारच दाखल करतें; पण इतर कलमांखाली मतदानाचा हक्क प्राप्त व्हावयाचा असल्यास तो मिळवण्यासाठीं प्रत्येक उमेदवार स्त्रीनें आपलें नांव मतदारांच्या यादीत दाखल करण्याबद्दल सरकारकडे अर्ज केला पाहिजे. हे नियमही प्रत्येक प्रांतांत निरनिराळे आहेत. या अटीविरुद्ध हिंदी स्त्रियांनीं खूप चळवळ केली; व ती शेवटीं निघत नाहीसें पाहून ठिकठिकाणी स्त्रियांच्या संस्थांनीं असल्या अर्जांच्या प्रती अनेक स्त्रियांना पुरवून, त्या त्यांच्याकडून भरवून घेऊन, त्या घरोघर हिंडून गोळा करून सरकारकडे पाठवण्याची व्यवस्था केली.

जातवार तत्त्वाप्रमाणे प्रांतिक व फेडरल कौन्सिलांतून स्त्रियांसाठी राखीव जागा आहेत. प्रांतिक कौन्सिलांसाठीं निवडणुकी जातवार मतदारसंघांतून व्हावयाच्या. हे मतदारसंघ सार्वसाधारणपणे स्त्रीपुरुषमिश्रित असणार; पण जेथें बंगाल-बिहारसारख्या प्रांतांत मुसलमान स्त्रियांसाठीं राखीव जागा आहेत तेथें फक्त स्त्रियांचे असे जातवार मतदारसंघ आहेत. कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें मद्रास, मुंबई, बंगाल, संयुक्त प्रांत, पंजाब व बिहार या प्रांतांतर्फे एक जागा प्रत्येकीं स्त्रियांसाठीं आहे. ही निवडणूक प्रांतिक कौन्सिलांच्या सभासदांकडून व्हावयाची. या सभागृहासाठीं मत देण्याचा हक्क स्त्रियांना पुरुषांच्या पात्रतेच्या अटींवरच आहे. या अटी जास्त कडक व मालमत्तेवरच

बहुतांशीं अवलंबून असल्यामुळें फारच थोडया स्त्रियांना हा हक्क प्राप्त होऊं शकला आहे. पुरुष सभासदांची निवडणूक मात्र प्रत्यक्ष म्हणजे थेट मतदार-संघांतून व्हावयाची. फेडरल विधिमंडळाच्या छोटया सभागृहामध्यें (Lower House; वर उल्लेखिलेले ते Upper House ) स्त्रियांसाठीं नऊ जागा आहेत. येथील पुरुष सभासद प्रांतिक कौन्सिलें निवडतात, पण स्त्रीसभासदांसाठीं एक स्वतंत्रच मतदारसंघ आहे. तो म्हणजे सर्व प्रांतिक विधिमंडळांच्या स्त्रीसभासदांचा. या नऊ जागांपैकी दोन मुसलमान स्त्रियांसाठीं व एक इंडियन ख्रिश्चन स्त्रीसाठीं राखून ठेवली आहे. प्रांतिक कौन्सिलांमध्ये, पुढीलप्रमाणे जागा स्त्रियांसाठी राखून ठेवल्या आहेत. मद्रासेत ८; पैकी ६ जनरल, १ मुसलमान व १ ख्रिश्चन. मुंबई कौन्सिलांत ६; पैकी ५ जनरल, १ मुसलमान. बंगालमध्ये ५; पैकीं २ जनरल, २ मुसलमान स्त्रियांसाठीं व एक अँग्लो इंडियन स्त्रीसाठीं. संयुक्त प्रांतांत ६; पैकी ४ सर्वसाधारण, २ मुसलमान. पंजाबांत ४; पैकी १ खुली, १ शीख, २ मुसलमान. बिहारमध्यें ४; पैकी ३ जनरल, १ मुसलमान. मध्यप्रांत आणि वऱ्हाडांत ३ खुल्या. आसामांत एक खुली. ओरिसांत २ खुल्या. सिंधांत २; पैकी १ मुसलमान. या राखीव जागांशिवाय इतर खुल्या जागांसाठीं उभें राहण्यासही स्त्रियांना मोकळीक आहेच.

याप्रमाणें नवीन सुधारणांखालीं स्त्रियांना मिळालेल्या मताधिकाराचें स्वरूप आहे. हे हक्क अपुरे, निराशाजनक व खेदजनक आहेत यांत शंका नाहीं पण मिळालें तें पदरांत पाडून घ्यावे व जास्त मिळण्यासाठीं भांडण्यास तयार राहावें, या राजनीतींतील तत्त्वाप्रमाणें मिळालेल्या हक्कांचा सदुपयोग स्त्रियांनी करून दाखवावा व जास्त हक्कासाठी आपली लायकी प्रस्थापित करून झगडा पुन्हां चालूच ठेवावा. गेल्या निवडणुकींत मतदार स्त्रियांनी आपलें हें कर्तव्य केलें नाही असें आढळून आलें. ६० लाख स्त्रिया नवीन हक्काप्रमाणें मतदार आहेत; पण प्रत्यक्ष निवडणुकींत फारच थोडया बायका पोलिंग स्टेशनांवर मतें देण्यासाठीं गेल्या. मद्रास व मुंबईसारख्या पुढारलेल्या म्हणून गणलेल्या प्रांतांतूनसुद्धां अवघ्या शेंकडा १८·१ व ६·५ बायकांनीं आपलीं मते नोंदलीं ! मग पंजाब, बिहारसारख्या मागसलेल्या प्रांतांची गोष्ट विचारावयासच नको. स्त्रियांची आपल्या हक्काविषयींची ही उदासीनता

खेदजनक नाहीं काय? एवढें रक्त आटवून मिळालेलें मत स्त्रियांनीं खुशाल डावलावें? पण वर एका ठिकाणीं दाखवल्याप्रमाणें स्त्रियांनीं व त्यांच्या पुढाऱ्यांनीं निराश होण्याचें कारण नाहीं. लोकशाहीच्या तत्त्वांना, लोकप्रातिनिधिक संस्थांना हिंदुस्थानचे पुरुषसुद्धां अजून नवखे आहेत. नागरिकत्वाचे हक्क योग्य तऱ्हेनें वापरणे व उपभोगणे ही चीज हिंदी स्त्रियांना अगदी अपूर्व अननुभूत अशी आहे. पण योग्य शिक्षण व अभ्यास यांनीं स्त्रिया आपल्या नागरिक कर्तव्यांत लवकरच तरबेज होतील, आणि योग्य बाजूला मते देतील व कौन्सिलांतून निवडून आलेल्या आपल्या स्त्रीप्रतिनिधींकडून खटपट करून योग्य कार्य, हिंदी स्त्रियांना व मुलांना उपकारक असे कायदे वगैरे करवून घेतील. सध्यांही नवीन सुधारणांखालीं झालेल्या निवडणुकीत अनेक स्त्रिया कौन्सिलांतून निवडून आल्या आहेत. अनसूयाबाई काळे, लक्ष्मीबाई ठुसे, लीलावती मुनशी, राधाबाई सुब्बारायन् वगैरे अनेक कर्तबगार स्त्रियांनीं आज विधिमंडळें भूषविलीं आहेत. हंसा मेहेता पार्लमेंटरी सेक्रेटरीच्या हुद्द्याला चढल्या असून, विजयालक्ष्मी पंडित या तर संयुक्त प्रांतांत प्रधानपद पावल्या आहेत. या भगिनींच्या तोंडाकडे सारा हिंदी स्त्रीसमाज आशेनें पाहात आहे. त्या ज्या स्वरूपाचें कार्य करतील त्यावर हिंदी स्त्रियांचे राजकीय भवितव्य अवलंबून राहील. कारण स्त्रियांना मत द्यावे कीं नाही, त्यांनी राजकारणांत भाग घ्यावा किंवा नाहीं याबद्दल दोन पक्ष आहेत. कांहीं लोक स्त्री ही भावनाप्रधान, एककल्ली, संकुचित मनाची व पूर्वग्रहांनीं ग्रस्त अशी असल्यामुळे, तिला मत मिळाल्यास राजकारणांत गोंधळ माजेल, अनर्थ होईल, अनिष्ट कायदे पास होतील व जरूर ते बाजूला सारले जातील असे म्हणतात; तर कांहीं स्त्रियाही उत्साहपूर्ति व अंतःप्रेरणायुक्त असल्यामुळें, त्यांनीं राजकारणांत भाग घेतल्यास राष्ट्राचा फार फायदा होईल असे म्हणतात; स्त्रिया व्यक्तींवर भावना केंद्रित करीत असल्यामुळें विशाल, व्यापक तत्त्वांकडे त्यांचें दुर्लक्ष होईल असें कोणी म्हणतात. स्त्री आंतरराष्ट्रीय राजकारणांत पडल्यास लढाया बंद होऊन विश्वशांति प्रस्थापित होईल; कारण स्त्री ही जीवनाची ( life ) अधिष्ठात्री देवता आहे, मृत्यूची नव्हे असे एक पक्ष म्हणतो. तें कांहींही असो, पण स्त्रियांना मत दिल्यानें अनर्थ खात्रीनें होत नाहींत; उलट अत्यंत हितकारक सुधारणाच होतात असें इंग्लिश स्त्रियांच्या उदाहरणांवरून सिद्ध झालें आहे. आतां

हिंदी स्त्रियांनीही आपल्या हक्कांचा योग्य उपयोग करून जास्त हक्क मिळवावेत व ते इंग्लिश स्त्रियांप्रमाणे आपल्या व राष्ट्राच्या कल्याणाच्या कामी लावावेत.



प्रकरण ११ वें : : :

## .... .... स्त्रिया व नीतिमत्ता

केवळ हिदुस्थानातच किंवा पौर्वात्य देशांतच नव्हे, तर पाश्चिमात्य देशांतही स्त्रियांचे केवळ दोनच धंदे लोक ओळखीत. एक प्रतिष्ठितपणाचा धदा म्हणजे लग्न; लग्न करून संतति वाढवणे; मालकाची म्हणजे नवऱ्याची मर्जी सांभाळून त्याच्या सर्व सुखसोयी पाहणे व या सर्व सेवेचा बदला म्हणून आपली उपजीविकेची सोय करून घेणे. दुसरा अप्रतिष्ठितपणाचा धदा, म्हणजे वेश्याव्यवसाय: याच्यांतही स्त्रिया पुरुषांची सुखसोय पाहून, त्यांची मर्जी सुप्रसन्न ठेवून आपला चरितार्थ चालवतात; म्हणूनच कोणी कोणी लग्न म्हणजे कायदेशीर वेश्याव्यवसाय असे म्हणतात; आणि खरे पाहिले असतां लग्नाची बायको व वेश्या यांच्या कार्यात मूलतः काय फरक असतो? दोघीही पुरुषाची शारीरिक गरज भागवतात व त्याबद्दल पैसा मिळवतात. मग तो कायदेशीर रीतीने कुटुबांत स्वतःच्या मुलांबाळांच्या उपजीविकेसाठीं म्हणून मिळालेला असो, किंवा बेकायदेशीर रीत्या स्वतःच्या चैनीसाठीं मिळालेला असो. एकदरीनें या दोन व्यवसायांपलीकडे स्वतःचें पोट भरण्यासाठीं प्रतिष्ठितपणे, मानसन्मानाने करण्याजोगा आणखी एकादा धंदा स्त्रियांना असावा किंवा असं शकेल ही कल्पनाच मध्ययुगीन लोकांत नव्हती. त्यामुळे (He for God, She for the God in him) नराचा जन्म नारायणासाठीं व नारीचा नरासाठीं, अशी विभागणी करून स्त्रियांची सर्व कर्तव्ये, त्यांचें जीवनसर्वस्व, त्यांच्या जीवनाचें सार्थक्य पुरुषाच्या व्यक्तित्वांत केंद्रित करून टाकण्यांत आलें.

पण स्त्रियांचे व्यक्तित्व असे चिरडून टाकल्यामुळे राष्ट्राचा व त्याच्या अंगभूत पुरुषांचा शेवटीं तोटाच झाला. स्त्रियांचे शरीर, मन, बुद्धि, विचारशक्ति कर्तबगारीस योग्य क्षेत्र न मिळाल्यामुळे पांगळी होऊन गेली. प्रथम प्रथम आपल्या हाती अप्रतिहत एकछत्री सत्ता येऊन आपल्या घरांत हक्काचे गुलाम आल्यामुळे पुरुषांना कदाचित् डौल वाटला असेल; पण पुढे पुढे लौकरच अज्ञानी व परावलंबी स्त्री ही प्रगतिप्रिय पुरुषाच्या मार्गांत एक धोंड, त्याच्या गळ्याभोंवतील एक लोढणें होऊन राहते असे पुरुषांच्याही अनुभवास येऊ लागलें. राष्ट्राचे अर्धे अंग लुळेपांगळे झाल्यामुळे अर्धी शक्ति चूलमूलसारख्या किरकोळ कामांत सर्वस्वीं कुजत पडल्यामुळे राष्ट्रही मागे पडूं लागलीं.

स्त्रियांच्या व्यक्तित्वाची ही होणारी हानि, त्यांच्या हक्कांना, माणुसकीला, लायकीला फासले जाणारे हे काळें, पाश्चात्य देशांतील कांहीं सुबुद्ध पुरुषांच्या व त्यांच्या हाताखालीं सुजाण बनूं लागलेल्या स्त्रियांच्या लक्षांत येऊ लागलें, व राष्ट्राच्या पुरुषांच्या भावी पिढीच्या व स्त्रियाच्या हिताच्या दृष्टीनें स्त्रीस्वातन्त्र्याची चळवळ सुरू झाली. स्त्रिया म्हणजे केवळ घरांतील अडगळ किंवा इंद्रियजन्य गरजा, भूकतहान वगैरे भागवण्याचें एक स्वस्त व सोयीचे साधन नसून, त्याही ईश्वराच्याच घरचा एक जीव आहेत; त्यांनाही भावना, बुद्धि, विचारशक्ति, पुरुषांच्या बरोबरीनें कदाचित् कांहींच्या मतें निराळ्या प्रकारची पण समान दर्जाची, देवापासून मिळालेली आहे—तेव्हां त्यांना सर्वसामान्य माणुसकीचे हक्क मिळाले पाहिजेत अशी मागणी चोहों बाजूंनी होऊं लागली. स्त्रियांना समान आर्थिक हक्क, राजकीय हक्क, सामाजिक हक्क मिळूं लागले व स्त्रीला फारां दिवसांनीं तिचा मूळचा समान—पुरुषांच्या बरोबरीच्या मानाचा दर्जा प्राप्त झाला.

ही झाली प्रतिष्ठित स्त्रियांची गोष्ट. समाजांत सध्यां प्रचलित असलेल्या नैतिक दडकाप्रमाणे नीतिमान् ठरणाऱ्या अशा मुली, बहिणी, बायका, माता, यांना राजकीय, सामाजिक व आर्थिक प्रांतांत समान हक्क दिले गेले; पण ज्यांना अनीतिमान् किंवा जास्त दयार्द्र बुद्धीने पतित ( fallen ) किंवा दुर्दैवी (unfortunate ) असे मानण्यांत येते, अशा अभागी स्त्रियांच्या दशेकडे मात्र बराच काळ, स्त्रियांचें किंवा समाजसुधारक पुरुषांचे लक्ष गेलें नाहीं. इंग्लंडमध्यें स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ सुरू झाल्यावर बऱ्याच वर्षांनीं या प्रश्नाकडे

जोसेफाइन बटलर या पुढारी स्त्रीचें लक्ष वेधलें. १८७० मध्ये स्त्रियांच्या उच्च शिक्षणाची वाढ करण्यासाठीं स्थापिलेल्या नॉर्थ ऑफ् इंग्लंडच्या कौन्सिलचें अध्यक्षपदाचा तिनें या प्रश्नाकडे आपला वेळ खर्च करतां यावा म्हणून राजीनामा दिला. या राजीनाम्यांत तिने काढलेले उद्‌गार फार मननीय आहेत. ती लिहिते, "स्त्रियांमध्यें उच्च शिक्षणाचा प्रसार करण्याची कल्पना अत्यत उदार व स्त्रियांना हितकारक आहे, यांत शंका नाहीं. या कामांत मीं अनेक वर्षें खर्च केलीं. पण एके दिवशीं माझ्या अंतःकरणांतला देव जागृत होऊन मला म्हणाला, 'काय चालवलें आहेस तू हे! इमारतीचा मनोरा मोठ्या चतुर कुसराईनें तू रचीत आहेस, पण तुझ्या या इमारतीच्या पायाकडे तूं कधी लक्ष पुरवलें आहेस का? तिचा पाया जसा कांहीं एकाद्या भूकपाने अगदीं खिळखिळा होऊन गेला आहे! वरती इमारत उठवण्याचा नाद सोडून खाली उतर आणि पायाकडे लक्ष दे. तेथें स्त्रियांची कशी राजरोस हालअपेष्टा चालली आहे, त्यांना कायद्याच्या छत्राखाली (!) कसें अपमानकारक जीवन कंठावे लागत आहे ते पहा, व ते सुधारण्याचा प्रयत्न कर आधी.'"

जोसेफाइन बटलरचाच अनुभव इतर कांहीं थोडया स्त्रियांसही आला; पण या नवीन दृष्टिकोणामुळे इंग्लडमधल्या स्त्रीस्वातत्र्याच्या चळवळीत दुफळी झाली. इतके दिवस या चळवळीत 'नैतिक' दृष्टीचा समावेशच नव्हता. स्त्रीस्वातत्र्यवादिनीचें लक्ष समान मताधिकार, स्त्रियांसाठीं उच्च शिक्षण सुलभ करून त्याचा प्रसार वाढवणे, विवाहित स्त्रीला कायदेशीर हक्क पुरुषांच्या बरोबरीने प्राप्त करून देणें, तिच्या मुलांवर पित्याच्या बरोबरीनें तिचे पालकत्वाचे हक्क प्रस्थापित करणे, तिच्या मालमत्तेवर तिचा अबाधित हक्क राहील असे करणे. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे त्या वेळीं १८६७ पर्यंत स्त्रियांवर चालू असलेले व त्यांच्या व्यक्तित्वाला ग्रासून टाकीत असलेले निर्बंध व अन्याय—आर्थिक, सामाजिक व राजकीय—दूर करणे यांकडच वेधून गहिले होते. राजकीय, सामाजिक, आर्थिक समान दर्जा मिळवतां मिळवतां समान नैतिक हक्कांकडे त्यांचें लक्षच गेलें नाहीं. स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ चालवतांना नैतिक वा लैंगिक क्षेत्रांत पुरुषांच्या मालकी हक्काच्या अरेरावीने स्त्रियांची कशी लाजिरवाणी स्थिति झाली आहे

या बाबीकडे कांहीं स्त्रियांचें लक्ष गेलें असेल. पण हा प्रश्न हाताळणें म्हणजे अनेक किळसवाण्या अनुच्चार्य गोष्टींचा लाजिरवाणा खल चार लोकांत उघडपणें करणें होय. म्हणून बहुतेक स्त्रियांनीं तिकडे लक्ष देण्याचेंच टाळलें; व जोसेफाइन बटलरसारख्या कांहीं स्त्रियांनीं जेव्हां हा कठिण मार्ग आपण चोखाळणार असल्याचे जाहीर केलें, तेव्हां असल्या गोष्टींचा संबंध स्त्री-स्वातंत्र्याच्या चळवळीशीं जोडला गेल्यास त्या चळवळीचे नांव बद्दू होऊन, ती अप्रिय होऊन हातीं येत चाललेलें यश पारखे होईल, या भीतीनें या स्त्रीपुढाऱ्यांनीं जोसेफाइन बटलरशीं आपला संबंध तोडून टाकला; पण जोसेफाइननें न कचरतां आपला मार्ग धैर्यानें काटण्यास सुरुवात केली.

जोसेफाइन व तिचे अनुयायी यांनी प्रथम १८६४ ते १८६९ पर्यंत पास करण्यांत आलेल्या तीन संसर्गजन्य रोगविषयक कायद्याविरुद्ध (Contagious Diseases Acts) बंडाचें निशाण उभारलें. या कायद्यान्वये यूरोपांतील कित्येक देशांप्रमाणें इंग्लंडांतही सैन्य व आरमार यांतून सांसर्गिक रोग पसरूं नयेत म्हणून पुढील गोष्टी कराव्यात असे ठरवण्यांत आले : वेश्यागृहांना लायसेन्स देणें, वेश्यागृहांची वरचेवर तपासणी करणे, वैद्यकीय तपासणी प्रत्येक वेश्येची दर पंधरवड्यास करणें, रोगग्रस्त स्त्रियांची बळजबरीनें हॉस्पिटलांतून रवानगी करणे, वगैरे गोष्टी सुरू झाल्या. या कायद्यामुळें वेश्याव्यवसायाला आळा पडण्याऐवजीं वेश्याव्यवसाय हा एक सरकारी मान्यता मिळूं शकणारा, सरकारी परवानगीचें शिक्कामोर्तब राजरोसपणें मिरवणारा आवश्यक व कायदेशीर धंदा ठरला; व दुसरे म्हणजे वेश्याव्यवसायाला आळा पडावा म्हणून जीं नियंत्रणे घालण्यांत आलीं तीं एकतर्फी घातल्यामुळे समाजांत स्त्री व पुरुष यांचे नीतिनिकष निरनिराळे असल्याची ग्वाहीच उघड उघड सरकारने दिली. या दुटप्पी नीतिनिकषांमुळे (Double Standard of Morality) वेश्यांवर व सर्वच स्त्रीजातीवर घोर अन्याय होत आहे. सरकारनें वेश्यांवर निर्बंध घातले; पण वेश्यागमनी पुरुषांच्या स्वैराचारावर घातले काय? संसर्गजन्य दुष्ट रोग वेश्यांच्या सहवासानें पुरुषांना जडूं नयेत म्हणून वेश्यांची वैद्यकीय तपासणी करावयाची; पण पुष्कळ वेळीं रोगांनीं सडलेल्या पुरुषांपासूनच वेश्यांना रोग जडतात; अशा पुरुषांच्या तपासणीबद्दल व त्यांच्यापासून स्त्रियांचें संरक्षण करण्याबद्दल सरकारनें कां तजवीज केली

नाही ? स्त्रीच्या नीतीला एक कसोटी व पुरुषाच्या नीतीला दुसरीच, हा प्रकार केवळ येथेंच नाही तर इतर कायद्यांच्या व व्यवहारांच्या बाबतींतही दिसतो.

समाजामध्ये जारकर्म हे स्त्री व पुरुष दोघे करतात; पण स्त्री हीच गुन्हेगार ठरते, कारण तिचा गुन्हा चव्हाट्यावर येतो; तिला मूल होतें, पण तें मूल ज्या पुरुषाचे असते त्याचे पाप उघडकीस आणण्याची कोणी खटपट करीत नाही. समाज स्त्रीवर बहिष्कार घालतो, पण पुरुष मात्र उजळ माथ्याने फिरत असतो. स्त्रीचें पाऊल वांकडे पडल्याची भाषा आपण नेहमी बोलतों व ऐकतो; पण पुरुषाचेंही पाऊल स्त्रीबरोबरच वांकडे पडत नाही काय ? त्याबद्दल त्याला समाज, रूढि किंवा कायदा काय शिक्षा करतात ? संमतिवयाचा कायदा, विवाह-विच्छेदाचा कायदा, अनूढमातृत्वाचा कायदा—या सर्वच कायद्यांत स्त्री व पुरुष यांना भिन्न भिन्न नीतिनिकष लावून स्त्रियांवर अन्याय केला गेला आहे. या अन्यायाला जोसेफाइन बटलर व तिचे अनुयायी यांनीं Contagious Diseases Acts विरुद्ध बंड करून तोंड फोडले व स्त्रियांच्या नैतिक हक्कांची समाजाकडून व सरकारकडून कशी पायमल्ली होत आहे हे उघडकीस आणून, स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें आचारस्वातंत्र्य असावें; पुरुषांच्या इतकाच त्यांच्यावर नैतिक जबाबदारीचा भार असावा, कमीजास्त असू नये अशी मागणी केली. या आंदोलनाने, या प्रथम अनुच्चारणीय वाटणाऱ्या प्रश्नांवर पुष्कळच चर्चा उघडपणें होऊ लागली; व शेवटीं बटलरप्रभृतीच्या खटपटीस यश येऊन वरील कायदे तात्पुरते रद्द करण्यांत आले, व १८८६ त ते अजिबात रद्दच झाले. पुढे खरे हितकारक असे अनेक नवीन कायदे बनविण्यांत आले. या नवीन कायद्यांत गर्हणीय असे कांही न वाटल्यामुळे, मिलिसेंट फॉसेट या स्त्रीस्वातंत्र्यवादिनीच्या पखाखालचा फक्त राजकीय व शैक्षणिक समान हक्कांसाठी चळवळ करणारा पक्षही परत जोसेफाइनला येऊन मिळाला व त्यांच्या संघटित चळवळीने खालील कायदे पास झाले.

पास झालेल्या नवीन कायद्यांत स्त्रियांवरील अन्याय दूर करून त्यांचा नैतिक दर्जा पुरुषांच्या बरोबरीने ठेवण्याचा प्रयत्न केला होता. संमतिवयाची मर्यादा १२ होती ती वेश्याव्यापाराच्या बाबतीत वाढवण्यांत आली व वयांत आलेल्या (२१ वर्षांच्या) मुलीला सुद्धां तिची संमति असली तरी, अनैतिक कामाकडे वळवणाराला जबर शिक्षा ठेवण्यांत

(Criminal Law Amendment Act) आली. मुलांमुलींच्या समतिवयाची मर्यादा १७ पर्यंत वाढवण्यांत आली. १९२६ मध्यें अनौरस संततीबद्दल कायदा पास झाला. मूल जन्मल्यावर पिता व माता विवाहबद्ध झाल्यास आतां मूल औरस ठरते. अविवाहित मातेला मुलाच्या पित्यापासून आठवड्याला वीस शिलिंगांपर्यंत मुलाचा खर्च म्हणून पैसे मागून घेण्याला कायद्याने हक्क पोचूं लागला. घटस्फोट मिळवण्यासाठी पूर्वी पत्नीला व्यभिचार व क्रौर्य अशा दोन गोष्टी नवऱ्याविरुद्ध कोर्टांत सिद्ध करून दाखवाव्या लागत असत; नवऱ्याला मात्र पत्नीविरुद्ध फक्त व्यभिचाराचा आरोप सिद्ध करून दाखवला म्हणजे घटस्फोट मिळे. १९२३ मध्ये हा भेद काढून टाकला गेला व पत्नीला पतीचा व्यभिचार एवढे कारण घटस्फोट मिळण्यास पुरे ठरू लागले. अजूनसुद्धां विवाहविच्छेदाच्या कायद्यांत अगदीं विषमता नाहीं असे नाही. उदाहरणार्थ, पत्नीच्या प्रियकरापासून नवरा नुकसानभरपाई अजून मागू शकतो; जणू काय पत्नी ही त्याची वैयक्तिक मालमत्ताच आहे! तसेच वेश्या ही वेश्यागमनी पुरुषापेक्षां नीच दर्जाची आहे ही समाजांतील भावना अद्यापि गेलेली नाही. पुरुषांना आडमार्गाला जाण्याचा मोह घालण्याबद्दल (Solicitations of Street-Walkers) इग्लंडमध्ये दरवर्षी ३००० स्त्रिया गुन्हेगार म्हणून पकडल्या जातात, पुरुषाला कोणी कांहीं करीत नाही. स्त्रीचे म्हणणेही कोणी ऐकून घेत नाहीं; पोलिसाचा शब्द प्रमाण मानून तिला शिक्षा ठोठावली जाते. याप्रमाणे दुटप्पी नैतिक निकष अजून अजिबात लोपले नाहीत; पण स्त्रियांच्या आंदोलनाने ते लौकरच नामशेष होतील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

याप्रमाणे स्त्रियांच्या समान नैतिक हक्कांचा इग्लंडमधील इतिहास आहे. येथेंच या समान नैतिक हक्कांच्या कल्पनेला लागू पडणारी एक अनिष्ट दिशाही दाखवून ठेवली पाहिजे. इंग्लिश स्त्रिया जेव्हां जोसेफाइन बटलरच्या पिढीत समान नैतिक दर्जाची मागणी करीत होत्या, तेव्हां स्त्री व पुरुष या दोघांचा नैतिक दर्जा सारखाच उच्च असावा अशी त्यांची विचारसरणी होती. पुरुषांनी हवे तसे स्वैराचार करून नामानिराळे राहावे व स्त्रियांना मात्र त्याच स्वैराचाराबद्दल अवास्तव शिक्षा समाजाकडून व कायद्यांनीं व्हावी, या विषमतेविरुद्ध त्यांनीं बंड पुकारलें होतें. पुरुषांच्या स्वैराचाराला आळा

घालावा; स्त्रीप्रमाणेंच त्यालाही स्वैराचाराबद्दल जबाबदार धरण्यांत यावें अशी त्यांची मागणी होती. पण तरुण पिढींत समान नैतिक हक्कांच्या या मागणीला स्वैराचाराच्या परवान्याचें स्वरूप प्राप्त होत आहे की काय अशी साधार भीति कित्येकांस वाटूं लागली आहे. स्त्रियांना प्राप्त झालेलें आर्थिक स्वातंत्र्य व संततिनियमनाची सुलभ साधनें या जोडगोळीच्या साह्यानें पाश्चात्य समाजांत, आधुनिक स्त्रीनें स्वैराचाराचे समान हक्क पुरुषांच्या बरोबरीने उपभोगावयास सुरुवात केली आहे. या स्वैराचारामुळें पाश्चात्य स्त्रीपुरुषांचे जीवन असमाधानी व दुःखी बनत चाललें आहे. 'सुखाचे प्रयोग' करण्यांतच तरुण स्त्रीपुरुषांचे यौवन सपून जात आहे. लग्न हे नामशेष होऊन कुटुंबसंस्थेचा ऱ्हास होत आहे. संततीची संख्या घटत असून, गोरी जात अजिबात लयास जाते की काय अशी भीति प्रजाजननशास्त्रज्ञांस पडली आहे. पण या भीतीनें घाबरून जाऊन जर्मनीसारखें प्रतिगामी धोरण स्वीकारून, स्त्रीस्वातंत्र्यावर मुळांतच कुऱ्हाड घालणें किंवा हिंदुस्थानांत भविष्यकाळीं स्त्रिया स्वैराचारी बनून संकट होईल म्हणून आज त्यांना आर्थिक व राजकीय स्वातंत्र्यही देण्याचे टाळणें वेडेपणाचे होईल. शिवाय हिंदी स्त्रियांच्या बाबतीत ही भीति वृथा आहे. एक तर पाश्चात्य स्त्रियांचे उदाहरण पाहून, 'पुढच्याला ठेंच मागचा शहाणा' या न्यायाने हिंदी स्त्रिया धडा घेतील. शिवाय निष्कलंक, उज्ज्वल चारित्र्याबद्दल युगानुयुगें प्रख्यात असलेल्या हिंदी स्त्रिया नैतिक समान हक्कांचा दुरुपयोग करून स्वैराचारी बनतील हे शक्यच नाही.

याप्रमाणे वादविषय बनलेल्या दुटप्पी नैतिक निकषांचा (Double Standard of Morality) थोडक्यांत विचार केला. आतां ज्या वेश्याव्यवसायाला कांहीं कांही देशांत निर्बंधांच्या रूपाने कायदेशीर स्वरूप दिलें गेल्यामुळे हा दुटप्पी निकषांचा प्रश्न उपस्थित झाला, त्या वेश्याव्यवसायाच्या प्रश्नाचा विचार करू. या विषयाचे विवेचनाच्या दृष्टीनें दोन भाग पडतील. एक, या धंद्यांत नाखुषीनें पडावें लागणाऱ्या स्त्रियांची दुःस्थिति व दुसरी, वेश्याव्यवसायावर जगणाऱ्या वेश्यांची खरेदीविक्री व व्यापार (Traffic in Women and Children) करून गबर होऊन बसणाऱ्या मध्यस्थांची कुंटणगिरी.

*Our Cause* या संकीर्ण लेखसंग्रहांत मिसेस् लक्ष्मी अम्मा मेनन् यांनीं या विषयावर एक अत्यंत उद्बोधक व माहितीनें परिपूर्ण असा लेख लिहिला

आहे. त्यामध्ये त्यांनी वेश्याव्यवसाय या संस्थेचा इतिहास चित्रित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मते प्राचीन मानव-जागतिक संस्कृतींत वेश्या-व्यवसायास स्थानच नव्हतें. स्त्री ही तेव्हां स्वतंत्र व आर्थिक दृष्टया स्वावलंबी असल्यामुळे देहविक्रय करून, पुरुषांच्या मर्जीवर पोट भरण्याची कधीं तिला जरूरच भासली नाही. तेव्हां नीतिअनीतीच्या कल्पनाही फार निराळ्या होत्या. संभोगावर नियंत्रण होते, पण ते फक्त मुलांचे पितृत्व निश्चितपणें समजून त्यांच्या भरणपोषणाची व्यवस्था व्हावी व वंशाचे सातत्य कायम राहावें म्हणून. लग्न म्हणजे एक निर्वाहाचे साधन, आरामांत जन्म जाण्याची एक कायमची सोय, असा प्रकार त्या वेळीं नव्हता. वंशसातत्याचें व संतति-संरक्षणाचे एक साधन म्हणून लग्न व कुटुंब या संस्था जरूर आहेत असें तेव्हां मानले जाई. अर्थात् इंद्रियलालसेच्या तृप्तीसाठी स्त्रीला क्रयविक्रयाची वस्तु बनवणें ही कल्पना तेव्हां अस्तित्वांत असणें शक्यच नव्हते. ही कल्पना सुधारलेला म्हणून समजल्या जाणाऱ्या ऐदी, चैनी, सुखासुखी समाजाच्या सुपीक मेंदूतून बाहेर पडली आहे. सुखासीन, चैनी जीवन स्वैर होऊं लागलें कीं, त्यावर वैवाहिक नीतीसारखी कृत्रिम बंधनें घालणें व नंतर तीं कृत्रिम बंधनें चैनीला चटावलेल्या जीवाला जाचक वाटू लागली कीं, त्यांतून पळवाट काढण्याचा प्रयत्न करून एकंदर जीवन नकली, दिखाऊ, बाहेरून पवित्र पण आंतून अपवित्र करणे—हीं सर्व सुधारला म्हणवणाऱ्या समाजाचीं लक्षणें आहेत. या खोटया सुधारणेच्या कल्पनेमुळेंच वेश्याव्यवसायाचे समर्थन केलें जाते. वैवाहिक जीवनाची पवित्रता कायम राहावी म्हणून राजरोस वैवाहिक पावित्र्यभंगाची सोय ठेवणे, आपल्या आईबहिणीची अब्रू डागळली जाऊं नये म्हणून दुसऱ्यांची आईबहीण बाजारांत बसवणे; एकंदर स्त्रीजातीला प्रतिष्ठित पातिव्रत्याचा, पावित्र्याचा, नीतीचा डांगोरा पिटतां यावा म्हणून कांहीं स्त्रियांच्या पावित्र्याची होळी करणे—अशा परस्परविरोधी, कृत्रिम, हास्यास्पद व भयंकर गोष्टींचे कडबोळे म्हणजे वेश्याव्यवसाय. या सुधारलेल्या समाजाच्या संस्कृतीचा कळस म्हणजे ज्यांना ते स्वतःच समाजाच्या पावित्र्याचे रक्षक म्हणून म्हणतात, त्या या स्त्रियांना हीन, पतित म्हणून पशूपेक्षांही कमी लेखणें, त्यांना क्रयविक्रयाची वस्तु बनवणें व त्यांचा दैनंदिन जीवनक्रम लाजिरवाणा, कष्टमय, अपमानकारक बनवून सोडणें. सुधारलेल्या (!)

समाजाचा गुप्त रानटीपणा, क्रूरपणा, अपवित्रता व ढोंगीपणा यांची मूर्तिमंत साक्ष म्हणजे वेश्याव्यवसाय ही संस्था.

आतां कोणी असा प्रश्न करील कीं जर हा व्यवसाय असा लाजिरवाणा व उद्वेगजनक आहे तर त्याकडे स्त्रिया वळतात तरी कशाला? वेश्याव्यवसायाची समाजाला जरूर आहे असें मानणारा वर्ग असे म्हणतो की, वेश्याव्यवसाय करणाऱ्या स्त्रिया हीन मनोवृत्तीच्या असतात; त्यांची ऐंद्रिय भूक अनिवार असते. वस्त्रप्रावरणें, नटणेंथटणे खाणेपिणे याची त्यांना आवड असते. स्वैराचार त्यांना प्रियच असतो; तेव्हां आपखुषीनें हा धंदा पत्करणाऱ्या या स्त्रियांची त्यांना नंतर भोगाव्या लागणाऱ्या, त्यांच्या पापांच्या फळांबद्दल कींव करण्याचें मुळीच कारण नाही. त्यांचा उद्धार करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे समाजसेवकांनी आपला काळ, पैसा व मेहनत फुकट दवडणे आहे. कितीही सुधारण्याचा प्रयत्न केला, तरी त्या स्त्रिया पुन्हा त्यांना प्रिय असलेला नरक कवटाळण्यास जाणारच.

परंतु या विषयांत ज्यांनीं कळकळीने लक्ष घातले आहे अशा समाजसेवकांनीं आंकडे गोळा करून वरील आरोपांचा फोलपणा सिद्ध केला आहे. वेश्याव्यवसायाकडे वळणाऱ्या स्त्रिया हीन मनोवृत्तीच्या असून आपखुषीनें त्या हा धंदा पत्करतात ही गोष्ट सर्वथैव खोटी आहे. या व्यवसायाकडे स्त्रियांना ओढून नेणारीं खरी पुढील कारणें आहेत. दारिद्र्य हा हिंदुस्थानला सर्व बाजूंनी ग्रासून टाकणारा महाभयकर रोग अनाथ व अशरण स्त्रियांना या बाजूला ओढून नेतो. आपल्या समाजांत सध्यां व पाश्चात्य समाजांत स्त्रियांच्या आधुनिक सार्वत्रिक जागृतीच्या पूर्वी स्त्रियांना दुसऱ्या कुठल्याही प्रतिष्ठित धंद्यांत प्रवेश नव्हता. निरनिराळ्या धंद्यांना जरूर ते शिक्षण, ज्ञान, अनुभव मिळवण्याच्या सोयीही त्यांना उपलब्ध नव्हत्या व कित्येक धंद्यांत तर पडण्यास त्यांना मज्जाव होता. त्यामुळे जेव्हां जेव्हां अन्नाला महाग होण्याचा प्रसंग त्यांना येई व उजळ माथ्याने ससार थाटणे तर शक्य नसे, तेव्हां हा वाममार्ग त्यांच्या मनाविरुद्धही त्यांना कित्येक वेळां पत्करणे भाग पडे. वांकडे पाऊल पडलेल्या विधवा व कुमारिकांना पुन्हां आपलें तोंड उजळ करण्यास किंवा प्रतिष्ठित समाजांत उठण्या-बसण्यास आपला नियमनिष्ठुर व स्त्रियांना अन्याय करणारा समाज संधीच देत नाहीं. अशा स्त्रिया नाइलाज होऊन पोटाची

खळगी भरण्यासाठी आपला अधःपात उघडया डोळ्यांनी करून घेतात. लीग ऑफ नेशन्सूनें निरनिराळ्या देशांतून या विषयाबद्दल एकत्रित केलेल्या आंकडयांवरून हेंच दिसून येते. फिनलंडमध्ये असे आढळून आलें की वेश्यांपैकी शे. ५० स्त्रिया खेडगांवांतल्या खालच्या मजूर वा नोकर दर्जाच्या लोकांतून आलेल्या असतात. मद्रास व्हिजिलन्स असोसिएशन (Vigilance Association) नें गोळा केलेल्या माहितीवरूनही, असें उघड दिसून येतें की, वेश्याव्यवसायांतील बहुतेक सर्व स्त्रिया केवळ पोटासाठी या धंद्यांत पडतात; चैनीसाठी किंवा अनिवार कामलालसेच्या तृप्तीसाटीं नव्हे. सोव्हिएट रिपब्लिकनें याविषयक आपल्या जाहीरनाम्यांत म्हटलें आहे, "स्त्रीला पोट भरण्यासाठी प्रतिष्ठित काम न मिळणे व तिच्या पाटीवर तिचा वाली, रक्षणकर्ता असे कोणी मायेचे माणूस नसणे हीं दोन्ही वेश्याव्यवसाय सालोसाल चालू राहण्याची कारणें आहेत." जर्मनीमध्ये तर बऱ्याच उदाहरणांत असें आढळून आलें कीं, स्त्रिया आपल्या पतीविषयी किंवा प्रियकराविषयी वाटत असलेल्या प्रेमाच्या पोटीच वेश्याव्यवसायाकडे वळतात ! नवऱ्यावर आर्थिक सकट आले असतां त्याच्या उदरनिर्वाहासाटी त्या हा धंदा पत्करतात; किंवा एकादा लोभी, आळशी, निर्घृण, उलटया काळजाचा पुरुष आपल्या फायद्यासाठीं व सुखासाठी आपल्या पत्नीला किंवा प्रियकरणीला या व्यवसायांत लोटतो. वर उल्लेखिलेल्या कारणांखेरीज आणखी कांही विशिष्ट परिस्थितीतही हिंदुस्थानांत स्त्रिया या धंद्याकडे वळतांना आढळतात.

हिंदुस्थानांत दक्षिणेकडे कांही ठिकाणी व जेजुरीला देवाला नवस करून मुली अर्पण करण्याची चाल आढळते. यालाच देवदासीची पद्धत असे म्हणतात. जेजुरीच्या खंडोबाला वाहिलेल्या मुलीना मुरळ्या म्हणतात या मुलीचें देवाशीं लग्न लाविलेले असते; तेव्हां अर्थातच आर्य हिंदु धर्माच्या दडकाप्रमाणे त्या कुठल्याही पुरुषाशी पुनर्लग्न करू शकत नाहीत. तत्त्वतः त्यांनी आपला जन्म देवाची सेवा करून घालवावयाचा असतो. या देवदासी गाण्यानाचण्यांत निपुण असतात व त्या मार्गे देवाची सेवा देवळांत करीत असतात, पण व्यवहारांत मात्र त्यांचें जीवन देवांपेक्षां देवपूजकांच्या, देवळांतील पुजाऱ्यांच्या व धनिक देवभक्तांच्या सेवेत खर्च होते. याप्रमाणें देवदासी या पवित्र नांवानें ओळखल्या जाणाऱ्या या स्त्रिया खरोखर कलावंतिणी किंवा

वेश्याच असतात. ही लाजिरवाणी चाल बंद व्हावी म्हणून प० गौर यांनीं मध्यवर्ति विधिमंडळांत एक बिल आणलें होतें व ते पासही झालें होतें; पण ते तसेच कुठें सरकारी फायलींत धूळ खात पडलें आहे. त्याची अंमलबजावणी करण्याची कोणीं दखल केली नाही. मद्रास लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लींत डॉ. मुथुलक्ष्मी रेड्डी यांनींही या चालीवर नियंत्रण घालण्यासाठी एक ठराव आणला होता; पण भरीव अशी कांहीही सुधारणा अद्याप या बाबतींत झाली नाहीं. धर्माचे नांव या प्रकरणांत येत असल्यामुळे, प्रतिबंधक कायदा करण्यास ब्रिटिश सरकार कचरलें असावें. पण आतां लोकशाहीच्या काळांत सुधारणेचें पाऊल धडाडीनें पुढे पडून ही चाल कायद्याने बंद करण्यांत येईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

वेश्याव्यवसायाला आणखीही एक दोन मार्गांनीं हिंदुस्थानांत खाद्य मिळत असतें. कांही अल्पवयी विवाहित मुली विषमविवाहाच्या दुःखांना कटाळून, किंवा खाष्ट नवऱ्याच्या बायका व एकत्र कुटुंबांतील लहान सासुरवासिनी जाचाला व छळाला कंटाळून, कोणा तरी सभ्य दिसणाऱ्या पण कुंटणगिरीचा धंदा करणाऱ्या बायांच्या नादी लागून फशीं पडतात व एकदां पाय निसरला कीं, पुन्हां तो कोरड्या जमिनीला लागण्याची हिंदु धर्मांत व समाजांत शक्यताच नसल्यामुळे कायमच्या त्याच धंद्यांत रुतून बसतात. स्त्रियांमधील अज्ञान, शिक्षणाचा सर्वस्वीं अभाव, कुटणगिरीच्या धंद्यावर सरकारचे नियंत्रण नसणें व एकदां वांकड्या मार्गात गेल्यावर पुन्हां परत येण्याची वाट अजिबात बंद होणे या सगळ्या कारणांमुळे वेश्याव्यवसायांत पडलेल्या स्त्रियांची संख्या वर्षानुवर्षे फुगत राहते.

लहान वयांत पतिसुखाला व संसारसुखाला आंचवलेली विधवा एकत्र कुटुंबांत पोटावारी कष्ट करीत राहाते. तिच्याभोंवतीं, गर्भाधानें, डोहाळजेवणें, बारशीं वगैरे सोहळे सोपस्कारानें होत असतात. अशा परिस्थितींत तिचें मन मोहविवश झाल्यास नवल नाहीं. अनाथ जीवांचा अवाजवी फायदा घेऊन, परिणामी आपण नामानिराळे राहणारे समाजकंटक चोहीकडेच असतात. अशा एकाद्याकडून बिचारी अल्पवयी विधवा फसली जाते; पुढें निसर्गानेंही तिला फशी पाडल्यावर पापाला तोंड फुटण्याच्या भीतीनें ती घराचा आसरा सोडून बाहेर पडते व शेवटी एकाद्या ‘मध्यस्थां’च्या ताबडींत

सांपडून वेश्याव्यवसाय पत्करते. एकादी चुकलेली विधवा पुढील आयुष्य सन्मार्गांत घालवण्याच्या सदिच्छेनें एकाद्या ‘ विधवाश्रमां ’त आश्रयास जाते. पण असें म्हणतात कीं यांपैकीं बरेचसे विधवाश्रम म्हणजे वेश्या-व्यवसायाला मुली पुरवणाऱ्या, पडद्यामागून सूत्रें हालवणाऱ्या एजन्सीच असतात. एकंदरीनें विधवांची स्थिति सुधारल्याखेरीज वेश्याव्यवसायाला या द्वारानें मिळणारें प्रचंड खाद्य बंद पडणार नाही. विधवेला स्वतःची मालमत्ता असेल तर मग तिला केवळ पोटासाठीं या निंद्य धंद्याकडे वळावे लागणार नाहीं; किंवा विधवेला लग्नापूर्वी अर्थोपार्जनक्षम शिक्षण मिळालेले असेल किंवा वैधव्यानंतर असें शिक्षण देण्याच्या खरोखरी उत्तम सोयी असतील तर तिला एकादा प्रतिष्ठित धंदा करून आपले पोट भरतां येईल. पुनर्विवाहा-वरील सामाजिक बहिष्कार उठेल तरी अनेक मोहविवश विधवांचा प्रश्न सुलभतेनें व राजरोस सुटेल. तसेच एकदा वांकडें पाऊल पडलेल्या विधवांना योग्य मार्गाला लावणाऱ्या संस्था सर्व देशभर विखुरल्या गेल्या पाहिजेत व त्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून सद्भावनेने चालवल्या पाहिजेत.

The Royal Commission of Labour ने विशेषतः मजूर लोकांच्या वस्तीत वेश्याव्यवसाय वाढण्याची कारणे म्हणजे दारिद्र्य व राह-ण्याच्या जागेची गैरसोय असे म्हटले आहे. वेताचा पगार मिळत असल्यामुळे व महाग जागा पुरेशी भाड्यानें घेण्याची ऐपत नसल्यामुळें पुष्कळसे मजूर आपलीं बायकामुले आपल्या नोकरीच्या गांवीं आणू शकत नाहींत. मग अर्थातच आठवड्याची मजुरी हातीं पडल्याबरोबर आठवडाभर थकलेल्या जीवाला आराम म्हणून बाटलाबाईकडे किंवा एकाद्या पांढऱ्या पायाच्या बयेकडे (White Lane) तो वळला तर त्याला दोष तरी कसा देतां येईल? मागणी-प्रमाणें पुरवठा हें तत्त्व समाजांतील इतर व्यवहारांप्रमाणें येथेही लागू पडते. ज्या शहरांतून मजुरांची वस्ती बरीच आहे, त्या शहरांत अशा स्त्रियांची मागणी फार असणार, हें लक्षांत घेऊन तेथें दलाललोक कुंटणखाने उघडतात व मजुरांच्या पैशाची, नीतीची व आरोग्याची धूळधाण होते. वर्षाकांठीं एक-दोनदां हा दुर्दैवी मजूर गांवीं कारभारणीला भेटायला जातो व त्या वेळीं तिला व तिच्या भावी संततीला आपल्या मुंबईतील ‘ कमाई ’चा भाग देऊन येतो,

व मग हे घाणेरडे रोग निर्दोषी व निष्कलंक अशा बायकामुलांत सारखे फैलावत जातात.

राष्ट्राच्या आरोग्याची, सपत्तीची व नीतिमत्तेची धूळधाण करणाऱ्या या वेश्याव्यवसायाला आळा घालण्याचे प्रयत्न सर्व राष्ट्रात चालू आहेत. १८७५ मध्ये जेव्हां (First International Federation for The Abolition of State Regulation of Vice) अनीतीवर सरकारी नियंत्रणें घालण्याला विरोध करणारे आंतरराष्ट्रीय संमेलन भरले, तेव्हां हा प्रश्न साऱ्या जगापुढे एक जागतिक बिकट प्रश्न म्हणून प्रामुख्याने प्रथम आणला गेला. जोसेफाइन बटलर व मि स्टेड यांनी, राष्ट्रांनी वेश्याव्यवसायावर म्हणून घातलेले निर्बंध एकतर्फी असल्यामुळे स्त्रियांना अन्यायकारक कसे होतात व शेवटी नियंत्रणाचा मूळ हेतु कसा व्यर्थ होतो हें प्रथम इंग्लंडांत लोकांच्या निदर्शनास आणून दिले. यूरोपमध्ये कित्येक राष्ट्रांत वेश्याव्यवसाय हा एक धदाच मानून, वेश्यागृहांची पोलिसांकडून व वैद्यकीय तपासणी, वेश्यागृहांना लायसेन्स देणें वगैरेसारखे कायदे केले गेले होते. या कायद्यांमुळे आपण वेश्याव्यवसायाला एक प्रकारची कायदेशीर मजुरी देत आहो हे या राष्ट्रांच्या लक्षांतच येत नव्हते; किंवा हे लक्षांत आले तरी वेश्याव्यवसायाला एक कायदेशीर सामाजिक सस्था बनवून स्त्री ही याप्रमाणे एक क्रयविक्रयाची वस्तु ठरवून, साऱ्या स्त्रीजातीचा आपण घोर अपमान व अन्याय करीत आहों ही जाणीव तरी त्यांना खास नव्हती. जोसेफाइन बटलरने केलेल्या धडाडीच्या आंदोलनाने जागृति होऊन इंग्लंडांतच नव्हे तर यूरोपांतही पुष्कळ राष्ट्रांत हे Contagious Diseases Acts व तत्सम दुसरे कायदे रद्द झाले. तथापि नियंत्रणे अद्याप अजिबात उठलीं नाहीत. या नियत्रणांमुळे हितकारक सुधारणा होण्याचे बाजूलाच राहून उलट जास्तच अनीति, लाचलुचपत, क्रौर्य यांची वाढ कशी होते; ही वेश्यागृहें म्हणजे केवळ मध्यस्थांना मेदा मिळण्याचे साधन, पण बिचाऱ्या वेश्यांना खुद्द किती हाल सोसावे लागतात, त्यांची अत्यंत केविलवाणी अवस्था कशी होते, याचे अत्यंत यथार्थदर्शी व हृदयस्पर्शी चित्र 'यामा' या रशियन कादंबरींत दाखवलें आहे.

यावरून हे उघड दिसते कीं, वेश्याव्यवसायाला आळा घालण्यासाठीं बाह्य नियंत्रणाचा कांही उपयोग नसून समाजाला ही कीड आंतून कोठून

तरी लागत आहे, व त्यासाठी आंतरशोधी अशा सुधारणा झाल्या पाहिजेत. हें सत्य बहुतेक सर्व पुरोगामी राष्ट्रांच्या आतां गळीं उतरलें असून, अशा आंतरशोधी सुधारणांबद्दल ठराव वर्षोवर्षी भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदांतून येत असतात. उदाहरणार्थ, पुढील कांहीं ठरावांचा उल्लेख करतां येईल.

(१) समतिवयाची मर्यादा वाढवणें : खुद्द इंग्लंडमध्यें ही मर्यादा स्त्रियांना मताधिकार मिळण्यापूर्वी दहा वर्षांची होती. याचा अर्थ असा होत होता की, दहा वर्षांच्या अज्ञान मुलीला जबरदस्ती करून, फूस लावून नेणे हा कायद्याच्या दृष्टीने गुन्हा ठरत नव्हता. संमतिवयाची मर्यादा जसजशी वाढत जाईल तसतसे अशा तऱ्हेचे गुन्हे व निर्घृण प्रकार कमी प्रमाणांत होऊन, वेश्यांची संख्या घटत जाईल.

(२) अविवाहित मातांना रक्षण देणें : कुमारिकांचे पाऊल वांकडें पडून त्यांना मातृपद प्राप्त झालें तर, उजळ माथ्याने त्यांना समाजांत फिरणें शक्य होत नाहीं; व मग उपजीविकेसाठीं त्या वेश्याव्यवसायांत पडतात. त्यांना कायद्याने योग्य संरक्षण व समाजाने दयार्द्रबुद्धि दाखवल्यास या बाजूनीं वेश्याव्यवसायांत पडणारी भर कमी होईल.

(३) अनाथ मुलांमुलींना योग्य आश्रय व सरक्षण देणें : ज्याना कोणीच त्राता नाही अशा मुलींना वेश्यांचा व्यापार करणारे, फ़ूस लावून दूर देशांत नेऊन कुंटणखान्यांत विकतात. White Slave Traffic अशी या व्यापाराला सज्ञा आहे. सरकारने या अनाथ मुलीवर आपले छत्र केले तर या 'मध्यस्थ' लोकांचा दुष्ट व्यापार बसत जाईल.

(४) शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार : शिक्षणाच्या योगानें ज्यांना कोणाचा आधार नाही, अशा स्त्रिया सुजाण होतील, त्यांना आपले हित कळायला लागेल व प्रतिष्ठितपणे त्या आपल्या पायावर उभ्या राहू शकतील. नाइलाजाने, बळजबरीने, अशरण होऊन त्या वेश्याव्यवसायांत लोटल्या जाणार नाहीत.

(५) बालदिनसरक्षक संस्था : पतितपावनाश्रमासारख्या सस्था मोठ्या प्रमाणांत काढून कळकळीने व प्रामाणिकपणें चालवणे.

परंतु हे असे ठराव सालोसाल पास करूनही वस्तुस्थितींत कांहींही फरक झालेला दिसत नाहीं. याचे कारण म्हणजे शोधक बुद्धीनें वेश्या-

व्यवसायाच्या बुडाशी जाऊन त्याची कारणपरंपरा हुडकून काढण्याचा प्रयत्न झाला नाहीं. वेश्याव्यवसायाला आळा घालण्यासाठीं भरविण्यांत येणाऱ्या परिषदांवर व त्यांच्या कार्यपद्धतीवर लेनिनने १९१३ मध्ये मोठी मार्मिक व बोंचक टीका केली आहे. तो म्हणतो, "लंडनमध्यें स्त्रिया व मुलें यांच्या अनैतिक व्यापाराचा (Traffic in Women and Children) विचार करण्यासाठी पांचवी आंतरराष्ट्र परिषद नुकतीच भरली. तेथें मोठमोठ्या अमीरउमरावांच्या स्त्रिया, बडेबडे धर्माधिकारी व उच्च पदवीवरील सरकारी हुद्देदार लोटले होते. मोठमोठ्या मेजवान्या झोडल्या, वेश्याव्यवसायाच्या निंद्य व घातक स्वरूपावर जाडीं जाडी विद्वत्ताप्रचुर प्रवचनें झालीं; आणि शेवटीं नियंत्रणाचीं कोठलीं दोन हत्यारें या सभावित शिष्टांनीं शोधून काढलीं तर धर्म व पोलिस! या अनीतिमान् स्त्रियांना धर्माधिकाऱ्यांनी धर्माचा बागुलबोवा दाखवावा व पोलिसांनीं पतित स्त्रियांवर व त्यांच्या चारित्र्यावर करडी नजर ठेवावी, म्हणजे वेश्याव्यवसायाला आळा पडलाच पाहिजे असें कांहीं प्रतिनिधींनीं छातीठोकपणें सांगितले! व सर्वांनीं माना डोलावल्या, पण दारिद्र्याची आच कमी करण्यासाठीं मजूर स्त्रियांची मजुरी वाढवावी म्हणून कोणीं सुचविले तेव्हां मात्र त्याला कुणाचाच पाठिंबा मिळना. एका प्रतिनिधीनें वेश्याव्यवसायाचीं मूलभूत कारणें म्हणून दारिद्र्य व हलाखीची परिस्थिति, मजुरांच्या कुटुंबांतील लहान लेंकरांकडून पिळून घेत जात असलेलें काम वगैरेकडे बोट दाखवून त्यांचा खल करण्यास सुरुवात केली तर सर्वांनीं आरडाओरड करून त्याला गप्प बसावयास लावलें."

हा का आंधळेपणा कीं जाणूनबुजून केलेली डोळेझांक? अप्रतिष्ठित व वाममार्गांनीं केलेले धंदेच जर प्रामाणिकपणानें केलेल्या धंद्यांपेक्षां जास्त किफायतशीर ठरूं लागले व सरकारच्या वक्रदृष्टींतूनही सुटले तर खालच्या थरांतील अडाणी जीव अधिकाधिक प्रथमोल्लेखिताकडेच वळतील यांत आश्चर्य तें काय?

१९२१ सालापासून लीग ऑफ नेशन्सने या प्रश्नांत एक महत्त्वाची आंतरराष्ट्रीय बाब म्हणून लक्ष घालण्यास सुरुवात केली. लहान मुली व आया यांच्या हितसंवर्धनाचा प्रश्न सोडवण्यासाठीं लीगनें एक (Advisory Commission) सल्लागार मंडळ नेमलें. १९३३ मध्यें लीगनें एक आंतरराष्ट्रीय कायदा

या बाबतींत पास केला व सर्व सदस्य राष्ट्रांनी तो प्रमाण मानला. या कायद्यान्वयें कोणत्याही राष्ट्रांतला माणूस, जर एकाद्या स्त्रीला अनैतिक कामासाठीं फूस लावून नेईल, विकत घेईल किंवा दूर देशांत नेऊन घालील तर त्याला जबर शिक्षा ठोठावली जाईल; मग तो कोठल्याही देशाचा नागरिक असो; व अनैतिक व्यापारासंबंधीं त्याच्या देशांत कुठलाही कायदा असो. तसेंच स्त्री सज्ञान, वयांत आलेली असली, व तिच्या संमतीनें तिला पळवून नेलेली असली, तरीही पळवून नेणाराला शासन झाल्याशिवाय राहणार नाही. लीग ऑफ नेशन्सने सर्व राष्ट्रांनी वेश्यागृहांना लायसेन्सेस् (परवाने) देण्याची प्रथा बंद करावी अशी शिफारस केली. पण आपण वर पाहिल्याप्रमाणे हे सर्व वरवरचे उपाय असल्यामुळें, वेश्याव्यवसायाच्या मुळाशी दबा धरून बसलेल्या दारिद्र्य, अज्ञान, नीतिअनीतीच्या रूढ कल्पना यांपर्यंत त्यांचा प्रवेशच होत नसल्यामुळे व्यर्थ ठरत आहेत. मि. ऑल्बर्ट लॉड्ज म्हणतो, "लीगची जग सुधारण्याची कल्पना मोठी विचित्र व हास्यास्पद आहे. एकाद्या घरमालकानें घरांतली सगळी घाण मागच्या चौकात साठवून ठेवून व घरचा दर्शनी भाग मात्र लकलकीत ठेवून स्वच्छतेचा डौल मिरवण्यासारखाच हा प्रकार आहे."

हिंदुस्थानमध्येही हीच स्थिति आहे. सामाजिक आरोग्यविषयक मद्रास रीजनल कॉन्फरन्सने (१९३५) या बाबतीत बऱ्याच सूचना केल्या आहेत. उदा०, (१) पतित स्त्रियांच्या उद्धारासाठी सार्वजनिक फंड एकत्रित करणें; (२) कार्यकर्त्या स्त्रियांना शिकवून तयार करणें; (३) पतितपावनाश्रम काढून प्रौढ स्त्रियांना शिष्यवृत्ति वगैरे देऊन शिक्षण सुलभ करणें; (४) अनैतिक व्यापारावर गबर होणाऱ्या मध्यस्थांना जबर शिक्षा ठोठावणें; (५) वेश्याव्यवसायाने सार्वजनिक आरोग्याला कसा व किती धोका पोचतो याबद्दल ज्ञान समाजांतील अगदीं खालच्या थरापर्यंत फैलावणें; (६) संसर्गजन्य रोगांना इलाज करण्यासाठीं स्वतंत्र खास क्लिनिक्स् उघडणें; (७) कामगार वर्ग व मध्यम स्थितींतल्या लोकांची वाढती मुलें (Adolescents) यांसाठीं करमणुकीच्या, व्यायामाच्या वगैरे सोयी करणे; (८) प्रचारकार्य जोरांत चालू ठेवणे (Propaganda); (९) चित्रपटांवर नियंत्रण घालणें.

हेही प्रयत्न जखमेवर बाहेरच्या बाजूने मलमपट्टी बसवण्याच्या स्वरूपाचे आहेत. आंतून कीड कुठें लागली आहे इकडे कुणीच लक्ष देत नाहीं.

बेकारांना काम देणें, अपुरी मजुरी वाढवणें, स्त्रीशिक्षणाचा प्रसार करणें, स्त्रियांवर अन्याय करणारे कायदे व रूढि यांचा नायनाट करणें या खरोखरी हव्या असणाऱ्या गोष्टीकडे कोणीच बघत नाहीं व त्यामुळे सालोसाल हजारो स्त्रिया मूळच्या निर्दोष, निष्कलक व सद्भावनाप्रेरित असूनही अनीतीच्या गर्तेकडे ढकलल्या जात आहेत. रशियामध्ये वेश्याव्यवसायाची अजिबात हकालपट्टी झाली आहे असें कळतें. तेथें सरकारनें यासाठीं काय उपाय योजले याकडे आपण लक्ष पुरवले पाहिजे. (१) रशियामध्ये जेव्हां मजूर स्त्रियाना कामावरून कमी करण्याचा प्रसंग येतो तेव्हां ज्यांना कोणाचा आधार नाही अशा स्त्रियांना कामावरून कधीही काढून टाकण्यांत येत नाहीं. (२) बेकार व कोटल्याही विशिष्ट धंद्याचे शिक्षण न घेतलेल्या स्त्रियांसाठी काम पुरवणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या सहकारी सस्था काढण्यांत येतात. (३) धंदेवाईक शिक्षण देणाऱ्या शाळांत स्त्रियासाठी कांही जागा मुद्दाम राखन ठेवण्यांत येतात व तेथे स्त्रियांना फुकट शिक्षण देण्यांत येतें; त्यायोगें स्त्रियांना विशिष्ट धंद्याचें शिक्षण घेण्यास उत्तेजन मिळते. (४) बेकार स्त्रिया व मुले यांना आश्रय देणारी अनेक सदने आहेत. (५) या विषयाच्या घातक व घाणेरड्या स्वरूपाविषयी ज्ञान कामगार वर्गात फैलावले जातें. (६) जेथे जेथे अनीतीचा फैलाव होण्याचा संभव आहे अशा मजूरवस्तीच्या ठिकाणी कडक नजर ठेवणे, कुटणगिरी करणाऱ्या मध्यस्थांविरुद्ध कडक इलाज योजणें, सांसर्गिक रोगांवर फुकट औषधोपचार करणें इत्यादि गोष्टी कसोशीनें केल्या जातात.

या उपायांवरून रशियाच्या कार्यामागील तत्त्व काय आहे हे उघड दिसते. वेश्याव्यवसायावर कडक निर्बंध घालणें, पण त्याला बळी पडलेल्या स्त्रियांना दया व मदत देणे हें तत्त्व कसोशीने पाळण्यांत येतें. अशाच प्रकारचे उपाय हिंदुस्थान सरकारने योजले पाहिजेत. खाजगी प्रयत्न आपापल्यापरी स्तुत्यच आहेत; पण नुसत्या खाजगी प्रयत्नांनी या विषयाची प्रचंड गरज भागण्याजोगी नाहीं. सरकारचा आधार व संरक्षण, आर्थिक मदत व नियंत्रण यांशिवाय खाजगी प्रयत्न व्यर्थ आहेत. शिवाय नुसते दंडणारे कायदे या बाबतींत करून भागण्याजोगें नाही. विधायक स्वरूपाचे कार्यही घडवून आणिलें पाहिजे. स्त्रीशिक्षणाचा प्रसार करणें, स्त्रियांना उद्योगधंद्यांचें शिक्षण घेण्यास उत्तेजन देणें, विधवाविवाह, विवाहविच्छेद, बालविवाहप्रतिबंध

वगैरेंबद्दल स्त्रियांना हितकारक असे कायदे पास करून, घेण्याची खटपट करणें, मजूर स्त्रियांना शिक्षणाचा प्रसार करून त्यांची आर्थिक परिस्थिति सुधारणें, पतित स्त्रियांना योग्य मार्गाला लावण्याचे प्रयत्न कसोशीनें, मोठ्या प्रमाणांत करणें व वेश्याव्यवसायावर गबर होणाऱ्या मध्यस्थांवर कडक नियंत्रणे घालणें वगैरे कार्य सरकारकडून कळकळीने झाल्यास, सबंध स्त्रीजातीवरील हा कलंक व अन्याय साफ धुऊन जाण्यास फार वेळ लागणार नाही.

---

**प्रकरण १२ वें : : :**

## .... .... कामगार स्त्रियांचा प्रश्न

आतांपर्यंत स्त्रीजीवनविषयक अनेक सामाजिक व आर्थिक प्रश्नांचा आपण विचार केला. पण ज्यांचे प्रश्न आतांपर्यंत चर्चिलेल्या प्रश्नांहून अगदीच निराळे व जास्त तीव्र स्वरूपाचे आहेत, अशा एका स्त्रीजगाच्या फार मोठ्या विभागाचा विचार केल्याशिवाय स्त्रीजीवनविषयक कुठलेही पुस्तक किंचिदंशींही पुरें होणार नाहीं. जे प्रश्न ' स्त्रियां 'चे म्हणून आपण वरचेवर हाताळतों ते प्रश्न बहुतेक मध्यम वर्गातील स्त्रियांचे असतात. पण हिंदुस्थानांतील शेकडा ऐंशी स्त्रिया मजूर वर्गातील आहेत असें म्हणण्यास हरकत नाही. त्यांच्याशी वर उल्लेखिलेल्या ' स्त्रियां 'च्या प्रश्नांचा काडीमात्र सबंध येत नाही. स्त्रियांना वारसाहक्क असावा असें आपण प्रतिपादतों; पण जेथें " आजचा दिवस कसा तरी गेला, पण उद्यांची भ्रांत " अशी स्थिति आहे, तेथें वारसाहक्क मिळाला तरी तो घेऊन काय करावयाचें आहे ? कागदोपत्रीं स्त्रियांना आर्थिक स्वातन्त्र्य मिळाले, तरी कामच नसल्या-मुळें इच्छेविरुद्ध जेथें बेकार पडून राहावे लागते तेथें आर्थिक स्वातन्त्र्याच्या तोंडच्या गप्पांचा काय उपयोग? रोजच्या जीवनकलहांत झगडतां झगडतां समान हक्क, आचारस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य इत्यादि वायफळ—त्यांच्या दृष्टीनें—गोष्टींचा विचार करण्यास कामगार स्त्रियांस सवडच नसते.

कामगार स्त्रियांच्या प्रश्नांची अल्प रूपरेखा या प्रकरणांत देण्याचें योजिलें आहे. कामगार स्त्रियांचे प्रश्न हे बहुतांशीं कामगार पुरुषांचेही प्रश्न आहेत. हा स्त्रीविरुद्ध पुरुष असा लढा नसून, कामगार विरुद्ध मालक व भांडवलशाही असा आहे. त्यामुळे स्त्रीकामगारांच्या प्रश्नांची अर्थशास्त्राशीं गुंतागुंत झालेली असते. सामाजिक दृष्टया लिहिलेल्या या पुस्तकांत कामगार स्त्रियांच्या प्रश्नांचें तात्त्विक विवेचन करणें शक्य नाहीं; पण शक्य तितकें सर्वसाधारण दृष्टया विवेचन थोडक्यांत करण्याचा प्रयत्न केला आहे.

कामगार स्त्रियांच्या व पुरुषांच्या प्रश्नांची तीव्रता हिंदुस्थानखेरीज इतर देशांतही चांगलीच जाणवत आहे. पाश्चात्य देशांतील कामगार चळवळीचा उद्‌गम व इतिहास *Our Cause* मध्यें कमला चतर्जी यांनी ' उद्योगधंदे व स्त्रिया ' या लेखांत थोडक्यांत दिला आहे. औद्योगिक क्रांती-( Industrial Revolution ) नंतर पाश्चात्य देशांत घरगुती धंदे बंद पडले; यंत्रांचा प्रसार होऊन मोठमोठे कारखाने शहरांतून निघाले; खेडेगांवांतून शेतीवाडी करून बायकांमुलांसह सुखानें नांदणारे लोक रोख मजुरीच्या आशेने शहरांकडे धांव घेऊं लागले, हळुहळू कारखानदार मजुरांच्या जिवावर गबर होऊं लागले व भांडवलशाहीचें प्रस्थ दिवसेंदिवस वाढूं लागलें. ज्या मजुरांच्या निढळाचा घाम गाळून आपण इतका पैसा केला, त्या मजुरांना आपल्या अफाट फायद्याचा अल्पस्वल्प भाग वाढत्या मजुरीच्या रूपानें द्यावा, ही सुबुद्धि भांडवलवाल्यांना वेळीच आठवती तर मजूर-मालक हा लढा कधी उपस्थितच झाला नसता. पण मजुरांचे सुख पाहण्याऐवजीं उलट कारखानदार थोडया पैशांत मजुरांकडून जास्तींत जास्त काम कसे उकळून घ्यावें यासाठी नाना शक्कली लढवूं लागले. कामाचे तास अनिवार वाढवणें, कामाच्या मानानें फार थोडी मजुरी देणें, कारखान्यांतील स्वच्छता, आरोग्य, सुखसोयी वगैरेंवर शक्य तितका कमी पैसा खर्च करणें इत्यादि नाना हिकमतींनीं आपला व्यय थोडा व्हावा व नफा मात्र सपाटून कमवावा असें धोरण भांडवलवाल्यांनीं ठेवलें. स्त्रिया व मुलें यांना कामावर घेण्याची प्रथा गिरणीमालकांच्या या काटकसरीच्या धोरणामुळेंच प्रथम पडली असावी. स्त्रिया या बहुशः पोटासाठीं स्वतःच्या कामावर सर्वस्वीं अवलंबून नसल्यामुळे, त्यांचे आईबाप किंवा नवरा घरांत मिळवत असल्यामुळे थोडया मजुरीवर काम

करण्यास कबूल होत. स्त्रियांचा मजुरीवर जाण्याचा हेतु, प्रारंभीं कौटुंबिक मिळकतींत जरा भर पडावी किंवा तशा भरीची जरूर नसल्यास स्वतःच्या छानछोकीवर व चैनीवर खर्च करावयास स्वतःचा असा निराळा पैसा असावा एवढाच असे. कारखानदारांना हे आणखी एक फायद्याचें कलम सांपडलें. पुरुषांच्या एवढेंच काम थोडया पैशांत स्त्रियांकडून करून घेतां येते हें पाहून जास्त जास्त स्त्रिया कामावर घेण्यास गिरणीमालकांनी सुरुवात केली. घरचे पुरुषही कारभारणीच्या अल्पस्वल्प मिळकतीच्या आशेने त्यांना कामावर खुषीनें पाठवीत; पण पुढें पुढें जास्त स्त्रिया कामावर गेल्यामुळे पुरुष बेकार राहूं लागले. कामगार स्त्रियांनी आपल्या तोंडची भाकरी काढली असे साहजिकच पुरुष मजुरांना वाटून, ते स्त्रियांवर जळफळूं लागले; याप्रमाणें भांडवलशाहीच्या कारवाईनें स्त्री विरुद्ध पुरुष कामगार असा कृत्रिम लढा मजूरवर्गांत उभा झाला. काम भराभर मिळूं लागल्यामुळें कामगार स्त्रिया प्रथम संतुष्ट असत; पण पुढे कांही दिवसांनीं मजुरीच्या बाबतीत मालक आपणावर अन्याय करीत आहेत हें स्त्रीकामगारांच्या लक्षांत येऊन त्यांच्यांत असंतोषाचा प्रादुर्भाव होऊं लागला. स्त्रियांचे काम पुरुष कामगारांपेक्षां कुठल्याही दृष्टीनें कमी दर्जाचें नसतां त्यांना मजुरी मात्र कमी मिळते, ही पहिल्यापासून पडलेली अनिष्ट प्रथा पालटण्यास कारखानदार कबूल नाहींत, हे पाहून स्त्रियांनीं बंडाचें निशाण उभारलें. स्त्री व पुरुष कामगार याप्रमाणे मालकांविरुद्ध निर-निराळ्या दिशेनें चळवळ करूं लागले.

औद्योगिक क्रांतीनें पाश्चात्य देशांच्या सामाजिक जीवनांत जेवढे गंभीर स्वरूपाचे फेरफार घडून आले, तेवढे कदाचित् हिंदुस्थानांत आले नसतील. हिंदुस्थान हा पूर्वींपासूनच व आजही बहुतांशी कृषिप्रधान व ग्रामीण देश आहे, तरी पण हिंदी सामाजिक जीवनालाही औद्योगिक क्रांतीचा धक्का बसल्याशिवाय राहिला नाहीं. औद्योगिक क्रांतीचा उदय होऊन शहरांतून गिरण्या उघडल्याबरोबर, हिंदुस्थानांतील खेडुतांनीं शहराकडे धांव घेण्यास सुरुवात केली, व त्यामुळें एकत्र कुटुंबपद्धतीवर उभारलेले ग्रामीण जीवन विस्कळित झाले. हिंदुस्थानांतील लहान लहान खेडीं हीं इंग्रजी अंमल येई-पर्यंत जशीं कांहीं स्वतंत्र छोटीं राज्येंच होती. खेडयांतील लोकांच्या गरजा खेडयांतल्या खेडयांतच भागत असल्यामुळें, तीं पूर्ण स्वायत्तता अनुभवीत

होतीं. या स्थानिक छोटया स्वराज्यांत प्रत्येक एकत्र कुटुंब हा एक स्वतंत्र स्वायत्त घटक असे. हिंदुस्थानावर परसत्तेच्या अनेक लाटा आल्या व गेल्या, पण या खेडेगांवांची शांतता, सुव्यवस्था व स्वायत्तता कधींच ढळली नाहीं; त्यांच्या संथ जीवनाला कधींच धक्का लागला नाही. इंग्रजी राज्याचा आरंभ झाला आणि हे सारें बदललें. रेल्वेचे लांब हात खेडोपाडीं पोचून, तेथील एकांतिक जीवन लोपून गेलें. साध्या गरजा आपापसांतच भागवणारें साधे जीवन शहरी भपक्याच्या वासाने कलंकित झाले. घरचे सारे पुरुष शहराच्या दिखाऊ व चैनी जीवनाच्या मोहानें शहरांकडे धांवले; एकत्र कुटुंब-पद्धति नामशेष झाली. बाहेरचा, गिरण्यांतून यंत्रांवर निघणारा, जास्त आकर्षक व स्वस्त माल खेडेगांवांतून येऊं लागला, खपूं लागला व यामुळे घरगुती धंदे बसले व त्यांतील बेकार झालेले लोकही शहरांकडे वळले. आर्थिक घडामोडींत धान्यांचे भाव घसरले व शेतींत पूर्वीसारखी किफायत होईनाशी झाली. याच सुमारास दळणवळणाच्या सोयीसाठीं सरकारने रेल्वे, रस्ते करणें किंवा इतरत्र पाटबंधारे बांधणे, खाणी खोदणे, जंगल तोडणे, मळे करणे अशीं कामे काढली. या कामांत मिळणारी मजुरी ही शेतांतील फायद्यापेक्षां जास्त निश्चित व किफायतशीर वाटल्यामुळे, शेती टाकून शेतकऱ्यांनीं मजुरी जीवन पत्करले. कधी कधी या मजुरांचीं बायकापोरेंही त्यांच्या पाठोपाठ जात व त्यांच्या मजुरीच्या जागी मिळेल तशा जागांतून पडेल ते काम करून राहात. याप्रमाणे पूर्वीचे कृषिप्रधान, ग्रामीण, संथ, शांत, स्वस्त व आरोग्य-दायक जीवन लोपून शहरांतले भगभगीचे, रोगग्रस्त, महाग, मोहक पण परिणामीं घातक असे जीवन निर्माण झाले. पहिल्यांदां या मजुरांचे जीवन फारच कष्टमय होतें. कामाचे तास फार, राहायची जागा अपुरी व कमालीची वाईट; रोजच्या व्यवहारांत माणुसकीचा गंध नाहीं असे दिवस मजुरांनी प्रथम काढले; नंतर १९१४ सालीं लढाई सुरू झाली. उद्योगधंदे बेसुमार वाढले; कारखानदारांचे मजुरांवाचून चालेनासे झाले. मजुरांनाही आपले स्वतःचे, उद्योगधंद्यांतील महत्त्व व स्थान कळून चुकले. जास्त सवलती मिळवण्या-साठीं संपाचे हत्यार उपसण्याची कला ते याच सुमारास शिकले. कारखानदार गरजू असल्यामुळें जरा जरा नमतें घेऊं लागले; पण मालक–मजुरांमधील लढा वाढतच गेला व इतर देशांप्रमाणे हिंदुस्थानांतही हा एक कायमचा

गुंतागुंतीचा प्रश्न होऊन बसला. लढाई संपली व लौकरच जागतिक मंदीचे कठिण दिवस सुरू झाले. मजुरांचा प्रश्न हा आंतरराष्ट्रीय प्रश्न बनला. इतर देशांप्रमाणें हिंदुस्थानांतही मजूरहितसंरक्षक असे कायदे पास झाले. १९२२ चा Factory Law Amendment Act, १९२३ चा The New Mines Act, The Workmens Compensation Act आणि १९२६ चा Trade Union Act हे कायदे त्यांपैकीच होत. १९३१ मध्ये बाहेर पडलेल्या The Royal Commission on Indian Labour च्या रिपोर्टमध्येही मजूर-हितसंरक्षक असे अनेक कायदे सुचवण्यांत आले.

हिंदुस्थानातील एकदर मजूरवर्गांत स्त्रियांचे प्रमाण काय आहे व त्यांचे वैयक्तिक प्रश्न कोणते आहेत, हें कमला चतर्जी याच्या वर उल्लेखिलेल्या लेखांत सविस्तर दिले आहे. एकदर हिंदी मजूरवर्गांत स्त्रियांचे प्रमाण फारसें मोठें नाहीं. १९२२ साली सुमारें ५१४४ गिरण्यांतून जवळजवळ १३॥ लक्ष मजूर काम करीत होते व त्यापैकी २ लक्ष स्त्रिया होत्या. १९२९ मध्ये ८१२९ गिरण्यांतून काम करीत असलेल्या १५॥ लक्ष मजुरांपैकी २॥ लक्ष स्त्रिया होत्या. १९३२ मध्ये ८२४१ कारखान्यांतील १४ लक्ष मजुरांपैकीं २। लक्ष स्त्रिया होत्या. या आंकड्यांवरून असे दिसून येते की, १९२९ पर्यंत गिरणींतील मजूर स्त्रियांची सख्या झपाट्याने वाढत होती; पण नतर तिला उतरती कळा लागली. या कमी होणाऱ्या सख्येची अनेक कारणे सांगतां येतील. एक तर जागतिक आर्थिक मंदीमुळे सगळीकडेच बेकारी वाढली आहे; दुसरे स्त्रियांना 'सरक्षण' अनेक नवीन कायद्यांअन्वये अलीकडे दिले जात असल्यामुळे (रात्रीचे काम न करणे, जास्त कष्टाचे न करणे, वगैरे), स्त्रियांना काढून पुरुषांनाच कामावर ठेवणे कारखानदारांना किफायतशीर वाटू लागले आहे. आतां विशिष्ट धंद्यांतून काम करणाऱ्या स्त्रियाची काय स्थिति आहे ती पाहूं.

प्रथम खाणीत काम करणाऱ्या मजूर स्त्रियांची सख्या बरीच होती. पण १९२९ मध्ये स्त्रियांना भूगर्भांत, खोल जमिनीत काम करण्याची, हळुहळू बंदी करण्यांत यावी असा कायदा पास झाल्यामुळे, स्त्रियांची या धंद्यांतील संख्या ओहोटीस लागली. १९३६ सालापर्यंत एकही स्त्री खाणींत काम करणारी राहणार नाहीं असा त्या वेळच्या आंकड्यांप्रमाणें अंदाज बांधला होता. स्त्रियांच्या हितासाठीं हा कायदा दयाळू सरकारनें केला खरा. भूगर्भांत

ओलसर, कोंदट, अंधाऱ्या जागी काम केल्यानें स्त्रियांच्या प्रकृतीस अपाय होई खरा; पण तें काम बंद केल्यावर त्याऐवजी त्या मजूर स्त्रियांना दुसरें काम देण्याची व्यवस्था सरकारने न केल्यामुळे या बिचाऱ्या स्त्रियांची तोंडची भाकरी ओढल्याप्रमाणे झाले आहे. उपाशी मरण्यापेक्षां खाणींत प्रकृतीची खराबी झालेली बरी, असे या स्त्रियाना वाटत असल्यास कांही आश्चर्य नाहीं.

चहा, कॉफी, रबर, सिंकोना यांच्या मळ्यांत काम करणाऱ्याही बऱ्याच मजूर स्त्रिया आहेत. मळ्यांवर एक प्रकारें जास्त सुख मजूर स्त्रियांना असते. मळ्यावर सबंध कुटुंबच्या कुटुंब एका ठिकाणी काम करूं शकतें. नाहीं तर गिरणीत काम करणाऱ्या मजुरांच्या बायकामुलांना त्याच गांवांत काम मिळतेच असे नाही; त्यामुळे मजुरांना आपलीं बायकामुले गांवी ठेवून यावे लागते. गिरणीतल्या हाडें मोडून काढणाऱ्या कामानतर विश्रांतीसाठीं घराकडे वळण्याची सोय नसल्यामुळे व इतरत्रही निरुपद्रवी करमणुकीच्या सोयी उपलब्ध नसल्यामुळे हे मजूर गुत्त्याकडे साहजिकच वळतात, व आपल्या प्रकृतीची, पैशाची व नीतिमत्तेची धूळधाण करून घेतात. गांवी असलेलीं बायकामुलें त्यांच्या नांवाने खडे फोडीत उपाशी मरतात. मळ्यावर, कुटुंब असें विस्कळीत होऊन त्याची दुर्दशा तरी होत नाहीं. तेथें सर्वांना हमखास काम मिळते. शिवाय खेडेगांवांतून आलेल्या या लोकांना खेडेगांवचें मोकळे वातावरण, शुद्ध हवापाणी व शेतीवाडीचा आनंद मळ्यावर उपभोगावयास मिळतो. एके काळीं मळ्यांतील मजुरांचे मळेवाल्यांकडून अमानुष हाल होत असत व मजूर कामावर अगदीं पिळून निघत असत; पण अलीकडे ही स्थिति बदलून बरेच मजूर सुखी झाले आहेत, व या धंद्यांत काम करणाऱ्या स्त्रियांचे प्रमाण फार मोठें आहे.

याशिवाय इतर अनेक धंद्यातून पुष्कळ मजूर स्त्रिया काम करीत आहेत. धातूच्या खाणी, लांकूडकाम, धातूचे नक्षीकाम, मातीकाम, रेल्वेरस्ते वगैरेंचे काम, लोकर, रेशीम वगैरे धंदे (Textiles), कापसाच्या गिरण्या, रंगकाम, छापखाने, लेसकाम, कातडी कमावणें, रासायनिक द्रव्यें तयार करणें, खाद्यपेयें तयार करणे, तांदूळ सडण्याच्या गिरण्या, तेलाचे कारखाने, इमारतींचे बांधकाम, विजेचे कारखाने वगैरे धंद्यांत अनेक स्त्रिया गुंतलेल्या आहेत. यांपैकीं कांहीं थोडे सोडून बाकी बहुतेक धंद्यांतून स्त्रीमजुरांची संख्या कमी

होत चालली आहे असे उपलब्ध आंकड्यांवरून दिसतें. कांहीं विशिष्ट धंद्यांचा कालमानानें होत असलेला ऱ्हास व आर्थिक मंदी हीं बेकार पुरुषां-प्रमाणें बेकार स्त्रियांच्याही वाढत्या संख्येचीं कारणें असावीत. परदेशी मालाच्या स्पर्धेचाही देशी धंद्यांवर परिणाम होऊन बेकार मजुरांची संख्या वाढत जाते. स्वदेशी धंद्यांना सर्व नागरिकांनीं सक्रिय पाठिंबा दिल्यास पुष्कळच बेकार स्त्री व पुरुष मजुरांच्या तोंडीं अन्न घातल्याचें श्रेय त्यांना मिळेल. याच कारणासाठीं सालोसाल स्वदेशीच्या तत्त्वाचा उच्चार व पुरस्कार अखिल भारतीय महिला परिषदेनें केला आहे.

याप्रमाणें स्त्रीमजुरांची संख्या दिवसेंदिवस कमी होत असली तरी एकंदर धंद्यांतून काम करणाऱ्या स्त्रीमजुरांचें प्रमाण अगदींच उपेक्षणीय नाहीं. तेव्हां त्या स्त्रिया ज्या परिस्थितींत काम करतात त्या परिस्थितीचा अभ्यास करून तींत सुधारणा करण्याचा प्रयत्न करणें हे प्रत्येक समाजसुधारकाचें व समाजसेवकाचें महत्त्वाचें कर्तव्य आहे.

स्त्रीमजुरांच्या अडचणी व दुःखें ही बहुतांशी पुरुषमजुरांचीही आहेत हे आपण वर पाहिलेंच. तरीही त्यांतील कांही दुःखें स्त्रियांना विशेष जाचक अशीं आहेत. प्रथम ज्या तऱ्हेनें स्त्रीमजूर कामावर घेण्यांत येतात ती तऱ्हाच चुकीची व घातक आहे. गिरणीचा मॅनेजर जातीनें मजूर कामावर न घेतां जॉबर, मुकादम किंवा सरदार यांच्या मध्यस्थीने घेतो. यामुळे मजुरावर पुष्कळ अन्याय होतो; लाचखाऊपणा माजतो, पुढें पुढें करणारांना फावतें व गरीब, भिडस्त, प्रामाणिक लोक बेकार राहतात. स्त्रियांना कामावर घेणाऱ्या 'स्त्री जॉबर्स' ऊर्फ 'नायकिणी' या बरेच वेळी अत्यंत संशयास्पद शीलाच्या असतात; व त्यामुळे पोटासाठी मजूर स्त्रियांवर कधी कधी फार लाचारीचे व कठिण प्रसंग येतात. ही घातक चाल मुंबईच्या पुष्कळ गिरण्यांतून मोडण्यांत आली आहे. जॉबर व नायकिणीचें अजिबात उच्चाटन करून प्रत्यक्ष मॅने-जरशी स्त्री व पुरुष मजुरांचा व्यवहार ठेवण्याची पद्धत सार्वत्रिक होणें अत्यंत जरूर आहे. Royal Commission of Labour ने अशी शिफारस आपल्या रिपोर्टांत केली होती. शिवाय जेथें बऱ्याच मोठ्या प्रमाणांत स्त्रिया कामावर ठेवण्यांत येतात, तेथें एकादी सुशिक्षित जबाबदार स्त्री इन्स्पेक्टर मोठ्या वेतनावर (लांच खाण्याचा मोह पडण्याची वेळच येऊं नये म्हणून)

नेमली पाहिजे; म्हणजे स्त्रीमजुरांना योग्य सरक्षण व जरूर त्या सवलर्त सौकर्यानें मिळतील. तसेच स्त्रीमजूर प्रत्यक्ष कामावर घेऊन तिचें नांव पगाराच्या तक्त्यावर न लावतां तिला दुसऱ्या मजुराच्या हिश्श्यांत कामाव घेणे व त्या मजुराच्या पगारांतून तिचा पगार भागवणे ही दुसरी एक अनेव गिरण्यांतून प्रचलित असलेली अनिष्ट चालही मोडली पाहिजे.

स्त्रीमजुरांच्या हितसंरक्षणासाठी इंग्लंडांतल्याप्रमाणे मध्यवर्ति संस्थ येथेंही निघाल्या पाहिजेत. बडोद्याच्या श्रीमत महाराणी चिमणाबाईसाहेब गायकवाड यांनी आपल्या "*The Position of Women in Indian Life*" या अत्यंत उत्कृष्ट पुस्तकामध्ये, इंग्लंडमध्ये स्त्रीपुढारी काय काय योजना मजूर स्त्रियांच्या हितासाठी करतात याविषयी माहिती दिली आहे प्रथम म्हणजे पुरुष कामगारांप्रमाणेच स्त्रियांचेही तेथ Trade Unions किंवा कामगारसंघ आहेत. पहिल्यांदा स्त्रियांना या Trade Unions चे महत्त्व पटले नव्हते; व पूर्वी सघाचे सदस्य होण्यास त्यांना परवानगीही नसे पण आतां Trade Unions चीं द्वारे त्यांना खुलीं झालीं असून त्यांचे महत्त्वह त्यांना पटले आहे. सध्या सघांच्या पुरुषसभासदांपेक्षां स्त्रीसभासदांचीच संख्या जास्त आहे असे आढळून येईल. लडनमध्ये The Women's Trade Union League या संस्थेची मुख्य कचेरी आहे. त्याचे सर्व काम स्त्रियाच बघतात. संघाच्या सेक्रेटरी व कार्यवाही मंडळ सबंध देशभर नवीन संघाच्य शाखा उघडणे, सभा भरवून, पत्रके छापून मतप्रचार व जागृति करणे वगैरे कार्य करतात. तसेच मजुरांच्या दुःखांचा विचार करून ती दूर करण्यासाठी चळवळ करणे, स्त्रीमजूरहितसरक्षक कायदे पास करून घेणे, स्त्रीमजुरांना कायदेशीर सल्लामसलत देणे वगैरे कामेही होतात. मजुरीचे तास कमी करून मजुरी वाढवून घेणे हे या सघांचे मुख्य ध्येय आहे.

स्त्रीमजुरांच्या हिताविषयी कळकळ बाळगणारी दुसरी संस्था म्हणजे (Women's Industrial Council) महिलाऔद्योगिक मंडळ. याचा उद्देश व ध्येय सर्व कामगार स्त्रियांत संघटणा करणे, मजूर स्त्रियांत शिक्षणाचा प्रसार करणें व त्यांच्याभोवतींच्या परिस्थितींत सुधारणा घडवून आणणे. स्त्रीमजुरांना ही संस्था फुकट कायदेशीर सल्ला देते व 'फॅक्टरी ॲक्टस्' एकाद्या गिरणी मालकानें मोडले असल्यास त्याची चौकशी करून योग्य तो बदोबस्त करते

कामगार स्त्रियांना उपयोगी अशा प्रश्नांवर ही संस्था वाङ्मय प्रसिद्ध करते, लहान सुटसुटीत पत्रके छापून वाटते व प्रचलित कायद्यांची माहिती पुरवते. या संस्थेचे निरनिराळे पोटविभाग आहेत. कार्यकारीसमिति, शिक्षणसमिति, चौकशीसमिति, कायदेसमिति, क्लब कमिटी, प्रसिद्धि कमिटी, ट्रेनिंगस्कूल कमिटी, सल्लागार मंडळ वगैरे अनेक शाखांत काम विभागण्यांत येते. सर्व शाखांच्या प्रमुख स्त्रियाच असतात. या शाखांतून शाळा उघडणे, क्लब काढणे, सभा भरवणे वगैरे निरनिराळीं कामे होतात.

The National Union of Women Workers of Great Britain and Ireland Affiliated to The International Council of Women ( आंतरराष्ट्रीय स्त्रीमंडळाला जोडलेली ग्रेट ब्रिटन व आयर्लंड मधील स्त्रीकामगारांची राष्ट्रीय समिति. ) ही आणखी एक स्त्रीहित-संरक्षक संस्था आहे. ही संस्था ठिकठिकाणी स्त्रीसंघ काढणे, स्त्री-मजुरांना जरूर ती माहिती पुरवणे वगैरे कार्य करते; प्रतिवार्षिक एक मोठी कॉन्फरन्स भरते व कामगार स्त्रियांच्या श्रमाविषयीच्या सुखदुःखांचा विचार केला जातो. या संस्थेच्याही निरनिराळ्या कमिट्या असतात. प्रचारकमिटी, आर्थिक प्रश्नांना वाहिलेली समिति, कायदेकानूचा विचार करणारी कमिटी, आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा विचार करणारी कमिटी, मुलांचे क्लब काढणारी कमिटी, रोगप्रतिबंधक व रोगनिवारक कमिटी, शिक्षण कमिटी वगैरे.

याप्रमाणे स्त्रीमजुरांची स्थिति सुधारण्यासाठी चळवळ व कार्य बाहेरून चालविलें पाहिजे. तसेंच पाश्चिमात्य देशाप्रमाणे खुद्द गिरण्यांतूनही निरनिराळे फंड ठेवण्याची व्यवस्था केली पाहिजे. उदाहरणार्थ, बेकारीच्या दिवसांत मदत म्हणून (Unemployment Benefit Fund) प्रत्येक मजुराच्या पगाराचा कांहीं भाग या फंडासाठी कापून घ्यावा व या निधीमध्ये गिरणी मालकानें बरोबरीनें किंवा जास्तच स्वतःच्या पदरची भर घालावी. असे निधि प्रत्येक गिरणीमध्ये कायद्याने सुरू केल्यास बेकार स्त्रीपुरुष व त्यांचीं बायकामुलें उपाशी मरणार नाहीत. सध्यां जागतिक आर्थिक मंदीमुळे मजूरवर्गात बेकारी व कामाचा अनिश्चितपणा फार वाढला आहे. अशा वेळी अशा निधींचा अमोल उपयोग आहे. तसेंच आजारीपणामुळे रजेवर असतांना उपयोगी

पडणारा निधि, गिरणीच्या यत्रांत सांपडून एकादा अवयव निकामी झाल्यास नुकसानभरपाई करणारा निधि वगैरे निधीही ठेवले पाहिजेत.

Indian Factories Act, हा सर्व धंद्यांतील स्त्रियांना लावला पाहिजे; म्हणजे त्यांचे कामाचे तास योग्य प्रमाणांत राहतील. दुसरी महत्त्वाची सुधारणा म्हणजे स्त्रियांची मजुरी पुरुषांप्रमाणेच समान कामाला समान असावी. या महत्त्वाच्या हक्कासाठी इग्लंडमधील स्त्रियांना कसा झगडा करावा लागला हा इतिहास हिंदी स्त्रियांस उद्बोधक होण्यासारखा आहे.

इग्लिश स्त्रियांमध्ये जागृति होण्यापूर्वी इग्लिश स्त्रियांना मुळी काम करण्याचाच हक्क नव्हता (Right to Work); मग त्या कामाबद्दल समान द्रव्य मिळण्याचा प्रश्न बाजूलाच राहिला! समान शैक्षणिक हक्क मेरी वोल्स्टन क्राफ्टसारख्या स्त्रिया मागत होत्या. समान नैतिक हक्कासाठीं जोसे-फाइन बटलर झगडत होती; याच वेळीं स्त्रीपुढाऱ्यांच्या लक्षांत ही गोष्ट येऊन चुकली की, सामाजिक, शैक्षणिक, राजकीय या प्रत्येक बाबतींत समान दर्जा प्राप्त होण्यास प्रथम आर्थिक समान हक्क मिळवले पाहिजेत. जेव्हां काम करण्याचा हक्क व संधि समान प्रमाणांत स्त्रीपुरुषांस मिळेल त्याच वेळीं स्त्रीपुरुषांचा दर्जा समान होईल. इग्लंडांत औद्योगिक क्रांति होण्यापूर्वी देशाच्या आर्थिक जीवनांत स्त्रियांस निश्चित असे स्थान अल्प स्वरूपांत का होईना पण असेच. घरगुती धंदे, शेतीकाम यांत स्त्रियांचा बराच भाग असे. परंतु सतराव्या शतकापासूनच सूत कातणें, विणणें, कातडी कमावणे वगैरे घरगुती धंदे दुकानांतून तज्ज्ञांच्या हातांत जाऊं लागले होते. एकोणिसाव्या शतकापर्यंत सर्व धंद्याची घरांतून कायमची हकालपट्टी झाली व मध्यम स्थितींतल्या बायका श्रीमंत, चैनी, निरुद्योगी बायकांप्रमाणें निरुद्योगी, परावलंबी व निःसत्त्व जीवन कंठू लागल्या. समाजास अधोगतीला पोंचवणारा या निरुद्योगी, परावलंबी, बायकांसारखा दुसरा वर्ग नाहीं; परंतु विसाव्या शतकांत स्त्रियांत हळुहळू जागृति होऊं लागली. व्यापक शिक्षण व नागरिक-त्वाचे हक्क यांच्या मागणीबरोबर काम करण्याचा हक्क (Right to Work) व संधि पुरुषांच्या बरोबरीनें मिळवण्याची भाषा सुरू झाली. डॉक्टर, वकील, शिक्षक, लेखक, अभिनेता वगैरेंचे धंदे पुरुषासारखेच यशस्वितेनें करून दाखवण्याची महत्त्वाकांक्षा स्त्रिया धरूं लागल्या. जागतिक महायुद्धानें

(१९१४-१९१८) स्त्रियांना हवी असलेली संधि मिळाली व एंजिनियर, रजिस्ट्रार, बँकर, पशुवैद्य, शर्यतींतील जॉकी—वगैरे चट सारे धंदे त्या पुरुषांच्या बरोबरीनें करूं लागल्या. आत्मविश्वास, स्वातंत्र्य, स्वावलंबित्व, याचें वारें स्त्रियांच्या अंगांत खेळूं लागलें. 'काम' करण्यांत त्यांना अपूर्व आनंद वाटूं लागला.

पण कारखान्यांत शिरून मजूर बनलेल्या स्त्रियांची स्थिति मात्र इतकी समाधानकारक व हेवा वाटण्याजोगी नव्हती. त्यांना पुरुषांपेक्षां जास्त काम पडे; पण मजुरी मात्र कमी मिळे. लग्न, गर्भारपण, बाळंतपण वगैरे अडचणीमुळे स्त्रियांची हजेरी अशाश्वत असते. स्त्रियांची शक्ति पुरुषांपेक्षां कमी असल्यामुळे त्यांच्या हातून काम कमी होतें वगैरे सबबीवर गिरणीमालक त्यांना पुरुषांहून कमी पगार देत; पण काम मात्र त्यांच्याकडून सपाटून करून घेत. बायका व लहान मुले थोड्या पगारावर राबवणे त्यांना फायद्यांत पडूं लागलें व स्त्रीमजुरांची संख्या त्यामुळे झपाट्याने वाढूं लागली. याप्रमाणें स्त्रियांना काम करण्याचा हक्क व संधि मिळाली. पण आर्थिक फायदा समान प्रमाणांत होत नसल्यामुळे सुख होण्याऐवजी त्यांचे उलट हाल होऊं लागले. घरांतले काम व कारखान्यांतील काम या दुहेरी ओझ्याखालीं बिचाऱ्या स्त्रिया दडपून जाऊं लागल्या. शिवाय स्त्रियांची संख्या वाढून पुरुष मजूर बेकार होऊं लागल्यामुळे 'Black Legs' म्हणून ते स्त्रियांवर जळफळत ते निराळेंच.

एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धात स्त्रियांची शोचनीय स्थिति सुधारण्यासाठीं अनेक फॅक्टरी ॲक्टस् पास झाले. स्त्रियांना मुले व अल्पवयी मजूर यांच्या सदरांत घालण्यांत येऊन त्यांना कोणतें काम द्यावें व कोणतें देऊं नये याबद्दल अनेक नियंत्रक कायदे करण्यांत आले. हे नियंत्रक कायदे तेव्हांपासून एक मोठा वादग्रस्त प्रश्न होऊन राहिले आहेत. स्त्रियांचे कामाचे तास कमी करणें, त्यांचे रात्रींचे काम बंद करणें, त्यांच्या प्रकृतीस अपायकारक अशा धंद्यांतून व क्रियांतून त्यांस काम न देणे वगैरेसारखीं नियंत्रणें या कायद्यांनीं घातलीं. याप्रमाणे स्त्रियांचे हाल कांहीं बाबतींत कमी झाले खरे; पण आर्थिक बाजूने मात्र त्यांचा फार तोटा झाला. या नवीन नियंत्रणामुळे स्त्रियांची मजुरी, गिरणीमालकांना पूर्वींसारखी फायद्यांत पडेनाशी झाली, म्हणून त्यांनीं आणखी कमी केली. उपजीविकेपेक्षां लग्न होईपर्यंत कांहीं

चाळा म्हणून स्त्रिया मजुरी करूं लागल्या; त्यामुळे साहजिकच कौशल्याच्या (Skilled Labour) व चांगल्या मजुरीच्या कामांत त्यांना प्रवेश मिळेनासा झाला. खालच्या दर्जाच्या यांत्रिक कामांत कमी मजुरीवरच त्यांना अवलंबून राहावे लागले.

स्त्रीपुढाऱ्यांच्या लक्षांत ही गोष्ट आली व तेव्हापासून या प्रश्नावर स्त्री-पुढाऱ्यांचे व स्त्रीकैवाऱ्यांचे दोन गट झाले. एका पक्षाच्या मताप्रमाणें अशा नियंत्रक कायद्यांची स्त्रियांच्या हिताच्या दृष्टीने जरूर असून, त्यापासून स्त्रियांचें कांहीं नुकसान होणार नाही (Protectionists); व दुसऱ्याच्या मताप्रमाणें अशीं नियंत्रणे संरक्षणासाठी मागणे किंवा वापरणे म्हणजे स्त्रियांनी आपल्या खाल-च्या दर्जाची व कमी लायकीची कबुलीच देणे आहे. तेव्हां ‘संरक्षण’ न मागतां पुरुष ज्या परिस्थितीत काम करतात त्याच परिस्थितीत त्यांच्या बरोबरीने काम करून, स्त्रियांनी पुरुषांच्या बरोबरीने हक्कानें पगार घ्यावा (Equalitarians). या पक्षाने, यापुढे जेव्हां जेव्हां नियत्रक कायदे सुच-वण्यांत येतात, तेव्हां तेव्हां त्यांना विरोध करून, नियंत्रण किंवा सरक्षण द्यायचे तर ते स्त्रीमजूर व पुरुषमजूर यांना समसमान द्यावे, अशी मागणी करण्यास सुरुवात केली आहे.

याच ठिकाणीं रशियामध्ये मजुरांच्या नदनवनामध्ये स्त्रियांचे बाबतीत कसे कायदे आहेत व त्यांना काय सवलती दिल्या जातात यांविषयीं विचार करणे अप्रस्तुत होणार नाही. (*The Position of Women in the U. S. S. R.* या G. N. Serebrennikor यांनी लिहिलेल्या पुस्तकांत याबद्दल पुढील माहिती सांपडते.) सोव्हिएट स्टेटचा जनक लेनिन याचे स्त्रियांच्या प्रश्नांकडे प्रथमपासूनच फार सहानुभूतिपूर्वक लक्ष असे. गरीब-श्रीमत यांमधील भेदाप्रमाणे स्त्रीपुरुष यांतील उच्चनीचत्वाचा भेदही नाहींसा करून टाकण्याचा सोव्हिएट युनियन्नें विडा उचलला होता. झारशाहीमध्यें रशियन स्त्रीची स्थिति हिंदु स्त्रीप्रमाणेच अनुकंपनीय व हीन होती. तिला राजकीय व सामाजिक हक्क अजिबात नव्हते. संसारांत नवऱ्याच्या गुलामा-प्रमाणें ती वागविली जाई. तिला आचार, विचार, उच्चार यांत काडीचीही स्वतंत्रता नव्हती. तिची मालमत्ता पतीच्या ताब्यांत असे. बाहेर कामधंदा करावयास नवऱ्याच्या परवानगीवाचून तिला जातां येत नसे. नवरा मनाजोगा

न मिळून संसार दुःखाचा झाला तरी तिला त्याच्यांतून सुटका नसे; तिच्या मुलांवरही तिचा हक्क नसे. विवाहविषयक सर्व कायद्यांत स्त्रीचा नीच दर्जा गृहीत धरलेला असे. सोव्हिएट सरकारने हे सारे बदलले. प्रथम विवाहविषयक कायदे बदलून संसारांत व कुटुंबांत स्त्रीचा दर्जा पुरुषांच्या बरोबरीनें ठेवला; तिची मालमत्ता स्वतत्रपणे तिच्या नांवावर तिला ठेवतां येऊ लागली. राजकीय समान हक्कही—निवडून देण्याचा व निवडून घेण्याचा हक्क—स्त्रीला मिळाला; पण या दोन्ही हक्कांपेक्षां जास्त महत्त्वाचा हक्क, म्हणजे काम करण्याचा हक्क तोही स्त्रियांना मिळवून देण्याचा उपक्रम सोव्हिएटनें केला. वायफळ घरकामांत डांबून पडलेल्या स्त्रियांना बाहेरच्या मोकळ्या वातावरणांत आणून, त्यांना सर्व धंद्यांत सरकारने प्रवेश मिळवून दिला. पुरुषासारखी मजुरी करतांना स्त्रियांच्या मार्गांत उभी राहणारी मोठी अडचण जें मातृपद त्याविषयक अनेक सवलती स्त्रियांना देऊन, सरकारने स्त्रियांचा मार्ग सुलभ केला. स्त्रियांच्या प्रकृतीला अपाय होईल अशा जवळजवळ पन्नास धंद्यांतून स्त्रियांना काम करण्यास बंदी आहे. तसेच शारीरिक कष्टाचें, अत्यंत जड असें काम त्यांना दिले जात नाहीं. सर्व गिरण्यांतून हवा, प्रकाश, वगैरे आरोग्यकारक सोयी सरकारकडून सक्तीनें केल्या जातात. कामाचा दिवस सार्वत्रिक सात तासांचा आहे. सर्व कामगारांना वर्षांतून कमीत कमी दोन आठवडे तरी सुट्टी देण्यांत येते. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्त्रियांना पुरुषांइतकाच पगार समान कामाबद्दल मिळतो. स्त्रियांनाही पुरुषमजुरांप्रमाणें Social Insurance चा फायदा मिळतो. Social Insurance हा अडीअडचणीच्या वेळी बेकार असतांना मजुरांना मदत देणारा एक निधि असतो. मजुरांना त्यासाठी कांही द्यावे लागत नाहीं. गिरण्यांचे मालकच त्यांत भर घालीत असतात. स्त्रिया गर्भवती असतांना, बाळत असतांना जेव्हां कामावर जात नाहींत तेव्हां या निधींतून त्यांना मदत होते. तान्हया मुलाच्या दुधाला सुद्धां यांतून पैसा मिळतो. आजारी मजुरांना फुकट औषधोपचार याच्यांतूनच होतो. स्त्रियांना बाळंतपणाचे वेळी चार महिन्यांची रजा घ्यावीच लागते. गर्भवती व माता ही नाजूक प्रकृति असतां कारखान्यांत काम करील तर गर्भपात होण्याचा किंवा बाळंतपणानंतर नाना रोग जडण्याचा संभव असतो, हें ओळखून वरील नियम सोव्हिएटनें केला आहे. तान्हें मूल अंगावर असतांना

मातेला गिरणीत दर साडेतीन तासांनीं अर्ध्या तासाची सुट्टी मिळते व सुट्टीचा वेळ कामांत धरला जातो. रात्रींचे काम तान्ह्या मुलाच्या आईला व गर्भवतीला दिले जात नाहीं. गर्भवतीला कमी कष्टाचे काम त्या दिवसांपुरते देतात. कोणत्याही सबबीवर तिला कामावरून काढून टाकले जात नाहीं. गर्भारपणीं व बाळंतपणीं स्त्री रजेवर असतांना वरील Social Insurance च्या स्कीमने तिला भर पगाराइतकी मदत मिळत राहते.

याप्रमाणे अनेक सवलती देऊन स्त्रियांच्या मजुरीचा प्रश्न रशियाने समाधानकारक रीत्या सोडवला आहे. त्यामुळे स्त्रियांना सुख होऊन राष्ट्राचाही फायदा होतो. हिंदुस्थानातील गिरण्यांतूनही या सुधारणा सरकारी कायद्याने घडवून आणल्या पाहिजेत. विशेषतः मातांची सोय कारखान्यांतून जास्त पाहिली पाहिजे. बाळंतपणापूर्वी व नतर भर पगारी रजा व विश्रांति, तान्ह्या मुलासाठीं Creches, मुलांना पाजावयासाठी दुपारच्या सुट्टया यांची तरतूद मालकांनीं केली पाहिजे. तसेच प्रत्येक मोठ्या कारखान्याला जोडून एक इस्पितळ व त्यांत बाळंतपणाची सोय अवश्य पाहिजे. पुष्कळ औद्योगिक केंद्रांत विशेषतः मुंबईत अशा सोयी आहेत. शिवाय खाजगी रीत्या मजूरवर्गाच्या हिताकरितां चालवलेलीं हितसंरक्षक केंद्रेंही आहेत (Welfare Centres); परंतु हे खाजगी प्रयत्न सरकारी मदतीशिवाय व गिरणीवाल्यांच्या सहकार्याशिवाय केव्हांही अपुरेच पडणार.

तसेच स्त्रियांची मजुरी पुरुषांइतकीच ठेवण्याची सुधारणा तांबडतोब झाली पाहिजे. केवळ स्त्रिया म्हणून समान कामाबद्दलही त्यांना कमी मजुरी देण्याची प्रथा एकदम बद झाली पाहिजे. स्त्रिया शारीरिक बलांत पुरुषांपेक्षां दुबळ्या असल्यामुळे त्यांच्याकडून जड कामे व्हावीं तशी होत नाहींत ही सबब मालकांकडून पुढे करण्यांत येते; पण दिवसेदिवस यत्रांचे प्राबल्य गिरण्यांत वाढत असल्यामुळे हीं यंत्रे चालवण्यास शक्तीपेक्षां युक्ति, धोरण, थडपणा हींच जास्त प्रमाणांत लागत असल्यामुळे, बायका पुरुषांइतकेच किंबहुना सरसच काम या यांत्रिक युगांत करूं शकतात. स्त्रियांवर कुटुंबपोषणाचा भार नसल्यामुळे त्यांना पुरुषांसारखी भरपूर मजुरी देण्याची जरूर नाहीं असे दुसरे कारण स्त्रियांना कमी मजुरी देण्याबद्दल सांगतां येते. पण हें कारणही रास्त दिसत नाहीं. एक तर कित्येक वेळां अविवाहित स्त्रीला आपल्या गरीब बापाचे

मोठें कुटुंब स्वतःच जवळजवळ पोसावें लागतें, किंवा विधवा स्त्रीला आपलीं कच्चींबच्चीं एकटीच्या कामावर पोसावीं लागतात. शिवाय पुरुषमजुराचें कुटुंब केवढें आहे त्याची चौकशी न करतां जर त्याला मजुरी देण्यांत येते तर स्त्रियांच्याच बाबतींत कुटुंब नसल्याची सबब कां पुढें आणावी ?

हिंदी स्त्रीमजुरांची स्थिति सुधारण्यासाठीं मालकांकडे व सरकारकडे करावयाच्या खटपटीबरोबर या स्त्रियांमध्ये जागृति करण्याचेंही कार्य केलें पाहिजे. सुशिक्षित स्त्रियांनीं या विषयांत लक्ष घालणें फार जरूर आहे. आधींच हिंदु स्त्रियांचा सच्चितावर भरंवसा; त्यांतून स्त्रियांचा जन्मच खोटा ही दृढमूल समजूत; त्यांतून मजूर स्त्रिया तर बिचाऱ्या फारच अडाणी. त्यामुळें आपल्या हक्कांविषयीं व हालाविषयीं त्या उदासीन असतात. आपल्याला पुरुषांच्या बरोबरीनें पगार मिळणें जरूर आहे; बाळंतपणांत सवलती, राहण्याच्या जागेंतील सुखसोयी, मुलांबाळांच्या शिक्षणाची व्यवस्था या आपल्या हक्काच्या गोष्टी आहेत व त्या आपण झगडून मिळवल्या पाहिजेत, ही जाणीवच मजूर स्त्रियांना अद्याप नाहीं. ही जाणीव सुशिक्षित स्त्रीपुरुषांनीं त्यांना आणून दिली पाहिजे. तसेंच कामगार संघ (Trade Unions) स्थापणें, संपासारख्या चळवळी सहकारी तत्त्वांवर यशस्वी करून दाखविणे, इत्यादि गोष्टींची माहिती करून दिली पाहिजे. सोलापुरांत विडी कामगार स्त्रियांत जागृति झाल्याबरोबर त्या किती चिकाटीने व कार्यक्षमतेनें आपल्या हक्कांसाठीं झगडल्या याचें उदाहरण ताजेंच आपल्या डोळ्यांसमोर आहे. याप्रमाणें ठिकठिकाणीं मजूर स्त्रियांत जागृति होईल, शिक्षणाचा प्रसार वाढेल, तर स्त्रीमजुरांचें जीवन सुखी होण्यास वेळ लागणार नाहीं.

*Women in Modern India* या पुस्तकांत ताराबाई टिळक यांनीं सुशिक्षित स्त्रियांना या बाबतींत कशा प्रकारची समाजसेवा करतां येण्याजोगी आहे हें फार सुदर रीतीनें दाखवलें आहे. मजूर स्त्रियांमध्ये जागृति करणें, त्यांच्या सुखासाठीं Creches, Club वगैरे उपलब्ध साधनांचा उपयोग करून घेण्यास त्यांना उत्तेजन देणें, त्यांना लिहिणेंवाचणें शिकवणें, आरोग्य व स्वच्छतेचीं मूलतत्त्वें, शिवण शिकवण्यासाठीं खाजगी वर्ग उघडणें, त्यांना मोकळी हवा व करमणूक मिळावी म्हणून क्लब सुरू करणें व त्याला जोडून मुलांसाठीं क्रीडोद्यानें उघडणें वगैरे कामे त्यांना करतां येतील. इंग्लंडमध्ये

ज्याला Settlement Work म्हणतात तशा प्रकारचेंच हें एक काम आहे. सुशिक्षित समाजसेवकांनीं या गरीब मजूर लोकांच्या वस्तींत जाऊन राहावे, त्यांच्या मनोभावना, अडचणी समजावून घ्याव्या व मग त्या दूर करण्यासाठीं चळवळ करावी, शिक्षणाचा प्रसार करून जागृति करावी म्हणजे मजुरांची स्थिति लौकर सुधारेल.

मजूरवर्गाच्या मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. आईबाप कामावर गेले कीं, हीं मुलें रस्तोरस्तीं वणवण करीत हिंडतात व बरेच वेळीं वाईट मार्गालाही लागतात. मुलांच्या शिक्षणावर पैसे खर्च करण्याची आईबापांना ऐपत नसते. अशा मुलांसाठी मोफत शाळा निघतील, तर आईबाप मुलांना तेथें सोडून निश्चिंतपणें कामावर जातील. याच मुलांतून पुढें भावी पिढीच्या माता तयार व्हावयाच्या असल्यामुळे, या मुलींच्या शिक्षणाकडे जरूर जास्त लक्ष पुरविलें पाहिजे. शाळांतून नुसते मोफत शिक्षणच नव्हे तर पाट्यापुस्तकेंही फुकट पुरविली पाहिजेत. अर्धपोटी राहणाऱ्या मुलांना अन्न, उघड्यावाघड्यांस कपडे, रोगग्रस्तांना औषधपाणी, हींही शिक्षणाबरोबरच पुरवलीं पाहिजेत. तसेंच लिहिणें वाचणें यांखेरीज, स्वच्छता, रोजच्या जीवनक्रमांत पाळण्याचे आरोग्याचे नियम वगैरे माहिती दिली पाहिजे. खाजगी प्रयत्न, सरकार व गिरणीवाले या तिघांच्या एकजुटींच्या प्रयत्नाशिवाय, हें अवघड व खर्चाचें काम सिद्धीला जाणार नाही. संतुष्ट, निरोगी व सुशिक्षित मजूरवर्ग जास्त कसोशीने काम करील व त्यापासून गिरणीमालक व सरकार या दोघांचाही फायदा होईल. तेव्हां या बाबतींत लक्ष घालणें त्यांच्या हिताचेंच आहे.

मजुरांच्या राहण्याच्या जागांतूनही फार सुधारणा झाल्या पाहिजेत. स्वतःच्या नोकरांची राहण्याची सोय करणे, हे गिरणीवाल्यांचें कर्तव्यच आहे. त्यांनीं हवाशीर व आरोग्यदायक अशा चाळी मजुरांसाठीं बांधून, त्या माफक भाड्यानें त्यांना दिल्या पाहिजेत. सध्यां गिरणीमालक कुठें कुठें चाळी बांधतात; पण त्या फक्त जास्त भाड्याच्या व उत्पन्नांत भर घालण्याच्या आशेनें. त्यांतून शक्य तितका कमी पैसा बांधकामावर खर्च केलेला असतो व आरोग्याच्या नियमांकडे, भरपूर उजेड व हवा खेळवण्याकडे पूर्ण दुर्लक्ष केलेलें असते. सरकारनें या बाबतींत नियंत्रण घातलें पाहिजे. कोंदट, अंधाऱ्या, ओलसर जमिनीच्या, स्वच्छ पाण्याची सोय नसलेल्या, ड्रेनेजचा निकाल नसलेल्या

चाळी बांधण्यास सरकारनें मनाई केली पाहिजे, व जुन्या वाईट चाळी पाडून टाकल्या पाहिजेत. त्याचप्रमाणें खुद्द कारखान्यांच्या इमारतींतूनही सुधारणा सरकारी कायद्यानें झाली पाहिजे. अनेक अजस्र यंत्रें सारखीं चालू असल्यानें गिरणींतील वातावरण भयंकर तप्त झालेलें असते; त्यांतून इमारत कोंदट, ठेंगणी व अंधाराची असल्यास पुरुष मजुरांचे व विशेषतः स्त्री मजुरांचे फार हाल होतात. कारखान्यांतील कांही कांहीं क्रिया चालू असतांना निरनिराळे विषारी वायु निर्माण होत असतात; तर कधी कधीं वातावरण कृत्रिम तऱ्हेनें फार दमट बनवण्यांत येते. अशा वातावरणांत बारा बारा तास सारखें उभें राहून स्त्रीपुरुषांना काम करावें लागते. तेव्हां, मजुरांना हवा व प्रकाश भरपूर मिळेल अशा सोयी इमारतींतून करणें जरूर आहे. दिवसभर कोंदट, अंधाऱ्या गिरणीतून काम करून बाकीचा वेळ घाणेरड्या कोंदट वस्तींत घालवावा लागणाऱ्या स्त्रीपुरुषांचे आरोग्य किती दिवस टिकणार ? दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या स्त्रियांच्या व बालमृत्यूंच्या प्रमाणाला वाईट कारखाने व वाईट घरें हीच जबाबदार आहेत. पुरेसा सूर्यप्रकाश व मोकळी हवा न मिळाल्यास क्षयरोगांचा प्रादुर्भाव होतो असे डॉक्टरी मत आहे. लेडी लिनूलिथगो यांच्या क्षयप्रति-बधक फंडाचा मोठा भाग मजुरांसाठीं चांगली घरें बांधण्याच्या कामीं लावला तर क्षयाला परिणामकारक रीतीनें प्रतिबंध होईल. नुसती क्षयावर उपचार करणारीं रुग्णालयें काढून या भयंकर त्रासदायक रोगाचा नायनाट होणे शक्य नाहीं. त्याच्या प्रादुर्भावाचीं कारणें शोधून काढून त्यांचा बीमोड केला पाहिजे.

याप्रमाणे कामगार स्त्रियांच्या प्रश्नाचा थोडक्यांत विचार केला. या प्रश्नांत कळकळीनें लक्ष घालणाराला वरील विवेचन त्रोटक व उथळ वाटेल, ही जाणीव लेखिकेस आहे. पण या प्रकरणाच्या आरंभींच म्हटल्याप्रमाणें मजुरांच्या प्रश्नांच्या बुडाशीं असलेली आर्थिक गुतागुत उकलण्याचा सदरहू पुस्तकांत प्रयत्न करणें अप्रस्तुत होईल. तसेच पाहूं गेले तर समाजाची सबधच घडी विस्कटल्याशिवाय मजुरीचा प्रश्न सुटणार नाही! प्रस्तुत प्रकरणांत फक्त चालू परिस्थितींत स्त्रीमजुरांची स्थिति जास्त सह्य होण्यासाठीं समाज-सेवकांना व सरकारला काय करतां येईल एवढयाचेंच दिग्दर्शन करण्याचा हेतु आहे.

---

प्रकरण १३ वें : : :

## .... .... पडदा

हिंदु स्त्रियांच्या हिताला विघातक व त्यांच्या प्रगतीच्या मार्गांत अडथळे उत्पन्न करणाऱ्या कांहीं चालींचे व रूढींचें आपण मागील कांहीं प्रकरणांत विवेचन केलें. पडदा किंवा गोषा पाळण्याची चाल अशाच दुष्ट रूढींपैकीं एक आहे. या पडद्याच्या चालीनें हिंदु व मुसलमान स्त्रियांचें अतोनात शारीरिक, मानसिक, बौद्धिक व नैतिक नुकसान झालें आहे. मातांसारखीच पुढली पिढी निपजत असल्यामुळें या चालीनें मुलांचें व त्यामुळें राष्ट्राचें आजपावेतों अपरिमित नुकसान झालें आहे यांत शंका नाहीं.

पडद्याची चाल, मुसलमानी अंमलापासून हिंदुस्थानांत व हिंदु स्त्रियांत आली असावी. वेदकालीं हिंदु, आर्य समाजांत पडद्याची चाल खात्रीनें नव्हती. तेव्हां मुली मुलांबरोबर वेदाध्ययन करीत; विवाहसमयीं वधू जमलेल्या सर्व पाहुण्या मंडळींना समारंभानें दाखवण्यांत येई. विवाहमंत्रांतच वधूनें लग्नानंतर सार्वजनिक सभांतून भाग घ्यावा अशी इच्छा प्रकट केली आहे. यावरून स्त्रिया सार्वजनिक ठिकाणीं उघडपणें जात व कामकाजांत भाग घेत असें दिसते. 'अवगुण्ठना'चा उल्लेख प्रथम रामायणमहाभारतादि महाकाव्यांतून आढळतो; पण तरीही ही चाल फक्त राजस्त्रिया पाळीत, सर्वसाधारण स्त्री अवगुण्ठन पाळीत नसे, असें दिसतें. सर्वसाधारण गोषाची चाल प्रथम मुसलमानांनींच हिंदुस्थानांत आणली. कुराणांत "स्त्रियांनीं आपले सारे अवयव झांकावे, निकटरक्तसंबंधीयांखेरीज इतर पुरुषांच्या नजरेस पडूं नये" अशी आज्ञा आहे. तिचा बराचसा विपर्यास होत जात जात शेवटीं सध्यांची कडक पडद्याची चाल मुसलमानांत पडली असावी. मुसलमान हिंदुस्थानांत येऊन राज्यकर्ते बनल्यावर दोन कारणांसाठीं हिंदूंनीं त्यांची पडद्याची पद्धत उचलली असावी. एक तर, मुसलमानांत स्त्रिया थोडया व प्रत्येक मुसलमान पुरुषाला चार लग्नें करण्याची परवानगी; त्यामुळें मुसलमानांची स्वाभिलाषदृष्टि हिंदु स्त्रियांकडे वळण्याचा संभव होता. ज्याप्रमाणें 'परस्त्रीचा अभिलाष करूं नये' अशी कुराणांत स्पष्ट आज्ञा असल्यामुळें हिंदूंनीं बाल-विवाहाची रूढि पाडून आपल्या स्त्रियांचें संरक्षण करण्याची युक्ति काढली,

त्याचप्रमाणें मुसलमानांच्या वक्रदृष्टीपासून आपल्या सुंदर स्त्रियांचा बचाव करण्याकरतां हिंदूंनीं पडद्याची चाल मुसलमानांपासूनच उचलली असावी. दुसरें कारण म्हणजे 'यथा राजा तथा प्रजा,' जें राजा करतो तेंच अनुकरणीय ठरतें; या नियमाप्रमाणें मोगल राजांच्या पदरचे मोठमोठे राजपूत सरदार व मराठे सरदार आपल्या स्त्रियांना पडदा पाळावयास लावूं लागले. कालांतरानें पडदा पाळणें हें श्रीमंतीचें, उच्च कुलीनत्वाचें व उच्च दर्जाचें लक्षणच समजलें जाऊं लागलें; व मध्यम स्थितींतला पुरुषसुद्धां जरा एकदोन नोकर ठेवण्याची ऐपत येऊन बायकापोरींना कामाधामासाठीं बाहेर फिरण्याची गरज नाहींशी झाली कीं, त्यांना पडद्यांत ठेवून आपल्या कुलीनत्वाची प्रौढी मिरवूं लागे. बायकांनाही 'पडदा करणें' हें एक भूषण व श्रीमतीचें लक्षण वाटूं लागलें; व स्त्रियांची सर्वांगीण हानि करणारी ही चाल समाजांत एक श्रीमंतीचें व उच्च कुलीनत्वाचें लक्षण म्हणून दृढमूल होऊन बसली.

कालांतराने मुसलमानांच्या राज्याचा लोप झाला, पण जशी सनातनी रूढिप्रिय हिंदु समाजाने बालविवाहाची चाल एकदां पडली ती मोडण्याचा प्रयत्न केला नाहीं; त्याचप्रमाणें पडद्याची ही चाल मोडण्याचा विचारही हिंदु समाजानें मनांत आणला नाहीं. पडदा हे एक समाजांतील प्रतिष्ठितपणाचे लक्षण होऊन बसले ते बसलेच. आधीच ब्राह्मणकालापासून स्त्रियांचे स्वातंत्र्य संपुष्टांत येत चाललें होते; पडद्यासारखी बाहेरून प्रतिष्ठित दिसणारी, पण स्त्रीच्या स्वातंत्र्याला पायबंद घालणारी चाल 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' म्हणणाऱ्या समाजाला साहजिकच रुचली व ती त्यानें आत्मसात् केली. मात्र एकदां मुसलमानांचें वर्चस्व कमी झाल्यावर पडद्याच्या चालीचा दक्षिणेकडे प्रसार होण्याचें थांबलें. उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांचें वर्चस्व फार असल्यामुळें तेथें पडद्याच्या चालीचे सर्वांत उग्र स्वरूप आढळते. जसजसें दक्षिणेकडे मुसलमानांच्या साम्राज्यापासून दूर दूर जावें तसतसा पडदा कमी कमी झालेला आढळतो. मद्रास, महाराष्ट्र या प्रांतांत पडद्याची चाल कधींच घुसली नाहीं. राजपूत व उच्चकुलीन मराठे यांनीं मात्र तिचा मनापासून स्वीकार केला.

ज्यांना पडद्याची चाल पाळण्याची संवय नाहीं व अनुभव नाहीं त्यांना हा पडदा किती कडक प्रमाणांत पाळला जातो याची कल्पनाही करतां येणार

नाहीं. त्यांतल्या त्यांत अत्यंत श्रीमंत व अत्यंत गरीब स्त्रियांना पडद्याची चाल इतकी जाचक होत नाहीं. श्रीमंत स्त्रियांच्या घरीं मोठमोठ्या बागा, खेळण्याच्या सोयी असूं शकतात व त्या त्यांचा फायदा घेतात. पडद्याच्या मोटारींतून त्या खुशाल बाहेर फिरूं शकतात. पडदा क्लब, पडदा पार्टीज् वगैरे श्रीमंत स्त्रियांच्या संस्था असतात व जीवनाचा आनंद त्यायोगानें त्यांना थोडाबहुत तरी चाखावयास मिळतो. साधनांची विपुलता व अनुकूलता असल्यामुळें या श्रीमंत घराण्यांतून स्त्रिया पडद्यांत असूनसुद्धां सुशिक्षित, सुबुद्ध, कलाप्रिय अशा असून, त्या बौद्धिक व उच्च दर्जाचा जीवनक्रम स्वतःसाठीं आंखतात व चोखाळतांना दिसतात. अशा स्त्रियांचीं चित्रें मिस् कॉर्नेलिया सोराबजी यांनीं आपल्या ‘*India Recalled*’ या पुस्तकांत रेखाटलीं आहेत; व तीं पाहून पडद्याची चाल खरोखरीच इतकी अनिष्ट आहे कीं काय? तिच्या दुष्टतेविषयी उगीचच इतका गवगवा केला जातो कीं काय? अशी शंका एकादे वेळीं मनांत येते; पण हें उठावदार चित्र फक्त श्रीमंत समाजांतलें आहे, व हिंदुस्थानांत अशा श्रीमंत लोकांची संख्या फारच थोडी आहे. ही गोष्ट विसरून चालणार नाही. हिंदुस्थानांत मध्यम वर्गातील लोकांचीच संख्या फार आहे, व या मध्यम वर्गातल्या स्त्रियांवरच साधनाचें वैपुल्य नसल्यामुळें पडद्याच्या चालीचा अत्यंत अनिष्ट परिणाम झालेला आढळतो. वर म्हटल्याप्रमाणें अत्यंत गरीब कुटुंबांतही पडद्याची चाल इतकी जाचक होत नाहीं. दारिद्र्यामुळें गरिबांच्या बायकांना हातपाय न हलवतां नुसतें पडद्यांत बसून चालतच नाहीं. कुटंबाचें कच्चाबच्चांचें पोट भरण्याला हातभार लावण्यासाठीं मोलमजुरी करण्याला, किंवा निदान घरांतील सारीं काबाडकष्टाचीं कामें करण्यासाठीं तरी त्यांना बाहेर पडावेंच लागतें, व त्यामुळें त्यांचा पडदा, नांवाचाच, म्हणजे तोंडावर एक झिरझिरीत पडदा सोडून सर्व गांवभर हिंडण्यापुरताच असतो.

पण मध्यम वर्गातील स्त्रियांची स्थिति मात्र मोठी केविलवाणी असते. फार गरिबी नसल्यामुळें त्यांना मोलमजुरीसाठीं किंवा घरगुती कामासाठीं बाहेर पडण्याची वेळ येत नाहीं, व फार श्रीमंती नसल्यामुळें पडद्याच्या वाहनांतून मनसोक्त हिंडणें, क्लब-पार्टी यांतून मजा करणें हेंही त्यांच्या नशिबीं नसतें व त्यामुळें आयुष्याचे सारे दिवस झनान्यांत, चार भिंतींच्या आंत, त्यांना

कठावे लागतात. जनान्याच्या वांट्याला बहुतेक घरांतील सर्वांत मागची, अंधारी, ओलसर व कोंदट जागा येते. एकत्र कुटुंबपद्धतीमुळें पुष्कळशा बायकांना, पोरांबाळांना या कोंदट जागेंत एकत्र राहावें लागतें. पुरुषांना या बाजूला वावर करण्याची बंदी असते. परकी माणूस किंवा पाहुणा तर तिकडे कधीं फिरकणें शक्यच नाहीं. यामुळें जनान्याचा हा भाग नेहमीं अस्वच्छ व अव्यवस्थित असतो. तो स्वच्छ सुंदर व नीटनेटका, ठेवण्याची जरूरी कधीं घरांतील स्त्रीला किंवा नोकराला वाटतच नाहीं. अशा या कोंदट, सौंदर्यहीन, रोगग्रस्त जागेत हिंदु मध्यम वर्गातील स्त्रियांना आपले चोवीस तास काढावे लागतात.

असल्या वातावरणांत साहजिकच स्त्रीचा शारीरिक व मानसिक अधः-पात दिवसेंदिवस होत जातो. चार भिंतींच्या पलीकडे मोकळ्या हवेत, सूर्य-प्रकाशांत जाण्याची बंदी असल्यामुळे, या स्त्रिया हळुहळू अशक्त व फिकट बनत जातात व त्यांना क्षय, रक्तक्षय यांसारखे रोग जडतात. स्त्रियांच्या मृत्युसंख्येचें प्रमाण सालोसाल वाढते राहण्याचे कारण बालविवाहादि इतर अनिष्ट रूढींप्रमाणें पडद्याची चाल हेही आहे. त्या चार भिंतींच्या आंत सगळा व्यवहार. त्यामुळें व्यायामही फारसा किंवा मुळींच या स्त्रियांना मिळत नाही; त्यामुळें बालवयापासूनच त्यांचे स्नायू, हाडे वगैरेची योग्य प्रमाणांत वाढ होत नाहीं, व त्यामुळें अस्थिमार्दव, पोक येणें, संधिवात वगैरेसारखे रोग होतात. बाळंतपणाचे वेळीं, पडद्यांतील स्त्रियांचे अत्यंत हाल होतात, कित्येक त्या वेळी मृत्युमुखीं पडतात, तर कित्येकांच्या बालकांवर गर्भावस्थेत व जन्मतेवेळीं अत्यंत वाईट परिणाम होतो—या गोष्टींची साक्ष तर, गोषा असणाऱ्या प्रत्येक प्रांतांतील कोणताही डॉक्टर देईल. आधींच गोषाच्या दुष्ट चालीमुळे त्या बिचाऱ्यांना कुठल्याही रोगांत पुरुष डॉक्टरांकडून औषधोपचार करून घेणेंच शक्य नसतें. ( स्त्री डॉक्टर आतां पुष्कळ झाले आहेत, पण डॉक्टरणी जेव्हां नव्हत्या तेव्हां या गोषांतील स्त्रियांचे औषधपाण्यावाचून किती बरें हाल झाले असतील! आणि अजूनसुद्धां डॉक्टरणी आहेत त्या फक्त मूठभर शहरांतूनच. खेड्यापाड्यांत पहिलीच करुणाजनक कहाणी सुरू आहे. ) होतां होईतोंवर डॉक्टरच्या नजरेस बाईचें नखसुद्धां पडूं द्यायचें नाहीं, याबद्दल खबरदारी खुद्द स्त्री व तिचे नातलग घेत असतात. नुसत्या भावनांचें वर्णन ऐकून दिलेलें औषध

नाहींच लागूं पडत, अशी खात्री झाली म्हणजे मग बाईला पडद्याआड बसवून नुसती तिची नाडी डॉक्टरला बघूं द्यायची ! नुसती नाडी पाहून नानाविध रोगांचें निदान करायला प्रत्येक डॉक्टर अश्विनीकुमाराचा अवतार थोडाच असतो ? याप्रमाणें योग्य औषधोपचारांच्या अभावीं हजारो स्त्रिया आजपावेतों मृत्युमुखीं पडल्या आहेत. ही गोष्ट लक्षांत घेऊन लेडी डफरीन फंड कसा उभारला गेला याची हकीकत मागील एका प्रकरणांत दिलीच आहे. सदरहू फंडाचीं व खाजगी निधीतून काढलेली झनाना हॉस्पिटल्स् आतां मुख्य मुख्य शहरीं झालीं आहेत. पण एकदां वेल पळून गेल्यावर मग झोपा करण्याचा जसा उपयोग नसतो, तसा एकदां पडद्यांतल्या रोगट, कोंदट वातावरणानें स्त्रीची प्रकृति बिघडून गेली म्हणजे मग हॉस्पिटल्स्मधल्या वरवरच्या औषधोपचारानें कितीसा फायदा होणार ?

शारीरिक हानीबरोबर पडद्याच्या चालीने, पडदानशीन स्त्रियांचा मानसिक व बौद्धिक अधःपातही होतो. चार भिंतींच्या पलीकडील जगाचा वारासुद्धां नाहीं; बालविवाह व पडदा यामुळें शिक्षणाचा गंधही नाहीं; लिहिणें वाचणे तर दूरच पण रोजच्या घरांतल्या बायकांपलीकडे दुसऱ्यांशी बोलणेंसुद्धां नाहीं. परक्या, विद्वान्, बहुश्रुत पुरुषांशीं विचारविनिमय करून बौद्धिक विकास करून घेण्याची तर कल्पनाच नको--पण घरांतल्या पुरुषांशीं सुद्धां बोलण्याला सुनेला बंदी असते, मग मुलींची उमलती बुद्धि व विकसते विचार जागच्या जागीं खुरटून जातील यांत आश्चर्य ते काय ? घरांतला पितृतुल्य सासरा किंवा वडील दीरसुद्धां अंतःपुराकडे कधी कांहीं कामासाठीं फिरकलाच तर "मी येत आहे हो" असे ओरडत येतो; म्हणजे नवोढांना व इतर स्त्रियांना योग्य ती पूर्वसूचना मिळून दूर पळून जाण्यास वेळ सांपडतो. अशा परिस्थितींत मुलींचा व स्त्रियांचा बौद्धिक विकास कसा होणार ? त्यांचे विचार व गोष्टी म्हणजे अंतःपुरांतले रोजचे व्यवहार—बारीकसारीक हेवेदावे, भांडणें, मानापमान, नवे दागिने कुणाला, केव्हां कसे घडवावयाचे, नवे शालू कुणाकुणाला घ्यावयाचे—याबद्दलच असावयाचे. सर्वांत नवलाईचा व महत्त्वाचा चर्चेचा विषय म्हणजे कुठल्या नवोढेची कितवी 'पाळी' चुकली आहे, तिला मुलगा होण्याचीं कांहीं लक्षणें आहेत किंवा 'कार्टी'च होणार आहे, असल्या ह्या गोष्टींपलीकडे विचाराला दुसरे महत्त्वाचे विषय त्यांना सुचणें

शक्यच नसते. पुरुषांकडे कोणी बडे सुविद्य पाहुणे कधीं आले तरी गोड, स्वादिष्ट खाद्यपेयें दिवसभर राबून बनवणें, व ते पाहुणे त्याचा समाचार घेत असतां एखाद्या झरोक्यांतून चुकूनमाकून एकादी चोरटी नजर फेंकणें—या-पलीकडे त्यांचा बाहेरच्या जगाशीं संबंधच येत नाही. यामुळे साहजिकच स्त्रियांची मानसिक वाढ खुंटते. क्षुद्र गोष्टींना नसते महत्त्व देण्याची संवय लागून मनोवृत्ति क्षुद्र, संकुचित, कलहप्रिय बनत जाते व स्त्रीजाती-विषयीं वाटेल तसे निरर्गल प्रलाप करावयास स्त्रीस्वातंत्र्यद्वेष्ट्यांना आधार मिळतो. याच्याहूनही होणारा अनिष्ट परिणाम म्हणजे खुद्द पडदानशीन स्त्रियांनाच "आपला जन्म फुकट, आपली अक्कल चुलीपुरती, आपल्याला जगांतला व्यवहार समजणें शक्य नाही; ते सगळें पुरुषच करूं शकणार" असें वाटू लागतें. सात वर्षांचा मुलगासुद्धां सत्तर वर्षांच्या बाईपेक्षां बाहेरील व्यव-हारांत अनुभविक व शहाणा ठरूं शकतो; व हे पाहून पडदानशीन स्त्रियांचा न्यूनगंड व गुलामछापाची मनोवृत्ति वाढत जाते (Inferiority Complex and Slave Mentality). अशा स्त्रियांचीं मुलेंही पुढें आनुवंशिक सस्का-रांच्या नियमानें न्यूनगंडी व गुलाम मनोवृत्तीचीं निपजतात, व हिंदी राष्ट्राच्या पायांतील परावलंबित्वाची शृंखला जास्त जास्तच आवळण्यास कारण होतात यांत शका नाहीं.

तसेच पडद्याच्या चालीमुळे स्त्रियांचें आर्थिक दृष्ट्याही नुकसानच होतें. पडदा करणें हें प्रतिष्ठितपणाचें लक्षण समजले गेल्यामुळें जर एकादी स्त्री धडपड करून पडद्याबाहेर पडली आणि चार अक्षरें शिकून अर्थार्जन करून आपल्या पायांवर उभी राहिली तर तिच्याकडे पडदानशीन स्त्रिया ईर्ष्येनें व कौतुकानें पाहण्याऐवजीं साशंकतेनें व तिरस्कारानें पाहूं लागतात! त्यांच्या कोत्या समजुतीप्रमाणें पडदा न पाळणाऱ्या स्त्रिया म्हणजे अकुलीन स्त्रिया. या ग्रहामुळें पडदानशीन स्त्रियांचा प्रगतीचा मार्ग बिकट व जवळजवळ खुटल्यासारखा झाला आहे. पडदा सुटत नाहीं त्यामुळें शिक्षण नाहीं, त्यामुळें आर्थिक स्वातंत्र्य नाही, व आर्थिक स्वातंत्र्य नाहीं म्हणजे हल्लींच्या अर्थप्रधान युगांत मानव्य किंवा माणुसकीच नाहीं, स्वतंत्र असें अस्तित्वच नाहीं; अशा या चमत्कारिक चक्रव्यूहांत पडद्यांतील स्त्रिया सांपडल्या आहेत; व पूर्वग्रहांची कोंडी फोडून, पडदा झुगारून दिल्याशिवाय त्यांचें पाऊल पुढें पडणें व त्यांचा

'असण्याचा,' 'खरेंखुरे स्वतंत्र जीवन जगण्याचा' हक्क प्रस्थापित होणें शक्य नाहीं.

पडद्याच्या चालीमुळे समाज व समाजांतील पुरुष नैतिक अधःपाताच्या घसरगुंडीवर ढकलले जातात, ही गोष्ट म्हणजे एक मजेचा पण अत्यंत कटु असा विरोधाभासच आहे. पडद्याची चाल प्रथम पाडणाराचा हेतु स्त्री-पुरुषांच्या नीतिसंरक्षणाचा. ही चाल अद्यापि उराशी कवटाळून धरणारेही "या चालीमुळें आमच्या समाजाचा नैतिक दर्जा फार उच्च राहतो" अशी प्रौढी मिरवतात. आपल्या बायकांना चव्हाट्यावर आणणारे, त्यांना वाटेल तिकडे फिरूं देणारे लोक समाजाच्या नीतीला धोक्यांत आणीत आहेत असे हे पडद्याचे कैवारी मानतात. पण ही त्यांची समजूत चुकीची आहे. पडदा पाळणारे प्रांत न पाळणाऱ्या प्रांतांपेक्षां जास्त नीतिमान् आहेत असे मुळींच वस्तुस्थितींत दिसत नाहीं. उलट पडदाप्रांतांतच अनीतीचा प्रचार जास्त आढळतो; याचे कारण उघड आहे. पडद्याच्या चालीचा पुरस्कार करणारे मुळांतच एक चुकीची समजूत गृहीत धरून चालतात व म्हणून त्यांची पुढील सर्व अनुमानें चुकीचीं ठरतात. मोहाची गोष्ट नजरेआड केली, माणसापासून दूर दूर ठेवली म्हणजे त्याचा मोहापासून बचाव होतो असे ते मानतात. पण मानसशास्त्रदृष्ट्या ही समजूत सर्वथैव चुकीची आहे व व्यवहारांतही तिची अयथार्थता अनुभवास येते. स्त्रीपुरुषांना एकमेकांपासून दूर ठेवल्यानें मन मोहापासून अलिप्त राहण्याऐवजीं मोहाच्या जास्तच ताब्यांत जाते. जी गोष्ट सहजसाध्य नसते तिच्याविषयीं माणूस जास्त विचार करतो; ती गोष्ट निषिद्ध आहे असे कोणी सांगू लागलें तर त्याचे मन त्या गोष्टीचा जास्तच नाद घेतें. लहान मूलसुद्धां हातांतलीं सुंदर खेळणीं दूर भिरकावून देतें व न मिळालेल्या साधारण खेळण्यासाठीं हट्ट धरून बसतें. अमुक गोष्ट करू नको म्हणून कोणीं सांगितलें म्हणजे ती जास्तच करावीशी वाटते, हा मनुष्यस्वभावच आहे. याप्रमाणें स्त्रीसहवास दुर्लभ असला म्हणजे पुरुष जास्तच स्त्रीचे, विषयाचे चिंतन करून विषयासक्त बनतो. स्त्रीचा साधा बुद्धिजन्य सहवास दुर्मिळ असल्यामुळे पुरुषाचें मन स्त्रीविषयीं विचार करतांना देहापलीकडे जाऊंच शकत नाहीं.

लहानपणापासूनच स्त्रीपुरुषांना असें दूर दूर ठेवलें जात असल्याने लहान मुलगे, लहान वयांतच नैसर्गिक कुतूहल पूर्ण न झाल्यानें लिंगभेदांचा व

लैंगिक गोष्टींचा विचार करूं लागतात, व तरुणपणीं बौद्धिक सहवासाची तहान कलासक्तीचा शोक मैत्रिणीच्या शुद्ध स्नेहानें राहोच, पण स्वतःच्या पत्नीकडूनही पुरविला जाण्याचा संभव नसल्यामुळे, कलावंत गायकांकडे—वेश्यांकडे—साहजिकच पुरुष वळतात. घरगुती स्त्रिया कला शिकलेल्या नसतात व बौद्धिक दृष्ट्या अपक्व असतात. वेश्या मोठ्या शिकलेल्या नसल्या तरी बाहेरच्या जगाच्या अनुभवानें जास्त शहाण्या, सभाषणचतुर झालेल्या असतात. कलाचतुरता हा तर त्यांचा धंदाच असतो तरुण पुरुष यामुळे त्यांच्याकडे चटकन् आकर्षिले जातात व याप्रमाणें गोषा पाळणाऱ्या समाजांतूनच अनीति जास्त माजलेली आढळते. स्त्रीसहवास साध्या निष्पाप स्वरूपांत, खेळीमेळीच्या प्रसगांत कधीं मिळतच नसल्यामुळें,पुरुषांची स्त्रियांकडे बघण्याची नजर नेहमीं एकाच प्रकारची, विषयासक्तीची असते. पुरुष स्त्रीकडे फक्त एक भोगदासी म्हणून बघतो व तिचा व आपला दोघांचाही नैतिक अधःपात करून घेतो. साधारणतः स्त्रीपुरुषांना एकमेकांविषयीं जे आकर्षण वाटते त्यांत नेहमीच ऐंद्रिय लालसा असते असे नाही. नावीन्यामुळे, भेदामुळे एकमेकांविषयीं एक प्रकारचे निष्पाप कुतूहल वाटत असते. परस्परांच्या सहवासांत बराच वेळ राहून तें कुतूहल पुरे करून घेण्याची तीव्र इच्छा असते. स्वभावभेदामुळे, वैचित्र्यामुळे स्त्रीला पुरुष व पुरुषाला स्त्री, मित्र किंवा मैत्रीण म्हणून जास्त आवडतात. पडद्याची चाल जेथें नाहीं तेथें हा कुतूहल पूर्ण करणारा निष्पाप, खेळीमेळीचा, बौद्धिक सहवास परस्परांना लाभतो व वैवाहिक नीति बिघडण्याचा सभव राहात नाहीं. पण ज्या समाजांत गोषाची चाल आहे तेथें स्त्रीपुरुषांना कोणत्याही स्वरूपांत एकत्र येण्याला बंदी असते. फक्त इंद्रियजनक वासनापूर्तीसाठीच स्त्रीपुरुष एकत्र येऊं शकतात. यामुळे स्त्रीपुरुषांचा एकमेकांविषयींचा, विशेषतः पुरुषाचा स्त्रीविषयक दृष्टिकोण अत्यंत हीन स्वरूपाचा बनतो. कुलीन स्त्रिया पडद्यांत डांबलेल्या असल्यामुळे, साहजिकच पुरुष आपली स्त्रीसहवासाची तहान भागवण्यासाठीं अकुलीन ठरलेल्या स्त्रियांकडे ढकलले जातात. या एकत्र जीवनाला या स्त्रियांच्या धंद्याचें स्वरूप ठरून गेलें असल्यामुळें, अनैतिक स्वरूपाशिवाय दुसरा अर्थच शेवटीं उरूं शकत नाहीं; व पुरुषांचा व समाजाचा शेवटीं अधःपात होत जातो.

याप्रमाणें पडद्याच्या चालीमुळें स्त्रियांचा शारीरिक, बौद्धिक व नैतिक

ऱ्हास होत आहे. मुसलमान स्त्रियांस मालमत्तेचे हक्क, लग्न व लग्नविच्छेद यांच्या करारामध्यें हिंदु स्त्रियांपेक्षां जास्त सवलती असूनही त्यांची हिंदु स्त्रियांपेक्षां सर्वांगीण प्रगति व भरभराट झालेली दिसून येत नाहीं. याचे कारण पडदा हेंच होय. क्वेट्टा व बिहारमधल्या भूकंपांमध्ये ज्याप्रमाणें अनेक पडदानशीन स्त्रिया 'गोषा बिघडतो' म्हणून घराबाहेर न पडतां आंतल्या आंत गुदमरून मेल्या; किंवा हैदराबादेत सिनेमा थिएटरमधील आगींत ज्याप्रमाणें पडदा कसोशीने पाळण्यासाठीं शेकडो स्त्रियांनीं आगींत जळून खाक होणें पत्करले; त्याप्रमाणें या पडद्याच्या चालीनें स्त्रियांचे मानसिक व आर्थिक स्वातंत्र्यही घुसमटून मरणाच्या पंथाला लागलें आहे. पडद्यांतल्या स्त्रियांनीं वेळींच सावध होऊन, पडदा झुगारून देऊन, शिक्षणादि साधनांनी जगाच्या बरोबर येण्याचा प्रयत्न केला तरच त्यांचा निभाव लागणार आहे. टर्कीसारख्या स्वायत्त देशांत ही अत्यत इष्ट व आवश्यक सुधारणा एका चुटकीसरशी टाकाच्या एका फटकाऱ्यानें झाली. पडदा कायद्यानें मना करण्यांत आला. स्त्रिया एकदां पडद्याबाहेर आल्यावर मग त्यांची प्रगति झपाट्यानें होऊन त्या पुरुषांबरोबर येण्यास वेळ लागला नाहीं. इराक, पर्शिया येथील स्त्रियाही फार पुढे गेल्या आहेत. हिंदुस्थानांतील मुसलमान व इतर पडदानशीन स्त्रियांनीं आपल्या परदेशीय बहिणींपासून धडा घेऊन, पडदा फेंकून उजेडांत आलें पाहिजे व आपलें जीवन उजळलें पाहिजे. हिंदु व मुसलमान, सर्व धर्मांच्या व सर्व पंथांच्या स्त्रियांनीं हातांत हात घालून एकजुटीनें या बाबतींत प्रयत्न केला पाहिजे. हिंदी स्त्रिया आपापसांतील एकीबद्दल प्रसिद्ध आहेत. जातवार मतदारसघासाठीं पुरुषांत भांडणें होऊन डोकीं फुटण्याची वेळ येते. पण स्त्रियांनीं मात्र Communal Award मध्यें त्यांना मिळालेल्या जातवार मतदारसंघाचा एकमुखानें निषेध केला. हीच एकी हिंदी स्त्रियांच्या मार्गांतील साऱ्या अडचणींचें निवारण करावयास कामीं येईल. अखिल भारतीय महिला परिषद, वर्षोंवर्षी पडद्याविरुद्ध ठराव पास करीत आहे. अ० भा० म० परिषदेनें आपल्या ठिकठिकाणच्या शाखांतून विशेषतः पडदा प्रांतांतून या बाबतींत जास्त विधायक स्वरूपाचें कार्य केलें पाहिजे. स्वयंसेविकांनीं घरोघर जाऊन पडदा स्त्रियांत जागृति करणें, त्यांना मोकळी हवा, प्रकाश, शिक्षण, आरोग्य या मूलभूत गोष्टींचें महत्त्व पटवून

देणें, शैक्षणिक वर्ग उघडणें, खेळ, व्यायाम यांसाठीं समाज स्थापन करणें वगैरे करमणुकीचीं व उद्बोधनाचीं साधनें निर्माण करून त्यांच्याविषयीं पडदानशीन स्त्रियांत गोडी उत्पन्न केली पाहिजे. सरकारचें औदासीन्य व अशरणता, सार्वत्रिक दारिद्रय व अज्ञान यामुळें सुधारणा कठिण होते व मूठभर सुशिक्षित हिंदी स्त्रियांवरील जबाबदारी फारच वाढते. 'सुशिक्षित स्त्रियांचीं कर्तव्ये ' याबद्दल जिकडे तिकडे आक्रोश व चर्चा चालू असते ती यामुळेंच.

हिंदुस्थानला नवीन सुधारणांनीं नवे हक्क मिळाले व ते वापरून दाखवून जास्ती हक्कांबद्दल आपली पात्रता सिद्ध करून दाखविण्याची अहमहमिका पुरुषवर्गात प्रांतोप्रांतीं सुरू झाली आहे. हिंदी स्त्रियांनाही फूल ना फुलाची पाकळी या न्यायानें थोडेबहुत हक्क मिळाले आहेत. हिंदी स्त्रिया इंग्लिश स्त्रियांपेक्षां कांहीं बाबतींत थोडया जास्त नशिबवान् आहेत. ज्या राजकीय हक्कांसाठीं व मताधिकारासाठी इंग्लिश स्त्रियांना जंगजग पछाडावे लागले; स्त्रियांचा निसर्गदत्त कोमलपणा झुगारून देऊन बळेंच दांडगोबा बनून धिंगामस्ती अशालीनतेनें करावी लागली, तेच राजकीय हक्क कमजास्त प्रमाणांत हिंदी स्त्रियांनीं फार निकराची चळवळ केल्याशिवायच मिळाले. पण म्हण आहे ना, दांत आहेत तेथें चणे नाहीत व चणे आहेत तेथें दांत नाहींत. हिंदी स्त्रियांना मत मिळालें, पण ते मत शहाणपणाने वापरणाऱ्या हिंदी स्त्रियाच नाहींत ! शिक्षण नाहीं, पडद्यासारख्या दुष्ट चालीमुळे बाहेरच्या जगाचा वाराही ठाऊक नाहीं. ( निव्वळ गोषांतल्या स्त्रियांबद्दलच हें खरें आहे असें नव्हे. आमच्याकडे पडदा नाहीं; पण पडद्यांतली लाज, संकोच, भित्रेपणा मागें मागें राहण्याची प्रवृत्ति हें सर्व यथास्थित असायचे तसेंच आहे ! पडदा न पाळणाऱ्या आमच्या स्त्रिया कितीशा निःसंकोचपणें पुरुषांत मिसळतात; किंवा बाहेरचे व्यवहार आपल्या जबाबदारीवर पार पाडतात ? ) या परिस्थितीमुळें स्त्रियांचें मत म्हणजे त्यांच्या घरांतल्या नातेवाईक पुरुषांचे मत तरी बनते किंवा कधीं वापरली न जाणारी ती एक वासनांतील चीज होऊन बसते. मग तें मत मिळून काय उपयोग ? कारण आपण मागें एका प्रकरणांत पाहिल्याप्रमाणें मत हें कांहीं साध्य नव्हे, तें फक्त एक साधन आहे. मग तें साधन योग्य रीतीनें वापरून उन्नतीचें साध्य हस्तगत करून घेण्यास शिक्षण,

शहाणपण, जागृति स्त्रियांत व्हावयास नको काय ? हिंदुस्थानांत सारे धंदे, व्यवसाय स्त्रियांनीं मागणी करायच्या आधींच त्यांना खुले झाले आहेत. पण त्यांत प्रवेश करणाऱ्या स्त्रियांचाच पत्ता नाहीं. ही दुःस्थिति पालटली पाहिजे. शिक्षणाच्या प्रसारासाठीं नुसते पडदा क्लब, पडदानशीन शाळा उघडून स्वस्थ बसतां उपयोगी नाहीं. ती उन्नतिमार्गावरील पहिली पायरी आहे ही गोष्ट खरी; पण पहिल्या पायरीवरच बसून अंतिम साध्य डोळ्यांआड करून उपयोग नाहीं. पडदा शाळा, पडदा क्लब, पडदा पोलिंग स्टेशन्स् यांनीं राष्ट्राच्या काळाचा, पैशाचा, श्रमाचा व्यर्थ व्यय मात्र होतो व त्या मानानें फायदा विशेष होत नाही. खरी उन्नति होण्यास स्त्री ही पडद्यांतून बाहेर आली पाहिजे. तिच्या अंगीं आत्मविश्वास, स्वसरंक्षणक्षमता, स्वावलंबिता बाणली पाहिजे. म्हणजे मग ती सध्यां तिच्या हाताशीं असलेल्या साधनांचा फायदा करून घेईल व आणखी साधनें प्राप्त करून घेण्यासाठी पुरुषांच्या बरोबरीनें झगडेल.

स्त्रियांच्या कर्तबगारीला अंतरल्यामुळें समाजाचे व राष्ट्राचें किती तरी नुकसान होत आहे. एकत्र कुटुंबसंस्था व परावलंबी, लतारूप स्त्रिया यांनी समाजाचे दारिद्र्य वाढवलें आहे. एक पुरुष तेवढा मिळवता व त्याच्यावर अवलंबून राहणारी निरुद्योगी व बेकार इतर पचवीस माणसे एकत्र कुटुंबांत असतात. त्यांतील म्हातारीं, अपंग व अज्ञान यांचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं; पण पुष्कळसे ऐतखाऊ आळशी पुरुष व पुष्कळशा धडधाकट कर्तबगार स्त्रिया यांनींही निष्क्रिय जीवन घालवावे ही फार शरमेची व समाजाच्या हानीला कारणीभूत होणारी गोष्ट आहे. हुषार व निरोगी स्त्री घरकामाचा उरक अत्यंत अल्प वेळांत पाडते व नंतर जास्त उपयुक्त असे कांही काम नसल्यामुळे आळस, झोप, गप्पा, कुटाळक्या, निरर्थक कादंबरीवाचन, नट्टापट्टा व फार तर बरेच पैसे नासून घराच्या भिंतींची शोभा दवडणारी कलाकुसरीची कामे करणें यांत वेळ व्यर्थ दवडते. हीच वेळ अर्थोत्पादनाच्या कामीं लागेल तर स्त्रीचा स्वतःचा, सगळया कुटुंबाचा व समाजाचाही फायदा होईल. स्त्रीचा न्यूनगंड व पडदा मनोवृत्ति नाहींशी होऊन, ती समाजाचा एक घटक बनल्यामुळे तिला आत्मविश्वास व आत्मसंमान वाटूं लागेल. पुरुषाचे श्रम हलके होतील व कुटुंब संपन्न होईल. पुरुषाच्या पाठीशीं भाऊ असावा असें प्रत्येक माता व पुरुषही नेहमीं इच्छितो; पण प्रत्येक पुरुषाला हमखास मिळालेला जन्माचा जोडीदार

पुरुषाच्या बरोबरीनें कुटुंबाचा आधार बनवून घ्यावा व दारिद्र्याच्या भारानें उन्मळणारी कुटुंब व समाजव्यवस्था स्थिर करावी हें मात्र कोणालाच उमजून येत नाहीं !

याप्रमाणें पुष्कळ कर्तबगार सुशिक्षित कार्यकर्त्या स्त्रियांची कर्तबगारी व कार्यक्षमता पडद्यांत व इतर बंधनांत अडकून पडल्यामुळें फुकट जात आहे. इच्छा व सामर्थ्य हीं दोन्ही असूनही कधी कधी केवळ रूढीपुढें मान वांकवावी लागल्यामुळें स्त्रियांना घराबाहेर पडतां येत नाहीं. यामुळें प्रगतीच्या गाड्याला भली थोरली खीळ पडली आहे. पुरुष जीवनकलहांत गुंतलेला व स्त्रियांना घराबाहेरील जगाची ओळख व दखल नाहीं; मग गरीब, अडाणी रूढीनीं जखडलेल्या समाजाच्या हांकेला ओ कोण देणार ! तसेंच पाहूं गेलें तर, 'सेवा' ही कल्पना कांही हिंदु मनाला नवी नाहीं. कुटुंबसंस्था धाकट्यांनी वडिलांची सेवा करणें या तत्त्वावर उभारलेली आहे. हिंदु स्त्रीचा तर सारा जन्म 'सेवा' या तत्त्वालाच वाहिलेला असतो. कौमार्यांत मातापित्यांची, भावंडांची सेवा; यौवनांत सासुसासऱ्यांची, पतीची सेवा; प्रौढावस्थेत मुलांबाळांची सेवा, शेजाऱ्या पाजाऱ्यांची शेजारधर्मपालनरूपी सेवा—असा हिंदु स्त्रीचा सारा जन्म सेवेंत जातो. पण 'समाजसेवा' या स्वरूपांत सेवा हें तत्त्व हिंदी स्त्रियांना पारखें होण्याचें कारण पडदा व तत्सम रूढि होत. जेथें घरापलीकडे काय आहे हेंच ठाऊक नाही तेथें समाजसेवेची कल्पना काय असणार? यामुळें सेवाकुशल स्त्रियांची कर्तव्यशक्ति उपयोगाभावीं जागच्या जागीं कुजून जाते. पडद्याची चाल व इतर बंधनें तोडून, हिंदी स्त्रिया बाहेर समाजांत येऊं लागतांच सार्वत्रिक समाजसुधारणेचें पाऊल खात्रीनें पुढें पडेल. थोड्या संधीचाही किती उत्तम उपयोग हिंदी स्त्रिया समाजसेवेच्या कार्यांत करूं शकतात हें कै. रमाबाई रानडे, पंडिता रमाबाई वगैरेंच्या उदाहरणांवरून दिसून येते. गेल्या असहकारितेच्या चळवळींत तर हें स्त्रियांचें सुप्त कर्तृत्व फारच उठावदार रीतीनें दिसून आलें. १९१४ सालच्या जागतिक युद्धानें जसें इंग्लिश स्त्रियांच्या कर्तबगारीला तोंड फोडलें, तसें असहकारितेच्या चळवळीने हिंदी स्त्रियांच्या अंगीं आत्मविश्वास व स्वत्वाची ओळख निर्माण केली. स्त्रियांनाही किंबहुना, स्त्रियांनाच करतां येण्याजोगें हिंदुस्थानांत राजकीय क्षेत्रांत किती तरी कार्य आहे हें राष्ट्राच्या निदर्शनास त्या चळवळींत आलें. दारुबंदी, मीठसत्याग्रह,

सभाबंदीचा हुकूम तोडणें—वगैरे असहकारितेच्या व कायदेभंगाच्या कार्यक्रमांत पुरुषांच्या बरोबरीनें हिंदी स्त्रियांनीं धडाडीनें व चिकाटीनें काम केलें. हजारों स्त्रिया हंसत तुरुंगांत गेल्या. त्यांचें स्त्रीत्व कुठल्याही कार्याच्या आड आलें नाहीं. त्यांनीं आपलीं घरें सोडलीं, आपल्या तान्ह्या अर्भकांची माया तोडली; कित्येक स्त्रियांनीं तर जेलखान्याला प्रसूतिगृह बनवण्याची वेळ आली तरीही मागें पाऊल घेतलें नाहीं. गांधींसारख्या राष्ट्रीय, माननीय पुढाऱ्यांनीं स्त्रियांच्या कामगिरीबद्दल प्रशंसोद्गार काढले. मूठभर सुजाण स्त्रिया व शेंकडों अडाणी स्त्रिया इतकें कार्य करूं शकल्या ! मग सर्व स्त्रिया ज़र सुशिक्षित व सुबुद्ध बनतील, पडद्याच्या व पारतंत्र्याच्या कोंडींतून बाहेर पडून स्वावलंबी बनतील तर त्या किती तरी जास्त प्रमाणांत केवढें राष्ट्रोद्धाराचे काम पार पाडतील !

---

प्रकरण १४ वें : : :

## .... .... हिंदी स्त्रिया व आर्थिक स्वातंत्र्य

स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य हा आजकालचा एक अत्यंत वादग्रस्त विषय होऊन राहिला आहे. पाश्चात्य देशांमध्यें प्रत्यक्ष व्यवहारांत हा प्रश्न सुटून, स्त्रिया मिळवत्या होऊन, नाना प्रकारच्या धंद्यांतून त्यांनीं आपला प्रवेश करून घेतला आहे. रशियादि देशांत तर ही आर्थिक स्वतंत्रता अगदीं कळसास पोंचली आहे. उलट जर्मनींत व इटलींत तिला उतरती कळा लागली आहे. स्त्रिया पुरुषांच्या कर्तव्यक्षेत्रांत घुसल्या व त्यामुळे पुरुष बेकार राहूं लागले, तेव्हां स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्याची गरज नाहीं; पत्नी व माता या दृष्टीनें त्यांनी आपलीं कर्तव्ये करावीं म्हणजे झालें—या जुन्या तत्त्वज्ञानाचा नवीन पुरस्कार पुन्हां जोरानें करावयास या दोन राष्ट्रांनीं सुरुवात केली. या दोन राष्ट्रांचें प्रतिगामी धोरण तेथील विशिष्ट समाज व राज्यघटनेचा परिपाक असें समजून अपवादात्मक म्हणून बाजूला सारलें तरी असें दिसून येईल कीं, इतर राष्ट्रांतूनही तात्त्विक दृष्ट्या या प्रश्नाचा खल अजून चालूच

आहे. प्रत्यक्ष व्यवहारात स्त्रिया नाना धंद्यांतून पुरुषांच्या बरोबरीने अर्थोत्पादन करू लागल्या तरी, त्यांनीं असें करणें हें मानव जातीच्या अंतिम कल्याणाचे आहे किंवा कसें; या आर्थिक स्वातंत्र्याचा गृहसौख्य, गृहसंस्था, अपत्यसंगोपन यांवर काय परिणाम होईल याविषयी अजूनही अनेक समंजस व विचारवंत लोक साशंक आहेत. हिंदुस्थानांत या प्रश्नाला नुकतेच तोंड लागत असल्यामुळे याविषयक उत्कंठा जास्त तीव्र व जागृत आहे.

स्त्री ही आर्थिक दृष्टया स्वावलंबी असावी किंवा नसावी या प्रश्नाचें फार सुंदर व मौलिक विवेचन *Women and Economics* या पुस्तकांत **Charlotte Gilman** यांनीं केले आहे. त्यांच्या विचारसरणीच्या आधारानें पुढील चर्चा करण्यांत आली आहे.

मानवसृष्टि सोडून भोवतालच्या जीवनसृष्टीकडे नजर फेकून त्यांच्या जीवनक्रमाचे व जीवितयात्रेचे सूक्ष्म अवलोकन केले असतां असे दिसून येते कीं, कोणत्याही जीवकोटींत, पशूंत किंवा पक्ष्यांत मादी ही नरावर सर्वस्वीं उदरभरणासाठीं अवलंबून नसते. मानवी स्त्रीप्रमाणे पशुपक्ष्यांच्या मादीलाही पुढची पिढी जगांत आणावयाची व वाढवावयाची असतेच. पण या कर्तव्यामुळे मानवी स्त्रीप्रमाणे इतर व्यवहारात ती अपंग व निरुपयोगी होऊन बसत नाहीं. ती स्वतःचे उदरभरण तर करतेच, पण बहुतांशी आपल्या पिलांचेही करते. पोटाशीं पोर घेऊन निर्धोकपणे या झाडावरून त्या झाडावर उड्या फेंकीत पानें व फळे कुरतडणाऱ्या वानरीला पाहिलें म्हणजे 'माझें मूल तान्हें' म्हणून हातपाय गाळून, निष्क्रिय बनून घरांत बसून राहणाऱ्या मानवी मादीबद्दल करुणा, कींव व तिरस्कार उत्पन्न होतो. हा विचित्र परावलंबीपणा कुठल्याही जीवकोटीत मानवाखेरीज आढळत नाही. लैंगिक भेदाचा फायदा घेऊन ऐतखाऊ बनण्याची ही विलक्षण व कांहीशी किळसवाणी पद्धत फक्त सुधारलेल्या मानवांतच आहे.

याप्रमाणे मानवी स्त्री ही निष्क्रिय व आळशी असते, व ती पुरुषावर उदरंभरणासाठीं सर्वस्वी अवलंबून असते, हे विधान खोडण्यासाठीं आतां कुणी असे म्हणेल कीं, "स्त्री ही निष्क्रिय कशी म्हणतां येईल? सकाळपासून सध्याकाळपर्यंत घरकामांत मरमर मरणारी स्त्री, पुरुषाच्या जीवावर फुकट खाते असे कोण म्हणेल? शेतकरी लोकांत, कुळवाडी, मजूरवर्गांत तर स्त्री ही

घरकामाशिवाय बाहेरच्या कामावरही किती तरी खपते व पुरुषाला हातभार लावते.'' परंतु सूक्ष्म विचारांती असे दिसून येईल कीं, हे विधान हेत्वाभासात्मक आहे. स्त्री ही पुरुषाचा गुलाम असते व तो तिला पोसतो ही गोष्ट खरी आहे; आतां ती हे परावलंबी जीवन जगत असतां कुठलें व किती काम करते याचा संबध तिच्या या परावलंबी जिण्याशीं प्रत्यक्ष पोंचू शकत नाही. उदाहरणार्थ, एकादा गृहस्थ एक कुत्रा बाळगतो व त्याला दूध, भाकरी, बिस्किटे, मांस वगैरे आपल्या ऐपतीप्रमाणे व हौसेप्रमाणे खाऊ घालतो. हा कुत्रा मालकावर सर्वस्वी अवलबून असतो; तो मालकाची मालमत्ता, त्याचा गुलाम असतो. आतां जर कुणी असे म्हणूं लागेल की, "अहो, हा कुत्रा कांहीं परावलंबी किंवा आर्थिक दृष्टया धन्याचा गुलाम नाहीं. तो आपल्या भाकरीसाठीं किती खपतो पहा! घरांतल्या चिमण्या पोरांबरोबर चेंडू खेळतो; जाणत्या मुलांच्याबरोबर सोबत म्हणून शाळेत जातो. आल्यागेल्यावर भुंकतो, उंदीर, मांजर कंपाउंडांतसुद्धां फिरकू देत नाही. तेव्हां तो निष्क्रिय व आळशी आहे असे म्हणूं नका.'' यावर वरीलच उत्तर दिलें पाहिजे. कुत्रा गुलाम आहे व परावलंबी आहे. धन्याच्या मर्जीवर त्याचे पोट अवलबून आहे ही गोष्ट मुळांत सत्य आहे. मग तो दिवसभर त्या अन्नाबद्दल धडपड करो किंवा आपल्या तरटाच्या तुकड्यावर दिवसभर तणाणून झोपा काढो! तो काय काम करतो याचा व त्याच्या गुलामगिरीचा कांही सबंध नाहीं. हीच गोष्ट मानवी स्त्रीच्या बाबतींत पूर्णांशाने खरी आहे. स्त्री ही पुरुषाचा गुलाम आहे व आर्थिक दृष्टया परावलंबी आहे. ती किती काम करते, मालकाच्या किती उपयोगी पडते या गोष्टी अगदीं अलग आहेत. त्यामुळे तिचे मालकाशी असलेलें नातें बदलत नाही किंवा गुलामगिरीच्या शृंखला कमजास्त जड होत नाहींत.

संसारांतील स्त्रीच्या या दुय्यम दर्जामुळे एकंदर जगाच्या किंवा मानववंशाच्या प्रगतीशीं स्त्रीचा प्रत्यक्ष असा कधींही सबंध येत नाहीं. पुरुषांच्या साधिक प्रयत्नाने वंश किंवा जाती भरभराटीस येतात; त्यांची आर्थिक उन्नति केवळ पुरुषाच्या प्रयत्नाने होते; पण स्त्रीचा घरापलीकडील जगाशीं स्वार्थापलीकडील परमार्थाशीं कांही संबंध येत नाहीं. तिचा संबंध व व्यवहार फक्त पुरुषाशीं व पुरुषासाठीं असतां "He for God only and She for God

in him " हे अनादि तत्त्व अद्यापपावेतों जगावर राज्य करीत आहे. स्त्रीला कधीं बाहेरच्या जगांत किंवा आर्थिक व्यवहारांत हातभार लावण्याचा प्रसग आलाच, तरी तिचें काम नेहमीं दुय्यम व किरकोळ स्वरूपाचें असतें. खरी महत्त्वाची कामगिरी नेहमीं पुरुषाच्या बाहुबलावर आधारलेली असते. उदाहरणार्थ, पुरुष सपत्ति मिळवण्याचे मुख्य काम करतो, व नंतर तिचा फक्त व्यय, स्त्री, पुरुषाच्या मर्जीनुरूप करते; किंवा कधीं कधी पुरुषच स्त्रीसाठीं सपत्तीचा व्यय करतो. स्त्री ही आपल्या मालकीची वस्तु म्हणून ममतेने, तर कधीं ती समाजांतील आपल्या दर्जाचे व वैभवाचे एक प्रतीक म्हणून पुरुष स्त्रीवर संपत्ति खर्च करतो. अमक्यातमक्याची बायको म्हणून ती समाजांत ओळखली जाते; यासाठी पुरुष तिला उंची वस्त्रे, अलंकार, मोटर, दासदासी वगैरे देतो.

खरी परिस्थिति ही अशी आहे. तरीही पुष्कळ वेळां संसार हा एक भागीदारीचा व्यवहार आहे अशी खुळी समजूत पुष्कळ लोकांत आढळते. दोन चाकांवर चालणारा संसारशकट ही कल्पना अजून पुष्कळांना रम्य व सत्य वाटते. स्त्रीचा हक्क संसारांत पुरुषांच्या बरोबरीनें आहे; निदान स्त्री उभयतांच्या संसारासाठी केलेल्या श्रमांच्या जोरावर हा अर्धमालकी हक्क प्रस्थापित करते असे पुष्कळ लोक मानतात. पण ही कल्पना कशी खोटी आहे हे आपण वर पाहिलेंच. स्त्री ही कितीही नटूनथटून, मोटारींतून मिरवली, 'आमच्या जमिनी, आमचें घर', अशा गप्पा मारीत असली तरी वस्तुतः तिची सत्ता घरांतील एका काडीवरही नसते व पुरुष तिला तसा अधिकार कधीही गाजवू देणार नाही. Ibsen च्या *Doll's House* मधील नोराप्रमाणें प्रत्येक स्त्री ही आपल्या संसारांतील फक्त एक बाहुली असते; तिचा चालविता बोलविता धनी वेगळाच असतो. तो कधीं तिला प्रेमाने कुरवाळील, गोजारील, तर कधी रागाने झुगारील व पायाखाली तुडवील. त्याच्याविरुद्ध हू कीं चू करण्याची तिला हिंमत नसते; कारण ती पुरुषावर रोजच्या मध्यान्हींच्या वेळसाठी अवलबून असते; ती त्याची आशाळभूत असते. म्हणूनच म्हण पडली आहे की, 'पावसाने झोडले व नवऱ्याने मारले तर फिर्याद कोणाकडे करावयाची!' पुरुष हा संसारांतील स्त्रीचा सर्वसत्ताधिकारी, तिच्या सुखदुःखाचा मालक; त्याच्या पलीकडे तिला फिर्याद करायला जागा कुठे असणार? सारांश अशी परिस्थिति असतांना स्त्री ही संसाररथाचे एक चक्र आहे, वगैरे गप्पा

फोल आहेत. संसार हा एक आर्थिक व्यवहार आहे. या व्यवहारांत भागीदारीचा हक्क मिळवण्यास आर्थिक स्वरूपांतच भांडवल, मोबदला किंवा भाग घातला पाहिजे. स्त्री अशी प्रत्यक्ष आर्थिक मदत संसारांत कांहींही देत नाहीं. यामुळे ती घरांत काबाडकष्ट करते, मुलांबाळांची जोपासना करते, नवऱ्याचे आयुष्य सुखमय बनवते, आपल्या प्रेमाच्या जोरावर मोठमोठीं जबाबदारीचीं कामें पार पाडण्याचा उत्साह व कर्तबगारी त्याच्या अंगीं निर्माण करते वगैरे गोष्टींनीं तिची नवऱ्याच्या संसारांत आर्थिक भागीदारी प्रस्थापित होणें शक्य नाहीं.

स्त्री ही घरकामांत खपते, म्हणून तिला पैसे मिळवण्यासाठी बाहेर खपणाऱ्या नवऱ्याच्या बरोबरीनें, घरांत मालकी असते हे म्हणणें दुसऱ्याही एका कारणासाठीं खरें नाहीं. ते कारण म्हणजे तिनें केलेल्या श्रमांचा तिला मिळणाऱ्या मोबदल्याशीं सम प्रमाणांत मेळ बसत नाहीं हें होय. पुरुष बाहेर कारखान्यांत म्हणा, शेतांत म्हणा, कचेरींत म्हणा, जितका खपेल जितकीं अधिक जबाबदारीची कामे करील, तितका त्याला जास्त मोबदला मिळेल. पण घरांत गरिबाची बायको, चोवीस तास नाना प्रकारचे कष्ट, दळण-कांडण, धुणेंपाणी, मुलांबाळांच्या खस्ता खात असतांना, तिला मोबदला म्हणून नवरा आपल्या शिलकींतून दोन जरा जास्त झुळझुळीत लुगडीं किंवा एकादा जास्त ठळकसा दागिनासुद्धां देऊं शकत नाहीं. तेंच श्रीमंताची बायको; नुसता किल्ल्यांचा भरगच्च घोंस कमरेशीं खोवून दिवसभर मिरवते, तर तिला नटाथटायला भरपूर साधनें, मोटर वगैरे मोबदला म्हणून मिळतें ! या मोबदल्याच्या विषम प्रमाणामुळे या गोष्टी स्त्रीच्या श्रमाचा मोबदलाच ठरत नाहींत, व म्हणून घरकामामुळे आर्थिक भागीदारीवर ससारांत स्त्रीला कधींही हक्क सांगतां येणार नाहीं.

घरकामाचा मुद्दा याप्रमाणे खोडून निघाल्यावर स्त्रीची ससारांतील भागीदारी प्रस्थापित करूं पाहणारे लोक असें म्हणतात कीं, घरकाम वगैरे मुद्दे गौण आहेत. स्त्री ही पुरुषाच्या बरोबरीनें संसाराची मालक मानली पाहिजे; कारण ती मातृपदाची कठिण जबाबदारी कसोशीनें पार पाडते. स्वतःच्या प्रकृतीचे, आरोग्याचें, तारुण्याचे मोल देऊन कुटुंबसातत्य व वशसातत्य टिकवणाऱ्या स्त्रीला नुसता बरोबरीचा हक्कसुद्धां पुरुष ससारांत देणार नाहींत काय !

या मुद्द्यालाही वरीलप्रमाणेच आर्थिक मूल्यमापनाची कसोटी लावून बघितले तर त्याचा फोलपणा दिसून येईल. मातृपदावर जर स्त्रियांचा हक्क आधारावयाचा तर मातृपदाची जबाबदारी जितक्या प्रमाणांत त्या पार पाडतील तितक्या प्रमाणांत भागीदारीचे हक्क त्यांना मिळाले पाहिजेत. आर्थिक भागीदारीचें हें मूलतत्त्वच आहे. ज्याचे जितके भांडवल तितका त्याचा भागीदारीचा हक्क, पण हे तत्त्व येथेंही लागू पडत नाहीं. जिला जितकी जास्त मुलें, तितका तिचा भागीदारीचा हक्क ससारांत जास्त असे कोठें दिसते व्यवहारांत? उलट याविरुद्धच प्रकार याही बाबतीत दिसून येतो. मातेला जितकीं मुलें जास्त तितक्या प्रमाणांत तिची आर्थिक संपन्नता व सुखसोयी कमी; जितकीं स्त्रीला मुले कमी होतील, तितकीं सुखसोयीचीं साधनें तिला जास्त मिळतील. जर स्त्री माता मुळी झालीच नाही तर तिला नवऱ्याच्या संसारांत मोबदला म्हणून कांहीच मिळत नाहीं असेंही व्यवहारांत आढळत नाहीं. वंध्या स्त्रीही इतर लेकुरवाळ्या स्त्रियांप्रमाणेच लेते, मिरवते व अधिकार गाजवते. मग मातृपदामुळें स्त्रीचा संसारांत भागीदारीचा हक्क प्रस्थापित होतो असे कसे म्हणतां येईल ?

उलटपक्षी हा मुद्दा काढणारांना असेंही उत्तर देतां येईल कीं, मातृपद हें एक अतिशय उच्च, पवित्र कर्तव्य आहे; अशा उच्च भूमिकेवरून त्याला वर्णिल्यावर नंतर त्याची किंमत स्त्रीला ससारांत मिळणाऱ्या अन्नवस्त्रानें करणे म्हणजे त्या पवित्र मातृपदाचा अपमान करणें नाहीं काय ?

एकदरींत कुठल्याही दृष्टीने पाहिले असतां, स्त्रीची आर्थिक भागीदारी पुरुषाच्या संसारांत प्रस्थापित होऊ शकत नाही. कारण स्त्री ही सपत्ति कमावीत नाहीं व वांटीतही नाही, नुसती उपभोगिते. घरकाम, मातृपद या गोष्टी आर्थिक हक्क मिळवून देऊं शकत नाहींत.

नंतर कांहीं लोक असे म्हणतात कीं, " स्त्री ही अर्थ कमावीत नाहीं हें आम्हांस कबूल आहे, पण ती पैसा कां नाहीं कमावूं शकत? ती निसर्गतःच दुबळी आहे किंवा बुद्धीनें कमी आहे म्हणून नव्हे, तर मातृपदाची कठिण जबाबदारी तिला सांभाळावी लागते म्हणून. प्रजाधारण व अपत्यसंगोपन यांत तिच्या आयुष्यांतील उत्तमोत्तम वर्षे खर्ची पडतात. वंशसातत्यासाठीं ती निष्क्रिय बनून आर्थिक गुलामगिरी पत्करते, तेव्हां तिचे उदरंभरण करणें,

तिला पाळणें, पोसणें हें पुरुषाचें कर्तव्यच आहे. तिचें पोट भरून तो तिच्यावर कांहीं मोठा उपकार करतो असे नाहीं. स्त्रीचा हक्कच आहे त्याच्यावर. ''

परंतु ही भूमिका किती हास्यास्पद व लाजिरवाणी आहे हें आपण वर पाहिलेच आहे. पशुपक्ष्यांमध्यें नरमादी बरोबरीनें हिंडतात, फिरतात, भक्ष्य मिळवतात, स्वसंरक्षण करतात; मादीचे मातृपद तिच्या इतर कर्तव्यांच्या आड येत नाहीं. उलट ती स्वतःचें पोट भरून आपल्या पिलांचेही भरते. मग मानवी मादीनेंच मातृपदाचा एवढा बाऊ करून हातपाय गाळून कां बसावे ?

शिवाय वस्तुतः असे दिसून येते की, मानवी स्त्री ही बाहेरच्या व्यवहाराला निरुपयोगी होऊन जाते. घरांतल्या घरांत डांबून पडते, ती कांहीं केवळ अपत्यासाठीं नाही. सकाळपासून रात्रीपर्यंत ती राबत असते, ती काय सारी अपत्याकरितांच ? खरोखर पाहिले असतां तिच्या काळाचा व शक्तीचा मोठा भाग घरांतील पुरुषाच्या सेवेत खर्च होत असतो. बाप, भाऊ, दीर, सासरा, नवरा यांचीं लहानमोठी अनंत कामे करण्यांत तिची शक्ति व काळ झिजत असतो, आणि आर्थिक दृष्टया तर या साऱ्या कालापव्ययाची काडीचीही किंमत नसते. तेव्हां मातृपदामुळे स्त्री बाहेरच्या व्यवहाराला निरुपयोगी होते हें म्हणणे खोटे आहे. घरकामांत गढलेल्या बिचाऱ्या मातेला कधीं आजारी पोरांकडे सुद्धां पुरेसे लक्ष देण्यास वेळ होत नाहीं, व त्यामुळे किती तरी बालके मृत्युमुखीं पडतात किंवा जन्माचीं अपंग, अशक्त होऊन बसतात. बरें ज्या स्त्रियांना घरकामाचा व्याप नाहीं त्या सधन स्त्रिया तरी अपत्यसंगोपनांत आपला सारा काळ खरचतात काय ? कधीच नाही. श्रीमंत मुले नेहमीं आयांच्या गळ्यांत नसतात; आईला त्यांच्याकडे पाहण्यास सुद्धां वेळ नसतो. स्वतःचें वैभवप्रदर्शन, खेळ, क्लब, कांहीं थोडी दिखाऊ समाजसेवा, सभा, व्याख्याने यांत ती गढून गेलेली असते. तेव्हां स्त्री ही अपत्यसंगोपनामुळें घरांत अडकून पडते व म्हणून पुरुषाने तिला पोसलेच पाहिजे, तो तिचा हक्क असून त्याने ती परावलंबी ठरत नाहीं हें म्हणणे सर्वथैव खोटे आहे. शिवाय स्त्रीचा मातृपदाचा काल वीसपासून पंचेचाळीसपर्यंत सुमारें पंचवीस वर्षे धरला तरी बाकीचीं वर्षे ती आर्थिक परावलंबित्व कां पत्करते हा प्रश्न शिल्लक उरतोच.

एकूण काय, स्त्री ही अनेक प्रकारे घरांत खपत असली तरी आर्थिक दृष्टया ती पुरुषाचा गुलामच ठरत असून, पोटासाठीं त्याच्यावर अवलंबून

असते हेंच शेवटीं खरे ठरतें. तिचा आर्थिक दर्जा, तिच्या नवऱ्याची तो एक मालकीची वस्तु या नात्यावर समाजांत ठरतो; तिच्या स्वतःच्या कर्तृत्व-शक्तीवर किंवा लायकीवर ठरत नाहीं. याप्रमाणें मानवी सृष्टीमध्यें स्त्रीपुरुषांचे आर्थिक नाते त्यांच्या लैंगिक संबंधावर आधारलेले असतें. समाजांत स्त्रीचा दर्जा खालचा गणला जाण्याचे हे एक कारण होय. शिवाय समाजाच्या प्रत्येक घटकाकडून जीं कर्तव्यें समाजाच्या हितवर्धनार्थ केलीं गेलीं पाहिजेत, तीं कर्तव्यें स्त्रीकडून पार पडलीं जात नाहींत हेही स्त्रीच्या हीन दर्जाचें दुसरे एक कारण होय.

समाजामध्यें प्रत्येक व्यक्तीवर दोन तऱ्हेच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये असतात. एक स्वसंरक्षण (Self-preservation) व दुसरें वंशसातत्य (Reproduction). वंशसातत्यासाठी लिंगभेदाची योजना केली गेली. नरमादीच्या ठिकाणी परस्परांविषयी लैंगिक आकर्षण वंशसातत्याच्या सौकर्या-साठीं निसर्गानें ठेवलें. पण हें लैंगिक आकर्षण फक्त वंशसातत्याला उपयोगी पडण्यापुरतेंच नेमस्त प्रमाणांत उभयतांचे ठिकाणी असलें पाहिजे. पशुपक्ष्यां-मध्यें हे आकर्षण असेंच मर्यादित स्वरूपांत आढळतें. उदाहरणार्थ, मोराचा पिसारा किंवा काळवीटाचीं शिंगे हीं मादीला आकर्षण्यासाठी असतात; त्यांचा विस्तार स्वसंरक्षणाला विघातक होईल एवढा कधींच होत नाही. प्रत्येक नरमादीच्या ठिकाणी याप्रमाणे लैंगिक आकर्षण जरूरीपुरते असून बाकीचे स्वसंरक्षण व स्वधारणा याला लागणारे गुण भरपूर असतात. पण मानवी सृष्टींत निराळाच प्रकार आढळतो. मानवी स्त्रीमध्यें आकर्षणासाठी ठेवलेल्या मार्दव, लालित्य, नाजुकपणा इत्यादि गुणांची अतिशयोक्ति होऊन त्याचा परिणाम म्हणजे स्वसंरक्षण व स्वधारणा यांना लागणारे गुण ती गमावून बसली, व त्यामुळे बाहेरच्या व्यवहाराला निरुपयोगी ठरली. स्वधारणेला स्वतंत्रपणे समर्थ नसल्यामुळे आपल्या ठिकाणचे लैंगिक आकर्षण हेच स्व-धारणेचे साधन तिने बनवून टाकले आहे. या अनैसर्गिक परिस्थितीमुळें स्त्रीचा वैयक्तिक अधःपात होत असून त्याचा परिणाम पुढील पिढीवर झाल्याशिवाय राहात नाहीं. यामुळे मनुष्यजाति किंवा मानववंश हा हळूहळू स्वधारणेंत दुर्बल होत चालला असून, फक्त लैंगिक आकर्षण व वंशसातत्य यांमध्येंच पारंगत बनत चालला आहे. मोठमोठ्या संस्कृती व वंश रसातळाला जात

आहेत; याचें कारण मानवी स्त्री ही स्वसरक्षणाला असमर्थ होऊन स्वपोषणासाठीं लैंगिक आकर्षणावर अवलंबून राहते हेंच होय. मानव जातीमध्यें स्त्रिया या फक्त माता व त्यामुळें अबला, असूर्यंपश्या अशा नाजूक बनल्या आहेत. पशुपक्ष्यांतील मादीबद्दल 'अबला मादी' हा शब्द वापरण्याचें आपल्या मनांतही कधीं येत नाही; कारण स्वसरक्षण व प्रजाधारण ही दोन्ही एकसमयावच्छेदेकरून करण्यास ती समर्थ असते. प्रजाधारणामुळें मानवी स्त्रीप्रमाणें स्वसंरक्षणाच्या बाबतींत ती दुबळी व परावलंबी होत नाही. आमच्या हिंदु समाजांत तर स्त्रीचा परावलंबीपणा अगदीं कळसास पोचलेला असतो. लहानपणापासूनच मुलीच्या मनावर बिंबवले जातें की, तिचा जन्म लग्न करण्यासाठीं व मुलें होण्यासाठी आहे. स्वधारणाक्षम करण्यासाठी तिला शिक्षण देण्याचें कोणाच्या मनांतही येत नाहीं. मात्र तिच्या अंगी लैंगिक आकर्षण वाढत्या प्रमाणांत यावें म्हणून तिला कलाकौशल्य, सौंदर्यसाधन व जमल्यास शाळाकॉलेजांतील दिखाऊ शिक्षण देण्यांत येतें. दुर्दैव हें कीं, ती पुढे माता व्हायची म्हणून मातृपदाला योग्य तें शिक्षण देण्याचेंही कोणाला सुचत नाहीं! फक्त तिच्या आकर्षक स्त्रीत्वाचा उत्कर्ष करण्याकडे आईबापांचें लक्ष असते. यामुळें स्त्रीचा वैयक्तिक अधःपात तर होतोच, पण ज्या वंशसातत्यासाठीं तिचा जन्म आहे असें मानण्यांत येतें, त्या वंशसातत्यावरही तिच्या अधःपाताचा व दुबळेपणाचा परिणाम झाल्याशिवाय राहात नाही.

मानवजाति स्वतःला आपण फार सुधारलेली आहों असें मानते. ही सुधारणा स्वधारणाविषयक (Self-preservation) असणार; कारण वंशसातत्य पशुपक्ष्यांमध्येंसुद्धां समानांशानें आढळतेंच. मनुष्य हा पशुपक्ष्यांपेक्षां किती तरी पट उत्कृष्ट रीतीनें स्वधारणा करू शकतो—तो शिक्षण घेतो व देतो; राज्यकारभार चालवतो; निरनिराळे उद्योगधंदे करून अर्थोत्पादन करतो व सुखसोयी वाढवतो;—अशी मानवजातीची प्रौढी आहे. पण या सर्व स्वधारणेच्या उत्कृष्ट कार्यांत मानव स्त्रीचा मात्र कुठेंच भाग नाहीं. सर्व सुधारणा व प्रगति यांचा एकट्या पुरुषवर्गानेंच मक्ता घेतला आहे. स्त्री फक्त वंशसातत्याचें, यांत्रिक, पशुतुल्य काम सांभाळीत आहे. ही अशी वांटणी करण्यामध्यें, पुरुषांचाच हात नाहीं काय? या अन्यायाच्या जोडीला दुसरा अपमान म्हणजे १९ व्या शतकापर्यंत युरोपमध्यें स्त्री ही एक 'मनुष्य'

(Human individual) आहे, असेसुद्धां मानण्यास पुरुष कबूल नव्हते. ते तिला फक्त एक सत्तेचा गुलाम, घरकाम उपसणारे व वंश चालू ठेवणारे निर्जीव यंत्रच का म्हणाना, समजत असत. १९ व्या शतकांत स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ जेव्हां सुरू झाली, तेव्हां स्त्रीपुढाऱ्यांना पहिले काम जर कोणतें करावें लागलें असेल तर ते हे कीं "स्त्रियाही 'मनुष्य'च आहेत," हे सिद्ध करणें व माणुसकीच्या जबाबदाऱ्या व हक्क यांची मागणी करणें. हिंदुस्थानांत तर स्त्रियांची ही 'माणुसकी'ही अजून समाजाच्या कित्येक थरांत पटलेली नाही; मग हक्क व जबाबदाऱ्या स्त्रियांना देणे दूरच राहिले!

हा पक्षपात व अन्याय स्त्रियांवर निसर्गाने खात्रीनें केलेला नाहीं. पशु-पक्ष्यांप्रमाणे मनुष्यजातीतही प्रथमावस्थेत किंवा रानटी स्थितींत स्त्री ही पुरुषां-प्रमाणेंच चपळ व सर्व व्यवहार सांभाळणारी अशी होती. मातृपदाची जबाब-दारी संभाळून ती स्वतःसाठी भक्ष्य मिळवी. तिच्या कृपेसाठी व प्राप्तीसाठीं दोन पुरुष एकमेकांशी झगडू लागले असतां, ती शेजारीं उभी राहून मजा पाही व जेत्याला आपली कृपा बहाल करी. पण पुढें कांहीं काळाने पुरुष हा स्त्रीला मालकी हक्काने आपली करायला शिकला. स्त्रीसाठीं दुसऱ्या बलवान् पुरुषांशीं युद्ध करण्यापेक्षां स्त्रीशीं झगडून तिला आपली गुलाम करणें पुरुषाला फायदेशीर वाटू लागलें. हक्काबरोबर जबाबदाऱ्या आल्याच. गुलाम बनलेल्या स्त्रीला पोसणें, तिच्या मुलांचे पोषण करणें, याचा भार तो वाहू लागला. स्त्रीला आपल्या उपजीविकेसाठीं राबण्याचे प्रयोजन नाहींसे झाल्याबरोबर, ती नाजुक, आळशी, निर्बळ माता अशी बनून राहिली. तिचा स्वयंनिर्णया (Natural Selection) चा हक्कही संपला. पुरुष तिच्या कृपेसाठीं न झगडतां उलट आतां तिलाच पुरुषाचें मन आकर्षण करण्यासाठी खटपट करावी लागूं लागली; कारण पुरुष हाच तिचे आतां उपजीविकेचें साधन बनला. विवाहानंतरही ज्या लैंगिक आकर्षणाचे मोहावर पुरुष तिला खुबीने सुखांत व चैनीत ठेवतो, तें लैंगिक आकर्षण कायम राखण्याची व वाढवण्याची तिची खटपट चालू असतेच. वेश्यावृत्तींत उदरनिर्वाहासाठीं लैंगिक आकर्षण वाढवण्याची खटपट करणें हें तत्त्व आपल्याला उघड दिसते व एक प्रकारची जुगुप्सा वाटते; पण लग्नसंस्थेच्या व कुटुंबसंस्थेच्या मुळाशींही हेच तत्त्व आहे, हें सूक्ष्मपणें विचार केला असतां ध्यानांत येईल.

याप्रमाणें स्त्रीचे घराबाहेरचे कर्तृत्व संपून ती चार भितींच्या आंत बदिवान् होऊन पडली. "A woman should leave her home, but three times,—when she is christened, when she is married and when she is buried." "The woman, the cat and the chimney should never leave the house." अशा प्रकारच्या म्हणी वस्तुस्थिति सार्थपणें दर्शवितात. स्त्रीच्या कर्तृत्वाला पायबद पडतांच ती एक काबाडकष्ट करणारी भारवाहक प्राणी बनली. लग्न ही स्त्रीची इतिकर्तव्यता ठरली; जिचेलग्न होत नाहीं तिची थट्टा, टवाळी, तिरस्कार होऊं लागला. या लोकनिंदेच्या भीतीनें जो भेटेल त्याच्या गळयांत आपले पोटचे गोळे बांधून व या प्रकारें त्यांच्या पोटापाण्याचा प्रश्न सोडवून, आईबाप निश्चिंत होऊं लागले; पण स्त्रियांचे जीवन मात्र दिवसेंदिवस जास्त दुःखमय होऊं लागलें. गुलामगिरी ती गुलामगिरी; आणि तीही वाटेल त्याची, वेळेनुसार एकाद्या तिरस्करणीय व्यक्तीचीही ! ही स्थिति किती यातनामय असेल बरें !

एकोणिसाव्या शतकाच्या मध्यभागापासून स्त्रीस्वातंत्र्याच्या कल्पनेचा पश्चिमेकडे उदय झाला व हळुहळू आंदोलनाला यश येऊन, आर्थिक स्वातंत्र्य कांहीं प्रमाणांत स्त्रियांच्या पदरांत पडून त्या खऱ्या स्वतंत्र झाल्या. पुरुषांप्रमाणेंच पोटासाठी स्वतंत्रपणे काबाडकष्ट करण्याची त्यांना परवानगी मिळाली. स्त्रियांनाही कष्टाची, उन्हातान्हांतली ओली कोरडी भाकर, लग्नाच्या गुलामगिरींतील पक्वान्नापेक्षां जास्त रुचू लागली, व म्हणूनच अविवाहित व म्हणून श्रमी, कष्टी जीवन, सुखासीन गुलामगिरीतील वैवाहिक जीवनापेक्षां त्यांना जास्त रुचूं लागलें; एवढया एका गोष्टीवरूनच त्याचे वैवाहिक जीवन किती यातनामय व परतत्र म्हणून तिरस्करणीय बनले होतें हे सहज लक्षांत येईल. पुरुष नेहमीं आश्चर्याने म्हणतात, "आम्ही काबाडकष्टाच्या बाहेरच्या नोकरीला कंटाळतों. ही गुलामगिरी आम्हांला नकोशी वाटते; आणि आधुनिक स्त्री तर मोठया अभिमानाने व हव्यासाने ती कवटाळू पाहते हे आश्चर्य नव्हे काय? आम्हांला जर बायकांसारखें स्वस्थ घरीं बसून दुसऱ्याच्या जीवावर खायला मिळालें तर पोटासाठी बाहेर सतत काबाडकष्ट करण्याचा विचार आमच्या स्वप्नींही कधी येणार नाही." पुरुष असे म्हणतात, कारण वैवाहिक, आर्थिक गुलामगिरीचा खरा अर्थ काय आहे

याबद्दल त्यांनीं कधीं खोल विचार केला नाहीं व ती परिस्थिति प्रत्यक्ष अनुभवली नाहीं; पण स्त्रिया अनंत शतकांच्या कटु अनुभवानें केवळ भोगदासी म्हणून निष्क्रिय जीवनाचा गोड घास खायला विटल्या आहेत. यामुळेंच अलीकडे मुळींच लग्न न करतां अविवाहित व स्वतंत्र राहण्याची प्रवृत्ति स्त्रियांमध्यें वाढत्या प्रमाणांत, पाश्चिमात्य समाजांतून आढळत आहे. या नवीन प्रवृत्तीनें अनेक समाजशास्त्रज्ञ बिचकतात व " या आधुनिक स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीनें वंश खुंटेल तेव्हां ही चळवळच अनिष्ट आहे व तिचा बींमोड वेळींच केला पाहिजे." असे प्रतिपादितात. पण त्यांनीं असें चिंताकुल होण्याचें कारण नाही. स्त्रियांमधील सध्यांची प्रवृत्ति ही केवळ पूर्वींच्या परिस्थितीची प्रतिक्रिया आहे. स्त्रियांची स्वातंत्र्याची भूक कितीही तीव्र झाली तरी त्यांच्या हृदयांतील वात्सल्याचा झरा व Protective instinct कधींही आटून जाणें शक्य नाहीं. तेव्हां या प्रतिक्रियेला बुजून न जातां, समाजाचे अर्धे अंग परावलंबी पारतन्त्र्यांतून मुक्त झालें; हा संबंध राष्ट्राच्या उन्नतीला शुभशकून आहे असें ओळखून आनंद मानला पाहिजे. हिंदुस्थानांतील लोकांनीं तर स्त्रियांच्या स्वातन्त्र्यांदोलनाबद्दल दुप्पट सहानुभूति बाळगली पाहिजे. कारण गुलामगिरीचे बीज इकडे स्त्रियांच्या अंगांत आहे तसें पुरुषांच्याही आहे. पुरुषांच्या व एकंदरींत सर्व राष्ट्राच्या स्वातंत्र्याबद्दल खटपट सुरूच आहे, पण ते मिळण्यास कालावधि लागणार; स्त्रियांचे स्वातंत्र्य हस्तगत करणें हिंदी स्त्रीपुरुषांच्या थोडी तरी स्वाधीनची गोष्ट आहे व म्हणून ते लौकर मिळेल, व मिळाल्यास सर्व राष्ट्राच्या हिताम कारणीभूत झाल्याशिवाय राहणार नाहीं. असो.

परंतु अद्यापि पुष्कळ लोकांना स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याचे नवीन खूळ पटत नाहीं. वंशवृद्धि, बालसंगोपन हे स्त्रियांचे मुख्य कर्तव्य; आर्थिक स्वातन्त्र्यामुळे याची आबाळ होईल असे या लोकांना वाटते व पवित्र मातृपदाचे गोडवे गाऊन, स्त्रियांनीं मातेच्या उच्च जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठीं आर्थिक गुलामगिरी स्वीकारावी--मग ती लैंगिक पायावर असली तरी चालेल--असा त्यांना आग्रह करण्यांत येतो. मातृपदाच्या उच्चतेबद्दल किंवा पावित्र्याबद्दल दुमत होणें शक्यच नाहीं. पत्नीला गुलाम म्हणून तुच्छ लेखणारा हिंदु पुरुषसुद्धां ' माता ' या स्वरूपांत तिला अतिशय मानतो. ' न स्त्री स्वातंत्र्य-

मर्हति ' असे उद्गार काढणारे शास्त्रकारसुद्धां अन्यत्र ' हजार गुरूंपेक्षां माता श्रेष्ठ आहे ' असा तिचा गौरव करतात. परंतु या मातृपदविषयक हळुवार भावना जरा बाजूला ठेवून मातेच्या कर्तव्याविषयीं व जबाबदारीविषयीं आपण जरा तार्किक व शास्त्रीय पद्धतीने विचार करूं. ज्या मातृपदासाठी स्त्रिया आज शतकानुशतकें गुलाम बनून राहिल्या ते मातृपद त्यांनी कितपत कसोशीनें व हुषारीनें सांभाळलें आहे तें आपण प्रथम पाहिलें पाहिजे. पशुपक्ष्यांदिकांत माता ही केवळ मातृपदाला वाहिलेली नाही. ती नराच्या बरोबरीनें स्वोदरभरण व चिल्ल्यापिल्ल्यांचें पोषण करते हे आपण पाहिलेच. पण मानवी माता जर केवळ मातृपदाला वाहिलेली आहे, तर मातृपदाची जबाबदारी तिनें पशु-पक्ष्यांच्या मादीपेक्षां किती तरी पटीनें जास्त उत्कृष्ट रीत्या पार पाडली पाहिजे. स्त्री ती तशी पार पाडीत आहे काय?

मातृपदाच्या जबाबदारीचे दोन भाग पाडतां येतील. वंशसातत्य व वंश-विकास (Reproduction and Improvement). स्त्रीनें प्रजा उत्पन्न केली पाहिजे व तीत उत्तरोत्तर सुधारणा होईल असा यत्न केला पाहिजे. म्हणजे तिनें आपले वंशीय कर्तव्य (Racial Function) योग्य बजावल्यासारखें होईल. वंशसातत्यांत प्रजासंगोपन व प्रजावर्धन येते व वंशविकासांत शिक्षणाचा प्रादुर्भाव होतो. मातेचें कर्तव्य प्रजोत्पत्तीबरोबर किंवा बालसंगोपनानंतर संपत नसून, मुलांना योग्य शिक्षण देऊन त्यांना ' बापसे बेटा सवाई ' बनवणें हेंही आहे.

आतां केवळ पहिल्या कर्तव्याबद्दल, प्रजोत्पत्तीबद्दल, विचार केला तर असें म्हणतां येईल कीं, मानवी मातेनें प्रजेला जन्म देण्याच्या कार्यांत पशुपक्ष्यांच्या मादींपेक्षां विशेष सुधारणा केलेली किंवा आघाडी मारलेली दिसत नाहीं. पशु-पक्षी वंशसातत्याचे काम अत्यंत सहजपणे व यशस्वितेनें करतात. पशुपक्ष्यांची मादी ही नेहमीच सशक्त, निरोगी, अशी आढळते. उलट मानवी मातेमध्ये मातृपद हें हजारों रोगांशीं व तज्जन्य दौर्बल्याशीं जसे कांहीं निगडित होऊन गेलें आहे. पशुपक्ष्यांचीं पिलेंही जन्मतःच निरोगी व बळकट असतात; उलट मानवी अर्भकें दुबळीं व नाना रोगांचे भक्ष्यस्थान होऊन राहिलेलीं असतात. यावरून असें स्वच्छ म्हणावयास हरकत नाहीं कीं, सुधारणेचा व उच्च संस्कृतीचा डौल मिरवणाऱ्या माता या पशुपक्ष्यांच्या माद्यांपेक्षां फार कमी दर्जाच्या

आहेत. अडाणी समजल्या जाणाऱ्या समाजाच्या खालच्या थरांतील माता, रानटी व पहाडी जातींतील शेतकरी व मजूरवर्गांतील माता यासुद्धां 'सुधारलेल्या' मातांपेक्षां जास्त स्वकार्यक्षम असतात. साधारणपणें असें म्हणतां येईल कीं, जोंपर्यंत स्त्री ही मातृपदाचा बाऊ न करतां त्याला सारे जीवन वाहून न घेतां इतर कामें करीत राहते, तोपर्यंत ती मातृपद सहजपणे व विनायासें सांभाळू शकते. पण सुधारलेल्या स्त्रिया मातृपदासाठींच आपला जन्म आहे असे मानू लागल्या, त्या कार्यावर आपली सारी कर्तृत्वशक्ति केंद्रित करूं लागल्या कीं, त्या माता या दृष्टीनें दुबळ्या व नालायक झालेल्या दिसतात. याप्रमाणे केवळ शारीरिक दृष्टया विचार केला असतां, मानवी मातेनें इतर जीवसृष्टीपेक्षां प्रजोत्पत्तीच्या बाबतींत कांहीं उल्लेखनीय सुधारणा किंवा प्रगति करून दाखवलेली आढळून येत नाहीं; मग तिनें मातृपदासाठी आज अनंतकाल आपल्या कर्तृत्वशक्तीचा होम कशासाठीं केला व तो तिने तसाच पुढें कां चालू ठेवावा!

आतां आपण मातृपदाच्या दुसऱ्या जबाबदारीकडे वळू या. कोणीं असे म्हणेल कीं, निसर्गाच्या अज्ञात व अकल्प्य संकेतानें मानवी माता व मानवी संतति जरी इतर जीवसृष्टीपेक्षां दुबळी ठरत असली तरी त्या शारीरिक दुबळेपणाची सारी भरपाई मानवी माता आपल्या उच्च कोटीच्या बुद्धिमत्तेने खात्रीनें करील. पशुपक्ष्यांचा सारा कारभार अंतःप्रेरणेवर (instinct) चालतो; पण मानवी मातेला सारासार विचारशक्ती (reason) ची देणगी मिळालेली असते. तिचा विनियोग जर तिनें प्रजासंवर्धनाकडे केला तर मानवी संतति जीवसृष्टीपेक्षां किती तरी उच्च व उत्कृष्ट खात्रीनेंच होईल.

परंतु वस्तुस्थिति पाहतां काय दिसते? जगाचे पाऊल जेवढ्या झपाट्याने पुढे पडावयास पाहिजे तितके ते खात्रीने पडत नाही. जगांत चांगल्यापेक्षां वाईटाचेच प्रमाण जास्त आढळते. याला जबाबदार कोण? एकादा माणूस चांगला निघाला, शिवाजी, नेपोलियन झाला, कीं आपण त्याच्या मातेचा गुणगौरव करतो. परंतु जे अनेक अधम, नीच, मृत्पिण्डबुद्धि लोक होऊन गेले, त्यांच्या दुर्गुणाला किंवा गुणहीनतेला जबाबदार कोण? त्यांच्या माताच नाहींत काय? तरी मातांची किती तरी कर्तव्यें आजकाल राष्ट्रीय बनलीं आहेत. मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न सुधारलेल्या राष्ट्रांतून सरकारनें आपल्या कक्षेत घेतला आहे. अगदीं लहान वयापासून मुलांची

शारीरिक वाढ निकोप कशी होईल, त्यांचा मानसिक व बौद्धिक विकास उत्तम रीतीनें कसा होईल, ते उत्तम नागरिक कसे बनतील, शिक्षण पुरें झाल्यावर त्यांचा राष्ट्रहितासाठीं उपयोग कसा करून घेतां येईल, इत्यादि अनेक प्रश्न प्रगमनशील राष्ट्रांत सरकारचे किंवा सार्वजनिक होऊन बसले आहेत. याप्रमाणें मातृपदाच्या जबाबदारीचा दुसरा भाग (improvement of the race) बराचसा त्यांच्या हातून गेलाच आहे. उरली सुरली जबाबदारीही जगाच्या एकंदर होणाऱ्या मद प्रगतीवरून स्त्रिया मोठ्याशा उत्कृष्ट रीतीनें पार पाडतात असे दिसत नाही. मग मातृपदाच्या जबाबदारीच्या सबबीवर, निष्क्रियपणे पुरुषांचे आर्थिक गुलाम बनून त्यांनीं कां राहावे ?

बरें ज्या मातृपदासाठी अर्धी मानवी जात, याप्रमाणे बाह्य व्यवहारापासून अलग केली जाते, त्या मातृपदासाठी योग्य ती तयारी तरी स्त्रिया करतात काय? मुळींच नाही. किंबहुना अशा तयारीची कांही जरूरी आहे ही गोष्ट समाजाच्या ध्यानीमनींही अजून आलेली नाहीं. या बाबतीत व्यक्ति व समाज दोन्हीही अगदी पूर्णपणे बेफिकीर राहतात. प्रत्येक मुलीला पुरुषाचे मन आकर्षण कसे करून घ्यावे याचे फार तर शिक्षण, समाज देववील; नट्टापट्टा, नखरा कसा करावा हे मुलीला शिकवण्यांत येईल; किंवा हिंदु कल्पनेप्रमाणे आपलें मन, इच्छाशक्ति दाबून नवऱ्याला तनमनधन कसे वाहावें याची शिकवण मुलींना देण्यांत येईल. पण उत्कृष्ट माता कसे व्हावे याबद्दल मात्र कांही सांगायशिकवायचे कुणाच्या स्वप्नांतही येत नाही. उलट लैंगिक व प्रजाजननविषयक गोष्टी मुलीपासून चोरून लपवून ठेवण्यांत येतात, व त्या कठिण, नाजुक कर्तव्याच्या दरीत त्याना अचानक लोटून देण्यांत येते. ‘अंगावर पडले म्हणजे कांहीं शिकवावे लागत नाही, सगळे आपोआप येते’ असे शास्त्र या बाबतीत सांगण्यांत येतें. मुले वाढवण्यासारखी अत्यत जोखमीची कठिण व नाजुक गोष्ट, याप्रमाणें अतःप्रवृत्तीवर सोपवणे शहाणपणाचे आहे काय? पशुपक्ष्यांची व रानटी लोकांची अंतःप्रेरणेवर मदार असते व त्यांच्या स्थितीला ते ठीकच आहे. पण निसर्गाला जिंकून उत्तरोत्तर अतिमानव बनण्याची महत्त्वाकांक्षा जी मनुष्यजात बाळगते, तिचे वंशवर्धनाचे व वंशविकासाचें महत्त्वाचें कार्य अंतःप्रवृत्तीवर सोपवून कसें चालेल? अंतःप्रवृत्तींमुळें

मानव माता आपल्या लेकरांवर पराकाष्ठेचें प्रेम तेवढें करते; पण नुसतें अंधळें अडाणी प्रेम मुलांच्या हिताला कितीसे उपयोगी पडणार?

पूर्ण पूर्वतयारी केल्याशिवाय मातृपदाची जबाबदारी अंगावर घेणें, नवे जीव जन्मास घालून त्यांना उत्तम रीतीनें वाढवण्याची जोखीम घेणें, हा खरोखर अत्यंत गभीर स्वरूपाचा एक गुन्हा मानला पाहिजे; पण प्रत्येक मानवी माता सालोसाल हा गुन्हा करीत आहे, व समाजाला याची दखलही नाहीं. एंजिनियरिंगच्या शास्त्राची माहिती घेतल्याशिवाय कुणी घरे, पूल वगैरे बांधण्याच्या गप्पा मारू लागला तर समाज त्याला वेडा ठरवील. योग्य वैद्य-कीय शिक्षणाशिवाय कोणी औषध देऊ लागला, तर डॉ. गिल्डरच्या नवीन बिलाप्रमाणें मुंबई इलाख्यांत तो गुन्हा ठरेल; पण आई कसे व्हावे, मुलें कशीं वाढवावीं, याचे यत्किंचितही ज्ञान नसलेल्या लहानमोठया मुलींची लग्ने मात्र समाज हौशीने हजारांनीं लावतो, व त्या माता होत असल्याचा सोहळा उत्साहानें बघतो. पहिली तीनचार मुलें अशिक्षित, अननुभवी, अतज्ज्ञ मातेच्या प्रयोगांना बळी पडतांना पाहून समाजाचे हृदय विदारत नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट नाहीं काय? कमी शिकलेल्या व जरूर त्या परीक्षा न दिलेल्या मास्तरच्या हाताखाली आम्ही मुले शिकावयास ठेवण्यास तयार नाही, कमी दर्जाची परीक्षा दिलेल्या वकिलाकडे आम्ही आपला खटला देणार नाहीं; पण आपल्या विषयाचा ओनामाही न शिकलेल्या अडाणी मुलीच्या कच्च्या व असंस्कृत मनःप्रवृत्तीच्या ताब्यांत आम्ही आमची पुढील पिढी, आमचें वंश-सातत्य, आमचा वंशविकास मात्र खुशाल देतों! हे केवढे आश्चर्य व केवढा अधळेपणा! आणि याच्याहून मोठे आश्चर्य म्हणजे असे हें अर्धकच्चें अंधळे मातृपद सांभाळण्यासाठी आम्ही आमच्या मुलीना पुरते शिक्षणसुद्धां घेऊ देत नाही व सुजाण कर्तबगार स्त्रियांनासुद्धां घराचा उंबरठा ओलांडूं देत नाहीं. अर्ध्या समाजाची शक्ति निरुपयोगी, कुजत ठेवून आम्ही काय साधतो तर हे अंधारांत चाचपडणारे, शंभर ठेचा खाल्ल्यावर एखादें पाऊल बरोबर टाकणारे असंस्कृत, अडाणी, मातृपद!

याप्रमाणे मातृपद सांभाळण्यासाठीं स्त्रियांनी आर्थिक स्वातंत्र्य झुगारून देऊन घरांत कोंडून पडणें हें किती निरर्थक व वेडेपणाचें आहे हें आपण पाहिलें. सध्यांच्या परिस्थितीत स्त्रिया आर्थिक स्वातंत्र्य मिळवून समाजाचे

उत्तम घटकही बनत नाहींत व उत्तम माता बनून समाजाची व मानववंशाची सेवाही करीत नाहींत.

स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याविरुद्ध दुसरा असा एक मुद्दा पुढें आणण्यांत येतो की, स्त्री ही जर पैसा मिळवण्यासाठीं दिवसभर पुरुषासारखी घराबाहेर राबूं लागली तर गृहव्यवस्थेची काय वाट होईल ? आमच्या गृहरूपी नंदनवनाचें उजाड वाळवट होईल! मुलेंबाळें वणवण फिरतील, घरांत वेळेवर दिवासुद्धां लागणार नाहीं. थकलेभागलेले पुरुष विश्रांतीसाठी घरी येतील तर घरांत गृहलक्ष्मीचाच पत्ता नसेल; किंवा त्यांच्यासारखीच तीही दमूनभागून आलेली असेल; यामुळे पुरुष करमणुकीसाठी घराबाहेर पडतील व वाईट मार्गाला लागतील. घरांत उधळपट्टी सुरू होऊन बायको संसारांत भर म्हणून मिळवीत असलेला पैसा उगीच चोरापोरी व नोकरांच्या कारभारांत संपून जाईल. त्यामुळें घरांत व एकंदरीनें समाजांत बजबजपुरी माजेल. तेव्हां गृहदेवतेने कुठल्याही कारणासाठीं आपलें गृहदेवतेचे स्थान सोडता कामा नये.

ही तक्रार प्रथमदृष्टया रास्त वाटते. ‘घर’ हा शब्द प्रत्येक मनुष्याला अत्यंत प्रिय वाटतो. ‘घर’ या संस्थेत आज शतकानुशतकें मनुष्य रुळत आला आहे व त्यामुळे घराविषयींच्या त्याच्या कल्पनेला धक्का लावणे अशक्यप्राय होऊन बसलेलें आहे. घर ही संस्था एका किंवा अनेक स्त्रियांच्या आत्मयज्ञावर अधिष्ठित असते. स्त्रियांची सुधारणा करण्याच्या गोष्टी निघाल्या कीं अर्थात्च ‘घर’ डळमळूं लागते. स्त्रियांचे आर्थिक स्वातंत्र्य, त्यांचे व्यक्तिमत्व प्रस्थापित करावयाच्या कल्पना चर्चेस निघाल्या कीं, समाज घाबरून जातो; “हे नवीन खुळेचार स्त्रियांना शिकवूं नका, नाहीं तर आमचीं घरें बसतील, आमची कुटुंबसंस्था धुळीस मिळेल” असा आक्रोश पुराणमतवादी लोक करूं लागतात.

पण कुटुंबसंस्थेच्या नांवावर स्त्रीच्या व्यक्तित्वाचा होम करणे हा केवळ पुरुषाचा आपलपोटेपणा आहे. हे संस्थेबद्दलचे प्रेम नसून स्वतःबद्दलचे, आपल्या ऐंद्रिय सुखाबद्दलचें प्रेम आहे. गृहसंस्था व कुटुंबसंस्थेइतक्याच अनेक जुन्या संस्था समाजानें आजवर अवहेलिल्या असतील. उदाहरणार्थ, पुरोहितसंस्था घ्या. पुरोहित हा वेदकालाइतका पुराण व पूज्य मानला

पाहिजे. पण या पुरोहितांना आजकाल कितीसे पुरुष आदराने वागवतात? त्यांना शिव्यांच्या लाखोल्या घालून त्यांची सावली उंबऱ्यावर पडूं न देणारे पुरुषच आजकाल समाजांत अधिकांशाने आढळतात. या वेळीं पुराणसंस्थाभिमान कोठें जातो समाजाचा? 'राजा' ही संस्था किती जुनी आहे! आम्ही हिंदु 'ना विष्णुः पृथिवीपतिः' असे मानणारे. पण आम्हीच आतां सर्वसत्ताधीश, वैभवशाली राज्याधिपतीची टवाळी करून लोकशाहीचा व समाजसत्तावादाचा उदोउदो करूं लागलों ना! मग कुटुंबसंस्था किंवा गृहसंस्था अर्ध्या समाजाच्या उद्धारासाठी जर लोपून जाऊ लागली तर एवढे दुःख कां व्हावें? जर स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्यामुळे त्यांचे व समाजाचे अंतिम हितच होते, ही गोष्ट सिद्ध आहे तर वैयक्तिक सुखाला लालचावून स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याविरुद्ध ओरड करणे पुरुषांना शोभत नाहीं.

शिवाय कुटुंबसंस्था मूळ कां अस्तित्वांत आली व तिचे जे रम्य स्वरूप कल्पिण्यांत येते, ते तसेच व्यवहारांत उतरते किंवा नाही याही गोष्टींचा विचार केला पाहिजे. बरेचसे लोक लग्नसंस्था व कुटुंबसंस्था या कल्पनांची सरमिसळ करून टाकतात. लग्न म्हणजे मुलें व मुले म्हणजे कुटुंब. तेव्हां कुटुंब किंवा गृहसंस्थेचा नाश झाला तर लग्न या संस्थेला धोका पोंचेल व सगळीकडे अनीति माजेल, या भीतीनें हे लोक कुटुंबसंस्थेला व स्त्रियांच्या परावलंबी जीवनाला चिकटून राहण्याचा प्रयत्न करतात; पण ही कल्पना चुकीची आहे. लग्न लागले व मुले झाली तरी कुटुंब या संस्थेतच तीं वाढलीं पाहिजेत असा समाजाचा व पुरुषांचा आग्रह कां? एका बाईनें सतत चोवीस तास घरकाम व मुलांच्या खस्ता यांत खर्च केले म्हणजेच मुलांची योग्य वाढ होते असे आहे की काय? कुटुंबसंस्थेबाहेर मुलांची योग्य जोपासना जर होत असली, पुरुषांच्या व मुलांबाळांच्या खाण्यापिण्याची योग्य व जास्त उत्कृष्ट व्यवस्था जर लागत असली तर मग कुटुंबसंस्थाच पाहिजे असा आग्रह कां? कुटुंब ही संस्था समाजाच्या बाल्यावस्थेत अपत्यांच्या संगोपनासाठीं अस्तित्वांत आली खरी. रानटी व विस्कळित समाजांत संघटनेची पहिली पायरी म्हणून कुटुंबसंस्था ही अत्यंत स्तुत्य व उपयुक्त होती. परंतु आतां संघटित राष्ट्राची व्यापक कल्पना अस्तित्वांत आल्यावर कुटुंबाची आकुंचित कल्पना उराशीं कां कवटाळून बसावे? कुटुंब या संस्थेमध्ये आर्थिक व

लैंगिक कल्पनाची सरमिसळ झाल्यामुळे स्त्रिया आर्थिक दृष्टया गुलाम बनतात; याप्रमाणें अर्धा समाज नामशेष व लुलापांगळा झाल्यामुळे राष्ट्र हिणकस व दुबळे बनत जाते या गोष्टी लक्षांत आल्यावर तरी कुटुबसंस्था झुगारून देणे इष्ट नाहीं काय?

शिवाय कुटुंबाचे किंवा गृहाचे जे रम्य व उपयुक्त स्वरूप आरंभीं कल्पिले होते किंवा अजून वर्णिलें जाते ते व्यवहारांत दृष्टीस पडतें काय? ‘गृह’ ही अनेक काव्याचा, प्रबधाचा विषय होऊन राहिलेली, अनेक नाजूक व हळुवार भावनांच्या धाग्यादोऱ्यांनी विणलेली एक सुंदर कल्पना आहे. ‘गृहा’शिवाय मनुष्यमात्राचे चालणार नाही व गृह सुदर, निरोगी व उपयुक्त बनवणे हे प्रत्येक स्त्रीचे कर्तव्य आहे असे मानण्यांत येते. ‘गृहराज्य’ किंवा ‘इंग्रज मनुष्याचे घर म्हणजे त्याचा एक किल्लाच असतो’ या कल्पनेंत जी स्वास्थ्याची, सुखासमाधानाची भावना सूचित होते ती व्यवहारांत प्रत्येक घरांत दिसते काय? स्त्री ही खरोखरच गृहसाम्राज्ञी असेल व आपलें छोटेंसे गृहराज्य त्यांतील लोकांच्या हितासाठी व सुखासाठीं यशस्वितेने चालवीत असेल, तर या कर्तव्यासाठीं तिनें घरांत जन्मभर अडकून पडणें क्षम्य ठरेल; नाही तर राष्ट्राच्या अर्ध्या शक्तीचा विनाकारण अपव्यय होत आहे असे म्हणावे लागेल.

या गृहराज्यांतल्या राज्यव्यवस्थेविषयी लेनिनने एकदां असे उद्गार काढले होते की, (Women's domestic life is a daily sacrifice amidst a thousand insignificant trifles) “स्त्रियांचा सारा जन्म ज्या घरकामांत फुकट जातो, ते घरकाम किंवा गृहव्यवस्था म्हणजे हजारो किरकोळ गोष्टींचा केवळ एक पुजका असतो,” आणि ही गोष्ट सर्वथैव खरी आहे. बायका घरकाम करतात म्हणजे काय काय करतात? पुष्कळ वेळी पुरुष उपेक्षेनें ‘तुम्हां बायकांना काहीं काम नसते’ असे म्हणतात किंवा “पंधरा रुपयाचा स्वयंपाकी व दहा रुपयांचा एक नोकर घरांतील सारी कामें करतो; त्या गृहिणीपदाचा एवढा बाऊ बायका उगीचच करतात” असे म्हणण्यांत येते; त्यांत सत्याचा बराच अंश आहे. घरकामांत क्षुल्लक गोष्टीची घासाघीसच फार असते व सगळा जन्म या बारीकसारीक कामांत वेचून त्याबद्दल कांहीं श्रेय किंवा कृतज्ञताबुद्धि पुरुषांकडून स्त्रियांना मिळत नाहीं ती नाहींच.

आतां कुटुंबसंस्थेंत कुटुंबासाठी जे व्यवहार स्त्री करते, ते कुटुंबाला

कितपत फायदेशीर व हितकारक होतात हें पाहू. पाश्चात्य कुटुंबांत प्रत्येक स्त्री ही आपल्या लहान कुटुंबाकरितां धान्य, भाजी, दूध वगैरे खरेदी करते. हिंदुस्थानांत बहुतेक कुटुंबांतून बाजारहाट पुरुषच सांभाळतात. तेव्हां धान्या-धुन्याची परीक्षा करून, उत्तम जिन्नस योग्य दरांत कसा घ्यावा हें ज्ञान हिंदु स्त्रीस नसतेच. वस्तु विकत घेण्याचें महत्त्वाचें काम पुरुषच करितात. स्त्रिया फक्त पुरुष जे घरी आणून टाकतील ते शिजवून त्यांना वाढतात. पश्चिमेकडे बायका बाजारहाट करून घरांतील सर्व व्यवस्था ( house-keeping ) पाहतात. पण तिकडेही स्त्रिया हे व्यवहार मोठ्या कसोशीने किंवा फायदेशीर-पणानें करतात असें नाहीं. एक तर प्रत्येक गोष्ट कुटुंबाच्या आग्राप्रमाणे व गरजे-प्रमाणे अतिशय थोड्या प्रमाणांत प्रत्येक स्त्रीला खरीदावी लागत असल्यामुळें वस्तु महाग व वाईट लागते. बऱ्याचशा मालाची मोठ्या प्रमाणावर खरेदी करणाराला जो सवलतीचा भाव व उत्तम माल मिळतो तो थोडा थोडा माल घेणाऱ्या प्रत्येक गृहिणीला कसा मिळणार ? शिवाय गृहिणीला प्रत्येक उत्तम वस्तूची परीक्षा, चढत्या उतरत्या दरांची माहिती वगैरे शास्त्रशुद्ध बाजार-हाटाचें ज्ञान बेताचेंच असतें. प्रयोग करीत करीत, चुकतमाकत ती शिकत असते. पण तिच्या शिक्षणाची जबरदस्त फी पैशाच्या तोटयाच्या व प्रकृतीच्या हानीच्या रूपानें बिचाऱ्या नवऱ्याला व मुलांना द्यावी लागते. हे झालें मालाच्या खरेदीविषयी. गृहिणीच्या जबाबदारीचा दुसरा भाग म्हणजे घरांत आलेला माल शिजवून नवऱ्याला व मुलांना घालणे. हे तरी गृहिणी नीट बजावीत आहे काय? जगांतील मृत्यूची वाढती संख्या, नाना रोगांचा प्रादुर्भाव, प्रजेत दिसणारें उत्तरोत्तर वाढते शारीरिक दौर्बल्य हीं खात्रीनें स्त्रियांच्या कर्तबगारीचीं सर्टि-फिकिटें नव्हत. पहिल्या बाबतीप्रमाणेंच याही विषयाचा गृहिणीनें शास्त्रीय रीत्या अभ्यास व विचार केलेला नसतो; ती चुकतमाकत, शिकतां शिकतां कुटुंबाचें स्वास्थ्य व आरोग्य दिवसेंदिवस खालावत जातें. स्त्रिया आपल्यापरी याप्रमाणे घरकामांत चोवीस तास मरतात त्या मरतात, आणि पुरुष व मुलें, मात्र असंतुष्ट व रोगी तीं रोगीच राहतात.

यावरून असे दिसून येईल कीं, ज्या दोन कर्तव्यांसाठीं—मातृपद व गृहिणीपद—स्त्रिया सध्यां गृहसंस्थेत व आर्थिक गुलामगिरींत अडकून पडल्या आहेत, तीं कामें त्यांच्याकडून योग्य रीतीनें होत नाहींत व तीं तशीं होणें

शक्यही नाहीं. प्रत्येक स्त्री ही यशस्वी माता, उत्तम स्वयपाकी, उत्कृष्ट शिंपी, हुषार माळी,—वगैरे सर्वच कशी होऊं शकेल? प्रत्येक बाईकडून प्रत्येक काम उत्कृष्ट व्हावे अशी फोल आशा बाळगण्यापेक्षां, ज्या तज्ज्ञांनीं या निरनिराळ्या कामांत कौशल्य संपादलें आहे त्यांच्याकडेच जर हीं कामें सोंपविलीं व सार्वजनिक स्वरूपाचीं करून टाकलीं तर तीं कामें उत्कृष्ट होतील; व स्त्रिया स्वतंत्र व्यवसायाला रिकाम्या होऊन, आर्थिक स्वातंत्र्य मिळवतील व राष्ट्राच्या सपत्तींत भर घालतील.

रशियाने ही सुधारणा मोठ्या प्रमाणावर अमलांत आणली आहे. झारशाहीचा अस्त होऊन सोव्हिएटची सत्ता स्थापन झाल्यावर, राष्ट्राच्या पुनरुज्जीवनाच्या कामावर निरनिराळ्या शाखांतून पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांची योजना करण्यांत आली. या नवीन परिस्थितींत स्त्री ही दिवसभर घरकाम करीत बसणे शक्यच नव्हते. तसेच लग्न करून तिनें मुलांना जन्म दिला तरी त्यांना वाढवीत बसण्यास, त्यांचे गू-मूत काढण्यास तिला दिवसभर सवड होणें शक्य नव्हते. तेव्हां राष्ट्राने बालसंगोपन व खाणेपिणे या दोन गोष्टींची सहकारी तत्त्वावर व्यवस्था करण्याचे काम स्वतःकडे घेतले. प्रचंड प्रमाणावर आरोग्यदृष्ट्या उत्तम चालविलेली भोजनगृहे काढून राष्ट्राने बायकांची चुलत सासूपासून सुटका केली; आधुनिक उपकरणांनीं युक्त व पूर्ण शास्त्रीय तऱ्हेने चालवलेलीं बालसंगोपनगृहें काढून बायकांना बालसगोपनाच्या जिकीरीच्या जबाबदारींतून मोकळे केले. भोजनगृहांतून जेवणाची व्यवस्था जास्त शास्त्रीय, उत्कृष्ट व स्वस्तांत होते व प्रत्येक घरकुलांत चूल व मूल यासाठी प्रत्येक बाईचा फुकट जात असलेला जन्म वांचतो! ही कर्तृत्वशक्ति दुसऱ्या उपयुक्त व राष्ट्रहितकारक अशा कामी वेचतां येते. तसेच बालसंगोपनगृहांतून, पूर्वीच्या अडाणी मातांपेक्षां किती तरी जास्त उत्कृष्ट रीतीनें मुले वाढवण्यांत येतात. कुटुंबांत वाढलेल्या मुलांचे दोष राष्ट्राने वाढवलेल्या मुलांच्या अंगी दिसत नाहींत. Gilmar च्या मते कुटुंबांत वाढलेलीं मुले आपलपोटीं बनतात. स्वतःचे सुख, स्वतःच्या कुटुंबाचे सुख यापलीकडे त्यांना कांही दिसत नाही. कुटुंबासाठी गुलामासारखी खपणारी आई व बाप आणि स्वतःचे होणारे अवास्तव कौतुक, यामुळे मुलांच्या भोंवती घरांत एक प्रकारचे स्वार्थप्रधान वातावरण पसरलेले असते. त्यामुळे त्यांची वृत्ति स्वार्थी व कूपमंडूकवत् होते. सार्वजनिक बालसंगोपनगृहांत

वाढवलेल्या मुलांची दृष्टि व्यापक होते. सर्वांना सारखी वागणूक मिळत असल्यामुळे एक तर लाडानें मुलें बिघडण्याचा प्रश्नच उरत नाहीं. शिवाय तज्ज्ञांच्या देखरेखीखाली मुले वाढत असल्यामुळे त्यांच्या कर्तृत्वशक्तीचा विकास होऊन तिला योग्य वळण लागतें. नाही तर कुटुबांत एकाद्या स्त्रीला निरोगी व बुद्धिमान् मुलें होतात; पण त्यांच्या अंगभूत गुणांचा योग्य विकास होईल असे शिक्षण देण्याचे ज्ञान आईला नसते, व त्यामुळे ते गुण फुकट जाऊन परिणामी राष्ट्राची हानि होते.

याप्रमाणें गृहिणीच्या व मातेच्या किचकट जबाबदारीतून स्त्रियांना मुक्त केल्यामुळे रशियामध्ये पान-भोजन व बालसंगोपन सुधारलें; स्त्रिया माणसात आल्या व राष्ट्राची कर्तृत्वशक्ति दुप्पट वाढून, राष्ट्राचे पाऊल भराभर पुढे पडू लागले. स्त्रियांमधील न्यूनगंड व गुलामी मनोवृत्ति लोपल्यामुळे पुढील पिढी जास्त स्वतंत्र वृत्तीची व निकोप मनाची निपजेल, यांत शंका नाहीं. प्रत्येक राष्ट्राने रशियाचे उदाहरण पुढे ठेवले पाहिजे व आपल्या समाजरचनेत बदल करून घेतला पाहिजे. आता हे बदल नव्यानव्यानें फार चमत्कारिक वाटतील ही गोष्ट खरी. प्रारभी, प्रयोगावस्थेत चुका होतील; गोंधळ, अव्यवस्थाही कांही काळ माजेल; पण कालातराने ही नवीन व्यवस्था पूर्ण व निर्दोष होऊन राष्ट्राचे खचित कल्याणच होईल. मात्र नावीन्यानें बिचकून न जातां, राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीनें प्रगतिप्रिय व सुधारणाभिमुख बनले पाहिजे.

याप्रमाणे स्त्रियांच्या आर्थिक स्वातन्त्र्याची जरूरी व महत्त्व पाहिले. आतां आर्थिक स्वातन्त्र्य प्राप्त करून घेण्यासाठी, स्त्रियांना कोणकोणते धंदे करतां येण्याजोगे आहेत हे पाहूं.

बडोद्याच्या सुविद्य व स्त्रियांच्या हिताविषयी कळकळ बाळगणाऱ्या श्रीमत महाराणी चिमणाबाईसाहेब यांनीं आपल्या *Position of Women in Indian Life* या सुंदर पुस्तकांत, हिंदी स्त्रियांना कोणते धंदे करतां येण्याजोगे आहेत याबद्दल उद्बोधक चर्चा केली आहे. देशोदेशीची उदाहरणें घेऊन निरनिराळ्या धंद्यांतून प्रवेश करण्यास हिंदी स्त्रियांना कशी संधि व उत्तेजन द्यावे या प्रश्नाची सुंदर चर्चा या पुस्तकांत आली आहे. लंडन सोसायटीज्प्रमाणे मध्यवर्ति Employment Bureau उघडून त्याच्यातर्फे

स्त्रियांना निरनिराळ्या धंद्यांतून काम देण्याची योजना करण्याबद्दल त्यांनीं योग्य सूचना केली आहे. तसेच महाराणीसाहेबांच्या मतें पुढील धंदे स्त्रियांना करतां येण्याजोगे आहेत: शेतकीकाम, बगीच्याचे काम, फार्म प्रोप्रायटरचें काम, डेअरी चालवणें, अडाणी स्त्रियांना प्रवासांत मदत करणे, कोंबड्या बाळगणें, जॅम जेली वगैरे फळांचे प्रिझर्व्हस् बनवणें, फुलें विकणे, समारंभासाठीं सजावटीच्या ऑर्डर्स् घेणे व सजवून देणे, बीबियाणें विकणे हीं सर्व कामें स्त्रियांना निसर्गतःच आवडतील अशी असून, योग्य ते शास्त्रीय शिक्षण मिळाल्यास स्त्रिया तीं पुरुषांपेक्षां जास्त कुशलतेनें करतील. घरगुती अनेक बाबतीत धंदेवाईक रीत्या सल्ला देणे हाही एक किफायतशीर धंदा ठरण्यास हरकत नाही. जेथे पडद्याची चाल आहे त्या प्रांतांत मध्यस्थी करून लग्नें जुळवणें, कायदेकानूंच्या बाबतींत सल्ला देणे हा धंदा बायकांतल्या बायकांत स्त्रिया करूं शकतील. हस्तकौशल्याची सर्वच कामें सुंदर रीतीने स्त्रिया करू शकतील; मात्र अंतःप्रेरणेवर विसंबून न राहतां शास्त्रशुद्ध रीतीने त्यांनीं तें ते कसब व कला शिकून घेतली पाहिजे. शिवणकाम, भरतकाम, रेशमाचे व कलाबतूचे काम, धातूंवर साधे किंवा रंग भरून नकशीकाम करणे, पुस्तकें बांधणे, लेस करणे, कुंभारकाम, विणकाम, कोष्ट्याचें काम, वेताचे काम वगैरे अनेक धंदे स्त्रियांनीं स्वतंत्रपणे अंगावर घेऊन करण्याजोगे आहेत. सध्यां यांपैकीं पुष्कळ धंद्यांत नुसत्या मदतनीस म्हणून अल्प वेतनावर स्त्रिया कामें करतात.

वरील धंद्यांशिवाय पाश्चात्य देशांच्या धर्तीवर व्याख्यात्या म्हणून खेडोपाडीं आरोग्य, बालसंगोपन, भाजीपाल्यांची लागवड वगैरे उपयुक्त विषयांवर सदीप किंवा साधी व्याख्याने देत हिंडणे; डॉक्टर, वकील वगैरे प्रतिष्ठित धंदे करणें; चहाचीं दुकाने, हॉटेले, खाणावळी चालवणे; एकट्या स्त्रियांसाठी राहण्याची सोय असलेली वसतिगृहे उघडणे, क्रेशेस्वर (creches) देखरेख करणे, लहान मुलांना सभाळण्यास व शिकवण्यास राहणें; आरोग्यवेक्षिका (सॅनिटरी इन्स्पेक्टर्स्) होऊन खेडोपाड्यांची आरोग्यदृष्ट्या तपासणी करणे, गिरण्यांच्या स्त्रीशाखा तपासणे, मुलींच्या शाळा आरोग्यदृष्ट्या तपासणे, तुरुंग, इस्पितळें तपासणें, तुरुंगांत स्त्रीशाखे-कडील वॉर्डरचे, डॉक्टरचें काम करणे वगैरे अनेक धंदे सुचवितां येतील. प्रत्येक

धंद्यांतील स्त्रियांचा गट करून संघ (guilds) स्थापन करून त्या धंद्यांतील पुरुषांशीं विरोध न ठेवतां, त्यांशीं सहकार्य करून स्त्रियांना आपली भरभराट करून घेतां येईल.



प्रकरण १५ वें : : :

## .... .... पश्चिमेकडे

मागील चौदा प्रकरणात स्त्रीजीवनविषयक कांहीं ढोबळ प्रश्नांचा विचार केला. आतां एकदर स्त्रीस्वातंत्र्यविषयक चळवळीचा आढावा घेऊन तिची फलश्रुति काय आहे याचा विचार करणें जरूर आहे. हिंदी स्त्रियांनी हें आंदोलन आपल्या पाश्चात्य भगिनींपासून उचलले असे म्हणावयास हरकत नाही; तेव्हां इंग्लंडादि देशांतून स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ कशी उद्भवली, काय तत्त्वावर आधारण्यात आली व तिची फलश्रुति आज-घटकेस काय आहे याचे एकसूत्री सविस्तर विवेचन प्रथम केल्यास हिंदी स्त्रियांच्या चळवळीवर जास्त चांगला प्रकाश पडेल.

आधीं ( Feminism ) स्त्रीस्वातंत्र्य किंवा स्त्रियांचे प्रश्न म्हणजे काय याची व्याख्या करावयाचा प्रयत्न करू. W. L. George यांनीं आपल्या *Woman and Tomorrow* या पुस्तकात या चळवळीचे तत्त्वज्ञान स्पष्ट केले आहे. या चळवळीचे उद्देश तीन प्रकारचे आहेत :—

(१) स्त्रियांचे हितसंरक्षण व हितसवर्धन करणे;

(२) स्त्रियांना सामाजिक व राजकीय हक्क मिळवून देणें;

(३) स्त्रीपुरुषांची समता प्रस्थापित करणे.

आतां पहिल्या उद्देशाला पुरुष असा आक्षेप घेतील कीं, “ स्त्रियांच्या हिताला आम्ही जपत नाहीं काय ? आम्ही दिवसभर मरमर मरतो, ते स्त्रियांसाठींच नव्हे का ? त्यांना घरदार, दागदागिना, वस्त्रप्रावरण मनाजोगे मिळावे, मुलांलेंकरांचे लाड पुरविले जावे, कुटुंबीयांचा भविष्यकाळ दुःखापत्तींत जाऊं

नये म्हणून आधीच तरतूद करून ठेवावी म्हणून आम्ही आमचा सारा जन्म वेंचतो. मग स्त्रियांच्या हिताला जपणाऱ्या चळवळी, सभा, समित्या, कायदे, कशाला पाहिजेत?" यावर W. L. George चे उत्तर असे आहे की, "तसा कुत्र्याचा मालकसुद्धां कुत्र्याला किती जपतो; त्याला चांगलेचुंगले खायला घालतो व त्याला धुतो पुसतो, फिरायला नेतो, मऊमऊ बिछाना त्याच्यासाठी घालतो; पण या सर्व गोष्टीबरोबर रात्रीचे त्याने बंगल्याबाहेर भटकू नये म्हणून त्याला सांखळीने बाधूनही ठेवतो. तो जरा मनाविरुद्ध वागल्यास त्याच्या नाकावर एक चापटही मारतो हे विसरून उपयोगी नाही. पुरुष स्त्रियांच्या हिताला जपतात ते स्त्री ही आपल्या मालकीची एक वस्तु आहे अशा भावनेने;" जसे घरातल्या कुत्र्याला किंवा कांही किंमती सामानाला जपतात तसे. अशा परिस्थितीत स्त्रीच्या व्यक्तित्वाला वाव मिळणे किंवा तिच्या व्यक्तित्वाचा उत्कर्ष होणे शक्य नाही. स्त्रियांच्या चळवळीचा हेतु स्त्रियांचे व्यक्तित्व उज्ज्वल करण्याचा आहे; स्त्रियाना 'मानव' म्हणून स्वतंत्र जिवंत जीवन जगतां यावे यासाठी ही चळवळ सुरू करण्यांत आली आहे; तेव्हां स्त्रियांना हे उद्देश सफळ होण्यासाठीं त्याच्याविषयीं मालकी हक्काची भावना बाळगणाऱ्या पुरुषावर विसंबून राहतां येणार नाही; आपल्या हितसंरक्षणाची चळवळ त्यांनीं स्वतःच अंगावर घेतली पाहिजे.

स्त्रियांची सामाजिक व राजकीय हक्कांची मागणी समतेच्या तत्त्वावर आधारलेली आहे. सध्यां पुरुषांचा स्त्रियांकडे पाहण्याचा दृष्टिकोण दोन प्रकारचा आढळतो. कांही नरपुंगव स्त्री ही कमी अकलेची, शरीरानें दुबळी पण पुरुषांच्या घरसंसाराला आवश्यक असलेली, पण एक कमी दर्जाची वस्तु, अशा तुच्छतेच्या दृष्टीनें स्त्रीकडे बघतात; तर कांही काव्यमय प्रवृत्तीचे लोक स्त्री ही देवता आहे, गृहसाम्राज्ञी आहे, पाळण्याची दोरी हातांत धरून उभय कुलांचा व जगाचा उद्धार करणारी विभूति आहे असे स्त्रीचे गोडवे गात सुटतात. समान हक्क मागणाऱ्या स्त्रियांना हीं दोन्ही अतिशयोक्तीची टोकें नापसत आहेत. त्यांना दासी म्हटलेले खपणार नाही व राज्ञी म्हटलेलें रुचणार नाही. स्त्रिया या पुरुषां-प्रमाणेंच एक साध्यासुध्या 'मनुष्यप्राणी' आहेत, एवढीच मनोमय खूण पुरु-षाला पटवून देणें व या तत्त्वाचे त्याला व्यवहारांत आचरण करावयास लावणे,

ही एवढीच स्त्रीस्वातंत्र्यवादिनीची महत्त्वाकांक्षा आहे. बायकोला मूल कडेवर घेऊन ताटकळत उभे ठेवून आपण आगगाडीत बाकावर ऐसपैस ताणून देणारा पुरुषही तिला नको आहे व स्त्री नाजुक अबला म्हणून आपली जागा रिकामी करून तिला देऊन तिच्यापुढें उभा ठाकणारा भृत्याही तिला नको आहे. बाजूला सरकून थोडी का होईना, पण आपल्याजवळ बसायला जागा बरोबरीच्या नात्यानें स्त्रीला देणारे पुरुष स्वतंत्र स्त्रीला हवे आहेत. सर्व पुरुषांची मनोवृत्ति अशा प्रकारची ज्या दिवशीं बनेल त्या दिवशी स्त्री-स्वातंत्र्याचा जय झाला असे म्हणतां येईल.

समान हक्काचा अर्थ अर्थात् व्यापक रूपाने घेतला पाहिजे. स्त्रीला ती केवळ स्त्री आहे, अशा लिंगभेदामुळे कुठेही मज्जाव असतां कामा नये; हा समान हक्काच्या तत्त्वाचा अर्थ; म्हणजे प्रत्येक स्त्रीने लढाईवर गेलेच पाहिजे असे मात्र नव्हे. असा अर्थ समान हक्काचा करून मग स्त्रियांच्या पलटणी-बरोबर एक सुईणीची तुकडी बाळगली पाहिजे असा पाचकळ विनोद करण्यांत येतो. अशा लोकांना ‘ समान हक्क ’ किंवा ‘ समान संधि ’ या भाषेचें मर्मच कळलें नाहीं असें म्हटले पाहिजे. कुठल्याही पुरुषाला शिपाई होण्याला मज्जाव नसतो; म्हणून सगळेच पुरुष सैनिक झाले आहेत काय ? ज्याला कुवत असेल, हौस असेल, तोच पुरुष लढाईवर जाईल. हीच गोष्ट स्त्रियांच्या बाबतीत खरी आहे. एकंदरीने स्त्रियांची शरीररचना लढाऊ जीवनाला साजेशी नसल्या-मुळे त्यांनी लढाईवर जाणे इष्ट नाही असे स्त्रियांना वाटल्यास त्या कदाचित् मुळींच लढाईवर जाणार नाहीत; तो त्यांच्या वैयक्तिक मर्जीचा प्रश्न आहे. पण पुरुषांनी कायद्याच्या साहाय्यानें राष्ट्रांतील कोणत्याही क्षेत्रांत काम कर-ण्यास त्यांना मनाई करतां कामा नये. स्त्री मनांत आल्यास कुठलेंही काम करूं शकेल अशी मनोमन खात्री पटून सर्व उद्योगधंद्यांचीं द्वारे पुरुषांनीं त्यांना खुषीने खुलीं केली पाहिजेत. रशियामध्यें व स्पेनमध्ये स्त्रिया पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून लढत असल्याचे आपण एकतोच. असेच प्रत्येक क्षेत्रांत पुरुषाच्या बरोबरीने स्त्रीने काम करणे हे ज्या दिवशीं लज्जास्पद किंवा टीका-स्पद होणार नाहीं व कौतुकास्पदही वाटणार नाही, नुसते साहजिक, स्वाभा-विक वाटेल त्या दिवशीं स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ सफळ झाली असे म्हणतां येईल. नुसते भाराभर विवाहविषयक व मालमत्तेच्या हक्काविषयक कायदे पास

करून कांहीं म्हणण्यासारखा फायदा होणार नाहीं. पुरुषांच्या व स्त्रियांच्याही मनोवृत्तींतच पालट पडला पाहिजे.

पण कांहीं स्त्रीस्वातंत्र्यविरोधक असे म्हणतात कीं, " स्त्रीपुरुषांचे हें समानत्व आम्हांला कसे पटणार? स्त्री पुरुषासमान नाही हे प्रत्यक्ष व्यवहारांतच दिसते. उदाहरणार्थ, शेक्सपियर, मिल्टनसारखी एक तरी श्रेष्ठ कवयित्री स्त्रियांत झाली आहे का? बहुतेक सारे मोठमोठे संशोधक पुरुषच आहेत. स्त्रियांमधल्या एकादी अहल्याबाई, लक्ष्मीबाई, जनाबाई, मीराबाई यांच्या आधारावर समान हक्कांचे तत्त्व तुम्ही किती दिवस सावरून धरणार? पुरुषांमध्ये अशा ध्येयव्यक्ती शेकड्याने सांपडतात. " याला असें उत्तर देतां येईल की संधि व योग्य शिक्षण यांच्या अभावामुळे स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने आपल्यामधील थोर नांवे काढून दाखवितां येणार नाहींत खरी; पण योग्य शिक्षण व समान संधि नसतांना सुद्धां एकादी लक्ष्मीबाई, ताराबाई चमकून गेलीच. मग शिक्षण व संधि यांचा लाभ झाल्यास अशा शततारका कशावरून उदयास येणार नाहीत? स्त्रियांना व पुरुषांना मिळत असलेलें शिक्षण व संधि मिळून कांही काळ लोटल्यावर सुद्धां जर त्यांच्यांत पुरुषांप्रमाणे मोठी नांवे चमकलीं नाहीत तरच स्त्री ही पुरुषाहून बौद्धिक व मानसिक बलांत कमी आहे असे विरोधकांना म्हणतां येईल.

दुसरे कांही विरोधक असे म्हणतात कीं, स्त्रियांना समान हक्क देऊन महत्त्वाचीं व जबाबदारीची सार्वजनिक कामें त्यांच्यावर सोपवल्यास अनर्थ होईल. कारण स्त्रियांत स्वभावतःच मानसिक दौर्बल्य, अनुदार मनोवृत्ति, कजूषपणा, डामडौलाची हौस, दूरदर्शित्वाचा अभाव वगैरे अनेक दुर्गुण असतात. स्त्रिया राजकारणांत पडल्यास भावनेनें वाहवत जाऊन भलत्याच माणसास पाठिंबा देतील. त्यांच्या संकुचित मनोवृत्तीमुळें त्या कुटुंबाच्या मोहाने राष्ट्राच्या हिताकडे कानाडोळा करतील व राष्ट्राच्या मोहाने आंतरराष्ट्रीय हितसंबंध उपेक्षितील. आपल्या शास्त्रकारांनी म्हटलेच आहे कीं, स्त्रीबुद्धिः प्रलयकारिणी।

स्त्रियांत हे दुर्गुण आहेत असे आपण वादासाठी घटकाभर धरून चालू या; (पुरुषांत दुर्गुण आढळत नाहींत असे नाही व हे दुर्गुण अगीं नसलेल्या स्त्रियाही पुष्कळ असतात हेही खरे आहे.) पण हे दुर्गुण स्त्रियांच्या अगीं कसे प्रादुर्भूत झाले याची पूर्वपीठिका कुणी विचारांत घेतली आहे का?

स्त्रियांवर असे आरोप करण्यांत आले की, आमचे राज्यकर्ते हिंदवासियांवर जे आरोप करतात किंवा करीत असत ते डोळ्यांपुढें उभे राहतात. गोऱ्या लोकांच्या मते, " नेटिव्ह हा लांचखाऊ, पुढे पुढे करणारा, आपल्या पोळीवर तूप ओढणारा, जबाबदारीची जाणीव न बाळगणारा, कर्तव्यबुद्धिशून्य असा असल्यामुळे तो मोठ्या अधिकाराच्या व जोखमीच्या जागांवर काम करण्यास नालायक असतो." ' आमचे नेटिव्ह ' पुरुष ' गर्जून ' यावर असे म्हणतील कीं, " अनेक वर्षे अंगी मुरलेल्या दास्यवृत्तीचा हा परिणाम आहे. ' आमचे स्वराज्य ' झालें कीं, ही दास्यवृत्ति व त्याबरोबर हे सारे दुर्गुण आम्हांला आपोआपच सोडून जातील." हेच उत्तर स्त्रियांच्या बाबतीतही वरील विरोधकांस देतां येईल. पुरुषां-पेक्षां स्त्रियांना जडलेली दास्यवृत्ति किती तरी वडील आहे. 'ब्राह्मण' कालापासून स्वतःचे व्यक्तित्व गमावून ती पुरुषांची केवळ अर्धांगी होऊन राहिली आहे. ती परावलंबी बनल्यामुळे मोठमोठे व्यवहार अंगावर घेऊन करण्याची तिला वेळच येत नाही. यामुळें तिच्या अंगी कर्तृत्वशक्तीचा, दूरदर्शित्वाचा अभाव आढळून आल्यास काय नवल? जगांतील महत्त्वाच्या गोष्टींतून ती वगळली गेल्यामुळे लहानसहान गोष्टीचे महत्त्व तिला जास्त वाटूं लागून, ती अनुदार, आकुंचित मनोवृत्तीची बनली यांत तिचा काय बरे दोष? स्त्रियांच्या कपाळची गुलामगिरी मिटून तिला पुरुषांच्या बरोबरीने हक्क मिळाले, व समान जबाब-दाऱ्या अंगावर पडल्या म्हणजे परिस्थितीने तिच्या ठायी आलेले वरील दुर्गुण आपोआप लोपतील.

स्त्रियांच्या समाजांतील चढत्याउतरत्या दर्जाचा इतिहास मानववंशा-च्या प्रथमावस्थेपासून Winifred Holtby यांनी आपल्या *Women* या पुस्तकांत थोडक्यांत दिला आहे. J. L. Davies यांचे या विषयावरील *A Short History of Women* हें पुस्तक प्रसिद्धच आहे. मानवी समाज वन्य स्थितींत असतांना स्त्रिया शरीरानें दुर्बळ असल्यामुळें, ( गरोदरावस्थेत व बाळंतपणांत तर विशेषच ) त्यांना पुरुषांपासून संरक्षणाची अपेक्षा असे. हे संरक्षण देणे पुरुषांना कांही मोठेंसे प्रिय नसे; पण त्यांना लढाऊ जीवनांत जरूर असणाऱ्या नवनवीन योद्ध्यांचा पुरवठा स्त्रियांकडून होत असल्यामुळे पुरुषांना स्त्रियांचे रक्षण करणें भागच असे. मात्र कांहींशा नाखुषीनें पुरुष हें संरक्षण देत असल्यामुळे स्त्रियांकडे पाहण्याची पुरुषांची दृष्टि तुच्छतामय,

तिरस्काराची अशी बनली. स्त्री ही आपल्या अंकित आहे, आपल्यावर अवलंबून आहे, अशी मालकीची भावनाही पुरुषांच्या ठिकाणी प्रादुर्भूत यामुळेंच झाली. त्याचप्रमाणे स्त्रीच्या जननशक्तीमुळें तिच्याबद्दल एक प्रकारचें आदरमिश्रित भय व कुतूहलही पुरुषाच्या मनांत निर्माण झाले (Sense of Mystery). स्त्री ही देवता आहे, व स्त्री ही जादुगारीण, डाकीण आहे, अशा भिन्न भिन्न भावना याच Mystery च्या भावनेमुळे निर्माण झाल्या. नारी ही नरकाचे साधन आहे, ही भावना आमच्या वेदान्तांत या 'भयामुळेच' निर्माण झाली असावी. हे झाले मानववंशाच्या प्रथमावस्थेविषयी (Primitive Ages). नंतर इजिप्त, बॅबिलोन, असीरिया या आद्य संस्कृतीच्या इतिहासावरून असे दिसते की, स्त्रियांना या कालांत समाजव्यवस्थेत चांगली मानाची व वजनदार जागा होती (खिस्तशकापूर्वी २३५० वर्षे). बॅबिलोनियाच्या लीगल कोडमधील Laws of Hammurabis वरून असे दिसते की, एकपत्नीव्रताची प्रथा तेव्हां प्रचलित होती. आजारी पत्नीचा योगक्षेम कायद्यानें नवऱ्याला चालवावा लागे. लायक स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य होते. विधवेला नवऱ्याची मालमत्ता व त्याचा समाजांतील दर्जा मिळे. स्त्रिया न्यायाधिशांसारख्या मोठ्या जागांवर कामे करीत; पण स्त्रीच्या कर्जाची जबाबदारी मात्र नवऱ्यावरच असे. व्यभिचारी स्त्रीला पाण्यांत बुडवून ठार मारण्याची शिक्षा मिळे; जर तिच्या नवऱ्याने तिला क्षमा करण्याची तयारी दाखविली, तरच तिचा या भयंकर शिक्षेपासून बचाव होई. देवळांत मुरळ्याही असत व दुसऱ्या टोकाला सार्वजनिक मोठाल्या जागांवरून कामे करणाऱ्या स्त्रियाही असत. मातृपदाविषयींची वन्यकालांतील भीति व जुगुप्सा जाऊन, या कालांत तिच्या ठिकाणी एक प्रकारचा आदर उत्पन्न झाला. इजिप्तमध्ये तर समाज जास्त सुधारलेला व जीवित जास्त सुरक्षित असल्यामुळे स्त्रियांना आणखी जास्त कायदेशीर हक्क व सामाजिक सवलती होत्या. या कालांत राज्यकर्त्या स्त्रियांचीं अनेक नांवे सांपडतात. स्त्रिया राज्यावर बसत व खाजगी मालमत्तेच्या मालक बनत. येथेंही मुरळ्या व गुलाम स्त्रिया होत्याच. इजिप्त देशांतल्या सुधारलेल्या व पुढारलेल्या स्त्रीसमाजांतून पुढे सुखासीन स्त्रियांचा वर्ग निर्माण झाला. काडीचे काम नसल्याने नवऱ्याच्या संपत्तीचे व वैभवाचे प्रदर्शन करण्याची साधनें एवढाच त्याचा उपयोग ठरून राहिला.

याप्रमाणें लढाऊ संकटग्रस्त जीवनांत अडचणीप्रमाणे वाटणाऱ्या, पण शूर योद्धयांना जन्म देणाऱ्या स्त्रिया सुरक्षित, सुधारलेल्या युगांत यशस्वी वीरांच्या केवळ अलकार, भूषणें होऊन राहिल्या. ग्रीक सुधारणेंतही हाच अनुभव आला. पेनेलोपीसारख्या ग्रीक स्त्रिया पुरुषांच्या गैरहजेरीत ऋग्वेदांतील हिंदु स्त्रियां-प्रमाणेच स्वतंत्रपणें व उत्कृष्ट रीतीने घरधंदा पाहात; पण पुढे ग्रीक स्त्रियाही परावलंबी व केवळ सुखासीन बनल्या. ग्रीक शास्त्रवेत्ते आमच्या मनूप्रमाणेच, " A free woman should be bounded by the street door " ( Menander ) घराच्या उंबरठ्यापलीकडे स्त्रीला स्वतत्रता नसावी असे म्हणू लागले. Xemphon च्या *Æconomics* मध्ये एक पत्नी म्हणते, " My duty is simply to be modest. " " विनीतपणें असणे एवढेच माझे कर्तव्यकर्म मी समजते. " ग्रीक स्त्रिया यामुळे हळुहळू अडाणी व निरुपयोगी बनत चालल्या होत्या. पुरुषांचे मनरंजन, गृहाची शोभा ही त्यांचीं म्हणून ठर-लेलीं कामे करण्यालाही त्या दिवसेदिवस नालायक ठरत चालल्या व म्हणून ग्रीक पुरुषांना उच्च दर्जाच्या चटकदार करमणुकीसाठी Hetairae या नांवानें प्रसिद्ध असलेल्या कलावती स्त्रीवर्गाकडे वळावें लागलें. गृहलक्ष्मीचा अधिकार यामुळे सपुष्टांत येऊ लागला. Euripides ची नायिका Medea दुःखावेगानें एका ठिकाणीं म्हणते, " किती हतभागी आम्ही स्त्रिया ! भाराभर पैसे ओतून आम्ही नवरा मिळवतो; पण तो आमच्यावरच अधिकार गाजवतो. तो स्वभा-वानें बरा असला तर आमची स्थिति कांहींशी बरी असते; पण जर का तो दुष्ट असला, तर मात्र आमचे हाल कुत्रा खात नाहीं. बायको कजाग मिळाली तर डोक्यावर टोपी ठेवून नवरा बाहेर तरी जाऊ शकतो व आपल्या ओळखी-देखीच्या लोकांत आपलें मन रिझवतो. पण आम्हां बायकांना मात्र नवऱ्या-शिवाय दुसरी गतिच नाहीं. पुरुष नेहमीं आम्हांला हिणवितात की ' तुम्हां बायकांना काय, घराच्या सुखसावलींत आपले आळशासारखे बसून राहायचे; पण आम्हांला तर घराबाहेर लढाईच्या धगीत मरावे लागतें. ' पण मी म्हणते कीं, ' गर्भारबाळंतपणाच्या यातनांपेक्षां का लढाईचीं दुःखें जड आहेत ? बाळंतपणापेक्षां लढाईवर एकदां सोडून दोनदां जायचे मी तर आनंदाने पत्करीन.' " या उद्गारांवरून त्या वेळच्या ग्रीक स्त्रियांच्या स्थितीवर चांगला प्रकाश पडतो. पेरिक्लेज, त्याच्या प्रसिद्ध *Cration* मध्ये म्हणतो, " Women

should not belie their womanly nature, the great glory of which is that they should be as little as possible be spoken of amongst women, whether for good or ill. " स्त्रियांनीं आपल्या जातिसुलभ विनयाला कधी सोडूं नये. आपल्या वागणुकीची चर्चा, मग ती स्तुतिपर असो वा निंदापर असो,—पुरुषांत होऊं नये याबद्दल प्रत्येक स्त्रीनें खबरदारी घेतली पाहिजे. "

स्पार्टामधल्या स्त्रियांची स्थिति ग्रीक बायकांपेक्षां पुष्कळच बरी होती. वीरमाता म्हणून त्यांना मान असेच, शिवाय त्यांना स्वतत्रपणें शारीरिक शिक्षण वगैरे घेतां येई. निदान ॲथीनिअन बायकांसारखं केवळ किरकोळ गोष्टींनीं कालहरण करणे एवढेच त्यांचे कर्तव्य खास समजले जात नसे. याप्रमाणे राष्ट्राची अर्धी शक्ति फुकट जात असल्याबद्दल कांहींच क्षिती ॲथीनिअन मुत्सद्यांना वाटली नाहीं. याविरुद्ध बडाळी केली असेल तर ती तत्त्ववेत्त्यांनीं व कलावंत लेखकांनीं. प्लेटोनें आपल्या रिपब्लिकमध्ये स्त्रीपुरुषांना नागरिकत्वाचे समान हक्क दिले आहेत. सॉक्रेटिस्, युरिपिडीज्, ॲरिस्टोफेन्स्-सारख्या लेखकांनाही स्त्रियांची ही सुखासीन गुलामगिरी पसंत नव्हती; पण अल्पसंख्याकांच्या या बंडाचा समाजरचनेवर कांहींच परिणाम होऊं शकला नाहीं.

हिब्रू लोकांमध्येही स्त्रियांच्याबद्दल अशाच समजुती प्रचलित होत्या. स्त्री ही मालमत्तेपैकीं एक वस्तु समजली जाई. गुलाम व अज्ञान यांच्या रांकेला कायदा त्यांना बसवी. रोमन लोकांतही स्त्रीवर पुरुषाची पूर्ण कायदेशीर सत्ता असे. स्त्री ही एक खाजगी मालकीची वस्तु समजली जाई; यामुळे स्त्रीच्या पावित्र्याला, पातिव्रत्याला साहजिकच अत्यंत कडक निकष लावला जाई. लुक्रेसीला तिच्या शीलभंगानंतर पावित्र्याच्या या जाज्वल्य कल्पनेमुळेंच मृत्यु हा अपवित्र व मानहीन जीवनापेक्षां श्रेष्ठ वाटला. रोमन स्त्री निमूटपणे या जूपुढे मान वांकवी. विषम व अन्यायी कायद्यांविरुद्ध बंड उभारण्याची कल्पनाही तिच्या मनाला कधी शिवली नाहीं. मात्र एकदां 'अर्ध्या औंसा-पेक्षां जास्त सोनें स्त्रीनें वापरूं नये ' असा कायदा करण्यांत आला असतां, रोमन स्त्रिया खवळून गेल्या व त्या कायद्याविरुद्ध मतप्रचार करूं लागल्या. तेव्हां प्रसिद्ध मुत्सद्दी केटो यानें उद्गार काढले, "या बायकांची शालीनता

गेली तरी कुठं ? कायदे पास करणें किंवा रद्द करणं हें कांहीं स्त्रियांना शोभेसे काम नाहीं. बायका जर अशा राजकारणांत पडू लागल्या तर अनर्थ होईल. 'समान हक्क' म्हणतां म्हणतां त्या लौकरच आमच्या डोक्यावर बसतील." अशा विरोधी व नियंत्रक वातावरणांतून सुद्धां रोममध्यें कॉर्नेलिया, व्हॉलुमूनिया, कॅलपुर्निआसारखीं नारीरत्ने निर्माण झाली.

येशू ख्रिस्ताच्या आगमनानें हिब्रू व रोमन लोकांच्या स्त्रीविषयक मतांत कांहीशी क्रांति झाली. उदारमनस्क अशा या तारक देवपुत्रानें स्त्रियांशी बरोबरीच्या नात्यानें धर्माच्या, मुक्तीच्या गोष्टी बोलाव्या. अनेक स्त्रिया उत्साहानें ख्रिस्ताच्या अनुयायी होऊन सद्धर्मप्रसार करूं लागल्या; पण येशू ख्रिस्ताचा स्त्रियांकडे पाहण्याचा हा नवीन दृष्टिकोण फारच अल्पायु ठरला. ख्रिस्तानतर ख्रिस्तधर्मीयांची स्त्रियांविषयीची वृत्ति अनुदार अशीच होती. स्त्रियांनीं पुरुषांच्या अंकित असावे; कारण त्या पुरुषांहून कमी दर्जाच्या आहेत. स्त्री ही अपवित्र व पुरुषाच्या मुक्तिमार्गांतील एक मोहमयी धोंड आहे अशीं मतें प्रचलित होऊं लागली. रोमन कॅथॉलिक उपाध्याय वर्गांत (Priesthood) पापी व अपवित्र ठरलेल्या स्त्रियांना प्रवेश नव्हता; (व अजूनही तो मिळालेला नाही.) इतकेच नव्हे तर, प्रत्येक उपाध्यायावर ब्रह्मचर्य पाळण्याची सक्ति होती. मूळचा कठोर व पितृसत्ताक कलाचा रोमन कायदा, (Patria Poestas) "स्त्री ही मोहाची व अपवित्र वस्तु आहे व म्हणून ती 'नरकमार्गद्वारस्य दीपिका' आहे." अशा वळणाचे ज्यूंचे (Mosaic) व पौर्वात्यांचे तत्त्वज्ञान व अरबस्थान, पॅलेस्टाइन, एशियामायनर या बुभुक्षित वाळवंटांतले वैषयिक तत्त्वज्ञान या त्रिकुटानें येशू ख्रिस्ताची स्त्रियांविषयींची उदार कल्पना गढूळ करून टाकली. स्त्री ही वैषयिक लालसा पुरविणारी एक जरूरीची पण तिरस्करणीय वस्तु ठरून राहिली.

याप्रमाणें स्त्रियांचा सामाजिक दर्जा रोमन कॅथॉलिक वर्चस्वाखाली मातीमोल झाला; मात्र स्त्रियांना सुद्धां आत्मा आहे असें गृहीत धरून त्यांना स्वतंत्रपणें ईश्वरभक्ति करण्याची परवानगी मठांतून (Nunnery) रोमन कॅथॉलिक धर्मानें दिली. हे त्याचे पाश्चात्य स्त्रियांवर मोठे उपकारच म्हणायचे. कारण हिंदु स्त्रियांना मुळीं पुरुषांच्या मध्यस्थीशिवाय कोठलेंही देवकार्य किंवा धर्मकृत्य करतांच येत नाहीं. या मठांतून ( Convents ) स्त्रिया निरनिराळीं

कलाकौशल्याची कामें करीत, धर्मग्रथांचा अभ्यास करीत व मठाची व्यवस्था पहात. हे सर्व गुण पुढें स्त्रियांना स्वातंत्र्य मिळाल्यावर उपयोगी पडले. मात्र ब्रह्मचारिणी स्त्रिया ही सर्व कामे करीत असल्यामुळें बौद्धिक, सामाजिक, व राज्ययंत्रविषयक कामे, व निसर्गदत्त प्रजाजननसंवर्धनादि बायकी कामे या दोहोत मनुष्याच्या मनांत कायमची फारकत होऊन बसली. विवाहित स्त्रियांनीं अर्थोत्पादन करू नये, घराबाहेर लक्ष देऊं नये; नाहीं तर त्यांच्या-कडून घरांतील गृहिणीच्या व मातेच्या कर्तव्याची आबाळ होईल असे प्रतिपादण्यांत येते, याचे कारण ही जुनी परंपरा.

पुढे सरंजामी पद्धतीच्या काळांत (Feudal System) लढाईच्या धामधुमीत पुन्हां स्त्रिया या एक जरूरीची पण कमी दर्जाची वस्तु होऊन बसल्या. मध्ययुगाच्या शेवटी Erasmus या लेखकाने एका नववधूच्या तोंडी असे शब्द घातले आहेत की, " What a hell is marriage ? What a slave's business ? And for whom, ye Gods ? For a gambler, a brute, a rake ! It would be far better to sleep with a pig." लग्न म्हणजे निव्वळ गुलामगिरी व शुद्ध नरकवास वाटतो मला ! आणि कधी कधी तर हलकट, व्यसनी नवऱ्याबरोबर सारे जीवन घालवायची वेळ येते. पशु तरी बरे असल्या नवऱ्यापेक्षां ! " मात्र या काळांत वैभवाच्या दिवसांतील सुखासीन स्त्रियांचा वर्ग अजिबात नाहीसा झाला. मोठमोठ्या किल्ल्यांच्या गढयांच्या स्वामिनीना कातावें, विणावे लागे; दारू गाळणे, कातडी कमावणे, कपडे रंगविणे, चिलखते दुरुस्त करणे अशा कामांवर अंग मोडून, वेळ खर्चून देखरेख करावी लागे. गरीब बायका तर नवऱ्याच्या धंद्यांत बरोबरीने हातभार लावीत किंवा स्वतः एकादा स्वतंत्र धंदा करीत व धंदेवार स्वतंत्र संघ (guilds) स्थापीत. शेताभातावर तर खुद्द शेतीखरीज दूधदुभत्याचे, कोंबड्या पाळण्याचें वगैरे किती तरी कामे पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियांना असत.

नंतर स्त्रीदाक्षिण्याचें युग आले ( Age of Chivalry ). या काळां-तील वीरवृत्ति, उदारमनस्कता व शुद्ध आचरण, उच्च प्रणयाला दिलेलें महत्त्वाचें स्थान या गोष्टींनी स्त्रियांच्या स्थितीवर कांहीं चांगला व कांहीं अनिष्ट असा परिणाम झाला. स्त्रियांना देवतेप्रमाणे मान देऊन त्यांच्या सेवे-साठीं शूर शिलेदार आपले प्राण अर्पण करण्यास तयार असत खरे; पण हा

श्रेष्ठ मान कुठल्या स्त्रियांना मिळे? तर थोर कुळांतल्या सुंदर स्त्रियांना. संरक्षणाची जरूरी स्त्रियांना आहे असे गृहीत धरून त्यांचे सतत संरक्षण करणें ही गोष्ट स्त्रियांच्या उद्धारास कशी कारणीभूत होणार? रशियांत स्त्रीला किती कमी उल्लेखिलें जात असे हें त्यांच्या एका साध्या म्हणीवरून दिसते. "A hen is not a bird, not a woman a human being." ( स्त्रीला मनुष्य गणणें म्हणजे कोंबडीला उडता पक्षी लेखण्यासारखे आहे. ) बाल्कन स्टेट्स् व मुसलमानी मुलखांतही हीच अवस्था होती. महंमद एके ठिकाणीं म्हणतो, "I have not felt any calamity more hurtful to man than woman." (स्त्रीसारखी पुरुषाच्या हिताला विघातक दुसरी गोष्ट नाहीं.)

रेनेसान्स किंवा पुनरुज्जीवनाचाही स्त्रियांच्या स्थितीवर दुहेरी परिणाम झाला. बुद्धिमान् व कर्तबगार स्त्रियांना चमकण्यास अवसर मिळाला; प्रॉटेस्टंट पंथांत प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तित्वाची दखल केली जात असल्यामुळें स्त्रियांना अगदींच महत्त्व नाही ही कल्पना उरली नाहीं. पण प्रॉटेस्टट पथाच्या पोटीं प्युरिटन पंथाचा जन्म झाला. या अतिसोवळ्या पथात स्त्रियांना तिरस्करणीय मानण्याची पुन्हां प्रथा पडली. प्रॉटेस्टट पंथानें सर्वच मठ मोडून टाकल्यामुळे स्त्रियांच्या कर्तृत्वशक्तीला मिळणारे हे एकटें क्षेत्रही बद झाले. पुढे अठराव्या शतकांत प्युरिटन्स् पंथाचा मोड झाला. या काळांतल्या तीन महत्त्वाच्या घडामोडीनीं स्त्रियांच्या स्थितीवर पुष्कळ परिणाम झाला. (१) सुखासीन स्त्रियांच्या वर्गाचा पुनरुद्भव, (२) औद्योगिक क्रांति व (३) फ्रेंच राज्यक्रांति. मध्यमवर्ग या कालांत सुखवस्तु व भरभराटीच्या स्थितींत आल्यामुळे आपल्या बायकामुलांकरवीं आपल्या वैभवाचे प्रदर्शन करण्याची त्यांची इच्छा व संधि वाढत गेली. कांही न करतां आळसांत काळ घालवणे हें भारदस्तपणाचें व उच्च कुलीनत्वाचे लक्षण समजलें जाऊं लागलें. क्वीन ॲनच्या अमदानींत The Town Ladies' Catechism (शहरांतल्या स्त्रियांची प्रश्नोत्तरावली) नांवाचें या सुखासीन, फॅशनेबल स्त्रियांची थट्टा करणारे एक चोपडें प्रसिद्ध झालें होते. त्यांतील खालील प्रश्नोत्तरे मोठीं मजेशीर आहेत.

प्रश्न :—"आपण आपला दिवस एकदरीनें कसा घालवतां?"

उत्तर :—"चांगलीं उन्हें आल्यावर उठतें, वेणीफणी, पोषाख यांच्यांत

सगळी दुपार जाते. रात्रीं चमचमीत जेवण व मग मध्यरात्र उलटेपर्यंत पत्ते."

प्र० :—" बरं, कांहीं धार्मिक व्रते वगैरे करतां का ?"

उ० :—" छे, छे, पार्ट्या करून मैत्रिणींना बोलावून खूप गप्पा छाटते व्रतांच्या दिवशी !"

प्र० :—" गप्पा तरी कशाच्या असतात एवढया ?"

उ० :—" नव्या फॅशनूस्, नवीन नाटक, सिनेमा—दुसरं काय !"

प्र० :—" बरं, वाचनबिचन कांही ?"

उ० :—" हो, हो. चटसारीं नाटकें, कादंबऱ्या, वाचून झाल्या आहेत."

प्र० :—" बरें, आपला सर्वात आवडीचा प्रीतीचा विषय कोठला ?"

उ० :—" मी स्वतःच."

प्र० :—" काय, दुसरे कांहीच नाही ?"

उ० :—" दुसरं होय ! माझा छोकरा, माझा टिप्या, आणि मीं पाळलेलं एक माकड,—ही सारीं मला फार फार प्रिय आहेत."

या आळशी सुखासीन बायका एका टोकाला, तर औद्योगिक क्रांतीनें कुत्र्याच्या छत्र्यांसारख्या उगवलेल्या हजारों गिरण्यांतून अर्धपोटीं कामें करणाऱ्या मजूर बायका दुसऱ्या टोकाला. कोंदट गिरण्या व गलिच्छ, अपुरी राहण्याची जागा; घरकाम व गिरणींतील काम या दुहेरी बोजानें होणारी ओढाताण व मुलांची आबाळ,—हा मजूर स्त्रियांचा इतिहास. यामुळेंच स्त्रिया व घराबाहेर काम, या दोन गोष्टी उच्चारल्याबरोबर पुष्कळांच्या डोळ्यांसमोर अव्यवस्थित घर, आबाळलेलीं पोरें, घाईनें केलेला अर्धाकच्चा स्वयंपाक, घाण, अतिश्रम या गोष्टी उभ्या राहतात! या दोन्ही टोकांच्या दोन स्त्रियांत, जमीनअस्मानाचा फरक असला तरी एक सामान्य गुण आढळतो. तो म्हणजे गुलामगिरी व परवशता. सरदाराची लाडकी लेक, व टांचण्या घडवणारी अर्धपोटी व अर्धवस्त्र मजूरस्त्री,—दोघींनाही स्वतःच्या सत्तेची अशी एक दमडीही नसे. कुटुंबाची मालमत्ता तर नवऱ्याचीच; पण स्त्रीची स्वतःची मिळकत सुद्धां नवऱ्याचीच. स्त्री हीच मुळीं बापाच्या व नवऱ्याच्या मालकीची एक वस्तु समजली जात होती. त्यांची स्वतःच्या भवितव्यतेवर, स्वतःच्या शरीरावर, काडी-इतकी सत्ता नसे, स्वतःच्या मुलावरही त्यांची सत्ता कायद्यानें चालत नसे. पुरुष हे

सर्वसत्ताधीश असल्याने, व संततिनियमनाचीं साधने त्या काळीं अज्ञात असल्या-मुळें नवऱ्याला, गर्भारपण बाळंतपणाच्या कोंडींत बायकोला सतत कोंडून घालतां येई. म्हातारपण किंवा मरण, याशिवाय या चक्रव्यूहांतून तिला सुटका नसे. घटस्फोट ही अतिशय भानगडीची किंबहुना जवळजवळ अशक्य गोष्ट होती. १७८४ पर्यंत नवऱ्याचा खून ही Petty Treason,—राजद्रोहासारखा गंभीर गुन्हा समजला जाई, व त्याबद्दल जिवंत जाळण्याची शिक्षा त्यांना होई.

इतक्या जड बेडयांनी स्त्रिया जखडल्या असूनही, या यातनांतून स्त्रियांनीं आपली सुटका करून घेण्याची किती तरी दिवस धडपड केली नाही. सुशिक्षित, पुढारलेल्या स्त्रियासुद्धां स्त्रियांच्या हक्कांची भाषा बोलणें पाप समजत. मेरी वुलस्टनक्रॅफ्ट, या पहिल्या स्त्रीस्वातन्त्र्यवादिनीचा हॅना मूर-सारखी सुविद्य बाई तिरस्कार करी. 'समान हक्कांची मागणी म्हणजे व्यभिचाराचा परवाना' असे ती म्हणे. "मुलींनीं स्वतःच्या बुद्धीवर व सारासार-विचारशक्तीवर कधीं विश्वास ठेवूं नये. कोणी रागें भरले तर ते सोशिकपणें ऐकून घेण्यास मुलींनी शिकलें पाहिजे. विरोधाला स्त्रियांनी नेहमी तयार असावें व तो शांतपणें सहन करावा. जगांत स्त्रियांना विरोध हा व्हायचाच. शांत, सोशिक स्वभाव, आज्ञाधारकपणा, क्षमा, हे गुण अगीं असण्यावर स्त्रियांचे सारें सौख्य अवलंबून आहे. आपले म्हणणें बरोबर आहे अशी स्वतःची खात्री असली, व दुसरें कोणी ते चुकीचे आहे, असे म्हणूं लागला तरी स्त्रियांनीं मुकाटयाने ते ऐकून घेतले पाहिजे." अशा तऱ्हेचा उपदेश या विदुषीनें स्त्रियांना केला आहे!

या सुमारास, "स्वातंत्र्य, समता, विश्वबंधुत्व" या त्रिपुटीची घोषणा फ्रान्समधून साऱ्या युरोपभर दुमदुमली. फ्रेंच राज्यक्रांतीनें (१७८९) स्त्रियांच्या स्वातंत्र्यांदोलनाला पहिला चालनाचा धक्का दिला. मेरी वुलस्टन-क्रफ्टचा *A Vindication of The Rights of Women* हा स्त्रीस्वातन्त्र्याचा आद्यग्रंथ १७९२ त प्रसिद्ध झाला. त्या काळांत या ग्रथाची चेष्टाच करण्यांत आली व मेरीच्या मरणानंतर तो लोकांच्या स्मरणांतून गेला सुद्धां. पण १९ व्या शतकांत स्त्रीस्वातन्त्र्याचे वारे वाहूं लागल्याबरोबर त्याचे पुनरुज्जीवन झालें. अठरा वेळां तो छापला गेला. १९२९ मध्यें त्याची पुनः एक आवृत्ति प्रसिद्ध झाली. मेरीनें "सामाजिक हक्क, राजकीय हक्क वगैरे तपशील बाजूला

ठेवून मुख्य तत्त्वालाच—स्त्रियांचें व्यक्तित्व माणुसकी सिद्ध करण्यालाच—हात घातला होता. पण मेरीचे प्रयत्न तिच्या हयातींत अरण्यरूदनवतच ठरले.

पुढें Romantic Movement नें व्यक्तिवादाचें ( Individualism ) तत्त्वज्ञान प्रचलित केल्यावर स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा कांहींशी सुधारली. १८१७ मध्ये स्त्रियांना सार्वजनिक जागीं फटके मारण्याचे बंद करण्यांत आले. १८३६ मध्ये कॅरोलीन नॉर्टन या थोर घराण्यांतल्या एका फॅशनेबल बाईच्या खटल्याने स्त्रियांची गाऱ्हाणीं चांगलींच वेशीवर टांगलीं गेलीं. या बाईच्या पतिराजानीं उभयतांची अपत्ये आपल्या ताब्यांत घेतलीं व लॉर्ड मेलबोर्नवर आपल्या बायकोपाशी Criminal Conversation ( सदोष वागणूक ) केल्याबद्दल फिर्याद ठोकली; तेव्हां मिसेस नॉर्टनला असे आढळून आलें कीं, कायदेशीर रीत्या स्त्रीला मुळीं स्वतंत्र अस्तित्वच नाहीं ! विवाहित स्त्रीला कुणावर फिर्याद करितां येत नाहीं व स्वतः तिच्यावर फिर्याद होऊं शकत नाहीं. तिला स्वतःतर्फे वकील सुद्धां देतां येत नाहीं. मुलांवर पालक या नात्याने तिची काडीची सत्ता नसते. नवऱ्यानें सोडून दिल्यावर सुद्धां, ती जर कमावूं लागली तर तिची मिळकत कायद्यानें नवऱ्याच्याच मालकीची होते. मिसेस नॉर्टनने " The natural claim of a mother to the custody of her children. " नांवाचें एक पत्रक प्रसिद्ध केलें. ( मुलावर आईचा नैसर्गिक हक्क प्रस्थापित करण्याविषयीं. ) मिसेस नॉर्टन ही फॅशनेबल व समाजांत नांवाजलेली व लोकप्रिय अशी असल्यामुळे हे पत्रक व हा खटला खूप गाजला. पण १९२५ च्या Infants Custody Act पर्यंत स्त्रियांना आपल्या औरस संततीचे कायदेशीर पालक होण्याकरितां वाट पाहवी लागली. १८५५ मध्यें बार्बारा ले स्मिथनें A brief summary in plain language of the most important laws concerning Women " नांवाचें पत्रक काढलें. ( स्त्रीसंबधीं सर्व कायद्यांचा साध्या भाषेत सारांश. ) व स्त्रियांच्या वारसाहक्काबद्दल सभा भरून बऱ्याच चर्चा झाल्या. १८७० व १९०८ च्या दरम्यान, बऱ्याच चळवळीनतर बरेचसे Married Women's Property Acts ( विवाहित स्त्रीच्या मालमत्ताविषयक कायदे ) पास झाले व स्त्रियांना मालमत्तेच्या मालकी हक्कांपैकीं बरेचसें मिळालें. विवाह व विवाहविच्छेदाचे कायदे सुधारण्यासाठीं याच व्यक्तिमाहात्म्याच्या काळांत बरीच चळवळ झाली. तरी पण १८५७ च्या Matri-

monial Causes Act ( विवाहविषयक कायदे ) मध्यें विषमतेचें तत्त्व घुसलेंच; नवऱ्याला व्यभिचाराच्या आरोपावरून बायकोला सोडून देण्याचा हक्क असे; पण तिला मात्र व्यभिचाराच्या जोडीला क्रूरपणा, त्याग, किंवा असाच दुसरा गुन्हा नवरा करीपर्यंत त्याच्यावर घटस्फोटाची फिर्याद घालतां येत नसे. १९२३ मध्यें ही विषमता कांहींशीं दूर करण्यांत आली.

हे झाले सामाजिक किंवा कायदेशीर हक्कांविषयी; पण पूर्ण नागरिकत्व कांही राजकीय समान हक्कांवाचून प्रस्थापित होऊं शकत नाही. या हक्कांबद्दल चळवळ प्रथम मजूरवर्गांतील स्त्रीपुढाऱ्यांनीं केली. त्या हळुहळू पुरुषांच्या राजकीय सभांतून भाग घेऊं लागल्या व स्वतंत्र स्त्रियांच्या सभाही भरवू लागल्या. इलिझाबेथ फराय, मेरी कार्पेंटर, फ्लॉरेन्स नाइटिंगल सारख्या बायका सार्वजनिक परोपकाराचीं कृत्यें करून, स्त्रियांचाही पुरुषांप्रमाणेच जगाला उपयोग होतो, हे सिद्ध करून दाखवीत होत्या. १८३१ मध्ये वेस्ट मिन्स्टर रीव्ह्यूमध्ये स्त्रियांच्या मताधिकाराचा प्रथम उच्चार झाला. १८५६ मध्ये जॉन स्टुअर्ट मिलनें आपल्या पक्षाच्या कार्यक्रमांत ‘ स्त्रियांना मतदान ’ हे कलम घातलें व नतर साठ वर्षे पार्लमेंटरी उमेदवारांच्या निवडणुकींतील हे एक महत्त्वाचे कलम होऊन राहिलें होतें. अनेक वर्षें झगडून स्त्रियांनी मताधिकाराची प्राप्ति शेवटी कशी करून घेतली, हें मागील एका प्रकरणांत आलेच आहे.

याप्रमाणें स्त्रियांना राजकीय समान हक्क मिळाले, पण मताधिकार किंवा राजकीय समान हक्क हें कांहीं स्त्रीस्वातंत्र्याच्या आंदोलनाचें अंतिम स्वरूप नव्हे; तें केवळ एक साधन आहे. साध्याची व्याख्या निरनिराळ्या पुढाऱ्यांनीं निरनिराळ्या प्रकारानें केली आहे. मेरीच्या मतें शैक्षणिक सुधारणा हें साध्य होतें, फ्लॉरेन्स नाइटिंगेलची स्त्रियांच्या बौद्धिक कोंडमाऱ्याविरुद्ध तक्रार होती, “ To have no food for our heads, no food for our heart, no food for our activity, is that nothing ? ” (आमच्या बुद्धीची, भावनेची, कर्तृत्वशक्तीची उपासमार होत आहे; इकडे कुणाचेंच कसें लक्ष जात नाहीं ? ) असे उद्गार तिनें एके ठिकाणीं काढले आहेत व ते सर्वथैव रास्त आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं स्त्रियांना “ माणुसकीला ” जरूर असें सुद्धां शिक्षण दिले जात नसे. उत्तम गृहिणी कसें व्हावें हेंही त्यांना शिकविले जात नसे. फक्त नवरा मिळवण्याची कला

त्यांना पढवली जाई. एकदां नवरा पटकावला कीं मग स्त्रीचें आयुष्य वाऱ्यावर निरर्थक गोष्टींत व्यर्थ जाई. १८७० मध्यें मुलांबरोबर मुलींच्याही प्राथमिक शिक्षणाला सुरुवात झाली. १८६३ मध्ये केंब्रिज युनिव्हर्सिटीनें मुलींना आपल्या परीक्षांना बसण्यास तात्पुरती परवानगी दिली. १८७६ मध्यें ऑक्सफर्ड व केंब्रिज जॉइंट बोर्डाच्या परीक्षा स्त्रियांना खुल्या झाल्या. यानंतर दोन वर्षांनी स्त्रियांसाठी मराया ग्रे ट्रेनिंग कॉलेज निघालें व लंडन युनिव्हर्सिटीनें स्त्रियांचा पुरुषांबरोबर समान दर्जा कबूल केला. इतर सर्व शिक्षणसंस्थांतूनही स्त्रियांना हळुहळू खुलें द्वार झाले. पण सर्व साधनें उपलब्ध होऊनही स्त्रियांचा बुद्धिप्रकर्ष अजून व्हावा तसा इंग्लंडांतही झालेला नाहीं. नाना शतकांची जुनी रूढि व घरकाम व बौद्धिक व्यवसाय याचे दुहेरी जूं अद्यापि स्त्रियांच्या बौद्धिक खुल्या विकासास अडथळा करीत आहे.

याप्रमाणे शैक्षणिक व राजकीय समान हक्क मिळाल्यावर नैतिक समान हक्कांचा प्रश्न जोसेफाइन बटलर आदींनीं निर्माण करून स्त्रियांवर अन्याय करणारे कायदे कसे मोडून काढले, याची हकीकत मागील प्रकरणांत आलीच आहे. सर्व क्षेत्रांतून, सर्व धंद्यांतून, सर्वांगीण समान हक्क, समान संधि स्त्रियांना मिळावी, ही स्त्रियांची मागणी जागतिक युद्धोत्तर (१९१८) राष्ट्रानें पुरी केली व प्रतिष्ठित धंद्यांत पडून स्त्रिया सुखासमाधानानें राहूं लागल्या.

पण श्रमजीवि स्त्रियांचा प्रश्न अद्यापि शिल्लक होताच. त्यांची स्थिति दिवसेंदिवस जास्तच बिकट होत चालली होती. अत्यंत कमी मजुरी, गलिच्छ जागा अशा परिस्थितींत कधीं कधीं सगळ्या कुटुंबाला पोसण्यासाठीं त्यांना कष्ट करावे लागत. कारण घरांतील पुरुष वाढत्या प्रमाणावर बेकार बनत चालले होते. बायका थोडया मजुरीवर येतात म्हणून त्यांना पुरुषांऐवजीं गिरणींत काम मिळे. स्त्रियांची शारीरिक दुर्बलता, कुटुंबभरणाची दुय्यम जोखीम व मातृपदामुळें सतत कामाची अनिश्चितता या सबबीवर गिरणीमालक त्यांना कमी मजुरी देत. आपल्या तोंडचा घास स्त्रिया काढून घेतात असें पाहून पुरुष मजूर स्त्रियांवर चिडूं लागले. स्त्रियांना गिरण्यांतून हळुहळू कमी करण्यांत यावें, अशा विनंत्यांचीं डेप्युटेशनें ग्लॅडस्टनसाहेबांकडे येऊं लागलीं. "घर हें स्त्रीचे क्षेत्र आहे" असे तत्त्वज्ञान शहाजोगपणें पुढें करण्यांत येऊं लागलें.

दुसऱ्या बाजूनें मृदु हृदयाच्या कांहीं समाजशास्त्रज्ञांना गिरणींतील अस्वच्छ व रोगट वातावरणांत काम करणाऱ्या स्त्रियांची दया येऊन, त्यांना सवलती देणारे अनेक Factory Acts पास करून घेण्यांत आले; पण या फॅक्टरी ॲक्ट्सूनीं परिणामीं स्त्रियांवर मोठा अन्याय झाला. स्त्रीची गणना या कायद्यांतून मुलें व अप्रौढ कामगार यांबरोबर करण्यांत येऊं लागली. स्त्रियांनीं अमुक खात्यांत अमुक परिस्थितींत काम करूं नये अशा स्वरूपाच्या प्रतिबंधक कायद्यांनीं (Restrictive Legislation) स्त्रियांच्या भावी दर्जावर फार अनिष्ट परिणाम झाला. पुरुषांइतके काम त्या करीत असूनही वरील प्रतिबंधक कायद्यांच्या सबबीवर गिरणीमालक त्यांना कमी मजुरी देत. या विषमतेमुळें या प्रतिबंधक कायद्यांविरुद्ध स्त्रीस्वातंत्र्यवादी पुढाऱ्यांनी ओरड चालवली आहे. असो.

इंग्लंडमधील स्त्रियांच्या स्वाधीनतेच्या आंदोलनाचा जवळजवळ दीड शतकाचा इतिहास असा आहे. आतां इंग्लंडमध्ये स्त्रियांना हवे असलेले शैक्षणिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक व नैतिक समान हक्क जवळजवळ संपूर्णत्वाने मिळाले आहेत. हे हक्क शहाणपणानें वापरून स्त्रिया आपली व राष्ट्राची दिवसेंदिवस प्रगति करून घेत आहेत. Our Freedom and Its Results या लेखसंग्रहांत Elcaner Rathvone या म्हणतात, "स्त्रिया परवश होत्या तेव्हां राष्ट्राची स्थिति एकाद्या चमत्कारिक होडीसारखी होती. होडी वल्हवणाराचा एक हात त्याच्या पाठीमागे बांधून ठेवल्यामुळे होडी वांकडी व मंद चालत होती; आतां तो हात सुटला आहे, पण फार दिवस बांधलेला असल्यामुळे आंबल्यासारखा झाला आहे;" तरी सुद्धां स्त्रिया सामाजिक व सार्वजनिक कार्यांत मन घालूं लागल्यामुळें घरें, सार्वजनिक आरोग्य, बालहितसंरक्षण, आंतरराष्ट्रीय शांतता वगैरे प्रश्नांकडे राष्ट्राचे लक्ष दिवसेंदिवस जास्त जास्त वेधले जात आहे, असे म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वींच्या काळीं सुद्धां जेव्हां जेव्हां स्त्रियांनी जनरूढीविरुद्ध बंड करून सार्वजनिक कार्याच्या प्रांगणांत पाऊल टाकलें तेव्हां तेव्हां ते मानवजातीच्या कल्याणासाठीं, एकाद्या मोठ्या अन्यायाच्या निवारणासाठीं किंवा एकादें मोठे अरिष्ट टाळण्यासाठींच टाकलें असें दिसून येईल. इलिझाबेथ फरायनें कैद्यांसाठीं, डोरोथिया डिक्सूनें वेडयांसाठीं, हॅरिएट, बीचर् स्टोनें गुलामांसाठीं,

फ्लॉरेन्स् नाइटिंगेलनें रुग्णांसाठीं, जोसेफाइन बटलरनें वेश्यांसाठीं आपलें तनमनधन वेंचलें; तेव्हां आजही स्त्रिया जसजशा सार्वजनिक कार्यांत जास्त जास्त भाग घेत जातील तसतसें जीवन जास्त सुखी, निवांत, निर्धोक होईल अशी आशा कां करूं नये ?

परंतु Feminism चा पूर्ण जय होण्यापूर्वींच त्या पक्षांत दुफळी होऊन घडयाळाचा लंबक दुसऱ्या बाजूला झुकू लागून Anti-feminism चा प्रचार सुरू झाला आहे. स्त्रीस्वातंत्र्यवादी पक्षांत सध्यां इंग्लंडमध्यें दोन तट झाले आहेत. जुना स्त्रीस्वातंत्र्यवाद व नवा स्त्रीस्वातंत्र्यवाद. पहिल्यांना Me too Feminists (हावरे स्त्रीस्वातंत्र्यवादी) असें उपाहासानें संबोधण्यांत येतें. या पक्षाला पुरुषांना जेवढे हक्क, संधि किंवा नोकऱ्या मिळतील तेवढया सर्व अगदी त्याच, स्त्रियांसाठीं हव्या असतात ! नवीन पंथाच्या स्वातंत्र्यवादिनी म्हणतात कीं, जोंवर साधे नागरिकत्वाचे हक्क सुद्धां स्त्रियांना नव्हते तेव्हां Me too (मला सुद्धां) म्हणून भांडणे योग्य होतें. पण नागरिकत्वाचे हक्क मिळाल्यावर आतां पुरुषांची नक्कल करण्याचे सोडून देऊन स्त्रियांना साजेल व सोयीस पडेल अशी परिस्थिति व हक्क स्त्रियांनी आपल्यासाठी मिळविले पाहिजेत. पुरुषांना ज्या परिस्थितींत व वातावरणांत काम करतां येते त्याच परिस्थितींत स्त्रियांना तींच कामें कशीं करतां येतील ? उदाहरणार्थ, कारखान्यांतील किंवा कोठल्याही प्रतिष्ठित धंद्यांतील स्त्रियांना सुद्धां, मूल होण्याचे वेळीं, विशेष सवलती हव्याच असतात. मग 'समान हक्क' म्हणून त्या सवलतींचा आततायीपणानें त्याग केला तर स्त्रियांच्या व संततीच्या प्रकृतीवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय कसा राहील ? असे संरक्षण मागणे म्हणजे कांहीं, स्त्रियांनीं आपला कमीपणा कबूल करणे नव्हे. भिन्नगुणधर्मांच्या दोन व्यक्तींच्या भिन्न भिन्न गरजा असावयाच्याच. या प्रतिबंधक कायद्याप्रमाणे मातेच्या हक्कांविषयीं व दर्जाविषयीही दोन्ही पक्षांत मतभेद आहे. जुना पक्ष म्हणतो, "मातृपद हा कांहीं धंदा नव्हे. प्रत्येक विवाहित स्त्रीला पुरुष करीत असलेला प्रत्येक धंदा खुला असला पाहिजे व तिला पुरुषाच्या बरोबरीनें मजुरी मिळाली पाहिजे" नवीन पक्ष म्हणतो, "मातृपद हाच एक महत्त्वाचा धंदा कां समजूं नये ? मुलांना जन्म देणें हा किती बिकट व धोक्याचा धंदा आहे ! घरकाम वर्षानुवर्षें करीत राहणें, हा गृहिणीचा

धंदा तरी किती त्रासाचा आहे ! एक दिवसाची सुद्धां सुट्टी नाहीं या धंद्यांत ! इतकें असून गृहिणी व मातांना सरकारी नोंदणी बुकांत निरुद्योगी (Unoccupied) म्हणून संबोधण्यांत येते ! व देशाच्या सपत्तीचा एक कणही हक्काचा म्हणून त्यांना मिळत नाहीं. तेव्हां, ही स्थिति पालटून, सरकारनें (Family allowances) "कौटुंबिक मदत" किंवा (Provisions for Children) 'अपत्यसगोपनार्थ तरतूद', स्त्रियांना देण्याची पद्धत पाडली पाहिजे. London School of Economics चे डिरेक्टर सर वुइल्यम बीव्हरिज् यांनीही "कौटुंबिक भत्ता" देण्याची पद्धत आपल्या हाताखालच्या लोकांत चालू केली होती. तेथील पुरुष व स्त्री शिक्षकांना दर मुलास ते १३ वर्षांचे होईपर्यंत ३० पौंड प्रत्येक वर्षाला मिळत व तेरा वर्षांनतर दर मुलास दरसाल ६० पौंड त्याचें युनिव्हर्सिटीचे शिक्षण पूर्ण होईपर्यंत मिळत. ही पद्धत बारा वर्षे या सस्थेत चालत होती. पुढें आर्थिक मदीमुळे ही पद्धत चालू ठेवणे या संस्थेला व इतर सस्थांनाही परवडेना.

हे झाले स्त्रीस्वातंत्र्यवादी पक्षातील दोन तटांविषयी. पण 'अजिबात स्त्रियांना स्वातत्र्य नसावे; घराबाहेर त्यांनी पडण्याचें काम नाही' असें तत्त्वज्ञानही (Anti-feminism) उद्‌भूत होत असल्याचे वर सांगितलेंच; अर्थात् ही अशी प्रतिक्रिया प्रत्येक चळवळीनतर होतेच. जसे राजकारणांत लोकशाही मागे पडून हिटलरशाही माजत चालली आहे, किंवा व्यापारांत फ्री ट्रेडच्या गप्पा बंद होऊन करांचे (Duties) बालेकिल्ले उभारले जात आहेत; त्याचप्रमाणें स्त्रीस्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानानतरची स्त्रियांना निव्वळ गृहिणी व माता बनविण्याची ही प्रतिक्रिया आहे.

ही प्रतिक्रिया, जर्मनींत, अगदी डोळ्यांवर येण्याइतकी स्पष्ट दिसते. कारण जर्मनींत, स्त्रियांची सुधारणा, हें नवीन वारे वाहू लागण्यापूर्वी, अगदीं कळसास पोचली होती. १९१८ त जर्मन रिपब्लिकने अशी घोषणा केली कीं, स्त्री व पुरुष यांना कायद्याने समान हक्क, समान कर्तव्ये व जबाबदाऱ्या व सार्वजनिक कामकाजांत समान सधि दिली जाईल. या घोषणेचा जर्मन स्त्रियांनीं पुरेपूर फायदा घेतला. Reichstag मध्ये फार मोठ्या प्रमाणांत बायका निवडून येऊं लागल्या. प्रांतांतील विधिमंडळांतून त्यांनीं सदस्यांच्या व प्रधानांच्याही जागा पटकावल्या. सर्व राष्ट्रीय व्यवसायांच्या शाखोपशाखां-

तून त्यांनी आपला प्रवेश करून घेतला व शिक्षक, शास्त्रज्ञ, कारागीर, राज्य-व्यवस्थेंतील कार्यवाहक, अशा नाना लहानमोठ्या जबाबदारीच्या जागांवर त्या कर्तबगारपणें कामें करूं लागल्या. १९२५ च्या शिरोगणतीप्रमाणें ११,४७८,००० जर्मन स्त्रिया अनेक व्यवसायांतून गुंतल्या होत्या. यांपैकीं ३,६४५,००० स्त्रिया विवाहित होत्या. त्यांचे धंदेवार कामगार संघ होते. आंतरराष्ट्रीय सभांतूनही त्या भाग घेत. आर्थिक, राजकीय, सामाजिक सारे हक्क त्यांनीं आपलेसे करून घेतले होते.

पण, स्त्रियांच्या या विजयापाठीमागे राष्ट्राची दीनदुबळी स्थिति उभी होती. राष्ट्र दुबळे व कंगाल झालें होते. १९३२ मध्ये ६,१२८,४२९ लोक बेकार होते. १९३३ त हिटलरचा उदय झाला व प्रथम बेकारीचें भूत गाडण्याचा त्यानें उपक्रम केला. नाना धंद्यांतून गुंतलेल्या कांहीं लोकांना बाहेर काढल्याशिवाय बेकारांना कामे कशी मिळणार? म्हणून अनार्य, ज्यू, कम्युनिस्ट आदि लोक धंद्यांतून बाहेर हुसकून देण्यांत आले; गृहराज्याची गोडवी गाऊन, युक्तीनें लाखो बायकांना परत घरांत डांबून ठेवण्यांत आले. स्त्रिया फारशी नाखुषी न दर्शवतां आर्थिक परावलंबिता स्वीकारण्यास तयार झाल्या. काम नसल्यामुळें गलितधैर्य व दीनवाणी झालेलीं स्वकीयांचीं तोंडे दिवसां-मागून दिवस पाहात बसण्यापेक्षां आपलीं कामे त्यांना देऊन आपण घरीं बसणें त्यांनीं पसंत केले. पुढें बाहेरचे काम करण्यास स्त्रियांना बंदी करण्यांत आली; व घरांत त्यांना शक्य तेवढ्या सुखसोयी उपलब्ध करून देऊन, मातृपदाचा उदोउदो सुरू झाला.

आर्थिक मंदीबरोबर दुसरीही कारणे या प्रतिक्रियेच्या मुळाशी दाखवून देतां येतील. Age of Renaissance ची, बुद्धिवादाची प्रतिक्रिया म्हणून सध्यां अंधश्रद्धेचें, विभूतिपूजेचें युग सुरू होत आहे. लोकांचा स्वतःच्या बुद्धीवरचा विश्वास उडाला असून, लेनिन, हिटलर, मुसोलिनी, गांधी, अशा एकाद्या विभूतीकडे आपल्या आचारविचारांना दिशा लावण्यासाठीं, ते वळू लागले आहेत; आणि विभूतिपूजेच्या युगांत युद्धप्रधान युगाप्रमाणें, स्त्रियांना नेहमीं पार्श्वभागीं राहावे लागते. याप्रमाणे आर्थिक मंदी, बुद्धिवादाविरुद्ध बंड, युद्धविषयक निकषांचें प्राबल्य ( Military values ) मातृपदाचा उदोउदो,

स्त्रियांचें पावित्र्य, विनयादि गुणांबाबत रोमन कॅथॉलिकांची कडक शिस्त, ही सारीं कारणें, स्त्रीस्वातंत्र्याचा लंबक विरुद्ध बाजूला झुकवण्यास जबाबदार आहेत.

स्त्रीस्वातंत्र्याचा हा लंबक, मध्यबिंदूस येऊन, तेथेंच निश्चयानें जर कुठें स्थिर झाला असेल तर तो फक्त रशियांत. लेनिनने प्रारंभींच "स्त्रियांशिवाय आमचे स्वराज्य पूर्ण होणार नाहीं;" अशी घोषणा केली व प्रत्येक मजूर स्त्रीच्या उंबरठ्यापर्यंत शिक्षणाचे, सुधारणेचें, व राजकीय जागृतीचें लोण पोचवण्यास कंबर बांधली. रशियाची स्त्रियांकडे पाहण्याची दृष्टि अत्यंत मननीय व अनुकरणीय आहे. स्त्रियांना काम करण्याचा समान हक्क व संधि असून, त्यांचे मातृपद हे एक सामाजिक कार्य ठरले आहे; एंजिन चालवणारी स्त्री व किंडरगार्टन क्लास शिकवणारी स्त्री—या दोघीना रशियांत सारखाच मान आहे; दोघांची राष्ट्राला अत्यंत जरूरी आहे; स्त्रियांना आपलें काम सांभाळून, माताही होतां यावें म्हणून त्यांना सरकारनें कशा सवलती व कोठल्या सुखसोयी उपलब्ध करून दिल्या आहेत, हें आपण मागे एका प्रकरणांत पाहिलेच आहे. याप्रमाणे रशियाने स्त्रियांचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडवला आहे. स्त्रियांची परवशतेपासून मुक्तता झाली असून, त्या राष्ट्राच्या कर्तबगार घटक बनल्या आहेत; निसर्गानें लावून दिलेली प्रजाधारण-पोषणादि कर्तव्येंही त्या सुखासमाधानाने बजावीत आहेत. स्वतःचा उद्धार करून घेऊन, त्यांनी राष्ट्राच्या प्रगतीसही हातभार लावला आहे. "स्त्रियांच्या मदतीशिवाय आम्हांला यश मिळाले नसते" असे लेनिनने कबूल केले आहे. याप्रमाणे राष्ट्राची प्रगति व स्त्रियांचा उद्धार या परस्परावलंबी गोष्टी आहेत असे दिसून येईल. राष्ट्र विपन्नावस्थेत असतांना "स्त्रीस्वाधीनतेचे प्रयोग" कधींही यशस्वी होणार नाहींत.

---

प्रकरण १६ वें : : :

## .... .... उपसंहार

मागील प्रकरणांत इंग्लंडमधील स्त्रियांच्या स्वातंत्र्ययुद्धाचा इतिहास बघितला; त्यावरून असे दिसून येईल कीं इंग्लिश स्त्रियांची स्थिति ही हिंदी स्त्रियांप्रमाणेच एके काळीं अत्यंत दीनवाणी होती; शैक्षणिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक वगैरे कोठलेही हक्क त्यांना नव्हते. ते मिळ-वण्यासाठीं जवळ जवळ अर्धें शतक त्यांना झगडावें लागले. या इतिहासापासून हिंदी स्त्रियांनीं बोध घेण्याजोगा आहे. हिंदी स्त्रियांची अज्ञानाची काळोखी रात्र कितीही लांब वाटली, त्यांच्या आर्थिक परवशतेच्या शृंखला कितीही घट्ट असल्या, त्यांचा राजकीय व सामाजिक दर्जा कितीही अनुल्लेखनीय असला, तरी त्यांनीं निराश होण्याचे कारण नाही. योग्य दिशेनें अविरत प्रयत्न केल्यास ज्ञानाचा, स्वाधीनतेचा सूर्योदय योग्य काळीं खात्रीनें हिंदी स्त्रियांना दिसेल; शैक्षणिक, राजकीय वगैरे क्षेत्रांत हिंदी स्त्रियांची किती प्रगति झाली आहे हे आपण निरनिराळ्या प्रकरणांतून पाहिलेच आहे. या झालेल्या प्रगतीवरून भावी विजयाबद्दल निराश होण्याचे मुळींच कारण नाही, असें दिसून येईल.

आतां या उपसंहारांत हिंदी स्त्रीस्वाधीनतेच्या चळवळीविरुद्ध जे एक दोन आक्षेप पुढें करण्यांत येतात, त्यांचा विचार करावयाचा आहे.

स्त्रियांची चळवळ ही फक्त श्रीमंत स्त्रियांचे एक फॅशनेबल खूळ आहे; बहुसंख्याक स्त्रीसमाजाशी तिचा कांहींही संबंध येत नाहीं, हा एक आक्षेप होय. हा आक्षेप *Our cause* मध्ये श्रीमती कमलादेवी चट्टोपाध्याय यांनीं एका लेखामध्यें विस्तृतपणें पुढे मांडला आहे. त्या म्हणतात, " लिंगभेदापेक्षां वर्ग-भेद हाच स्त्रियांच्या दैन्याच्या मुळाशी आहे. समाजांत आज जिकडे तिकडे वर्गावर्गांतील भेद बळावतांना दिसत आहेत. अनेकांच्या श्रमावर थोडे गबर होत आहेत. कांहींना मुळीच काम नाहीं व कांहींना कामामुळें श्वास घेण्यास फुरसत नाहीं, असा विलक्षण देखावा जिकडे तिकडे दिसत आहे. या वर्ग-कलहामुळें स्त्रियांचे दैन्य दिवसेंदिवस वाढत आहे. सध्यांची स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ या वर्गकलहाकडे कानाडोळा करून वरवर हक्क मिळवण्यासाठीं चालवली जात आहे. असली चळवळ हें भांडवलशाहीचें एक पिल्लूच आहे

असे म्हणावयास हरकत नाहीं. यामुळें बहुसंख्याक स्त्रियांचा उद्धार होणें शक्य नाही. समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत ही चळवळ पोंचली नाहीं. हिंदुस्थानांतल्या चळवळ्या बायका कशासाठीं झगडतात? तर आर्थिक स्वातंत्र्यासाठीं, मालमत्तेच्या हक्कासाठीं, या आर्थिक स्वातंत्र्याच्या गप्पा फक्त श्रीमंतापुरत्याच आहेत. आज हिंदुस्थानांत लाखो बायका काम करून उपाशी मरत आहेत, तेथे काम करण्याचा हक्क (Right to work) मिळवण्याची भाषा कशाला ? हीच गोष्ट मालमत्तेच्या हक्काची. हिंदुस्थानांत मालमत्ता अशी किती लोकांना आहे? हिंदुस्थान कृषिप्रधान देश आहे. शेंकडा पंचाहत्तर माणसे खेडोंपाडीं कामधंद्यांतून गुंतलेलीं आहेत. त्यांपैकीं शेंकडा ५३ हक्काची जमीन नसलेले, केवळ कुळे म्हणून दुसऱ्यांची जमीन वहिवाटणारे आहेत! शिवाय एकंदर कृषियोग्य जमिनींपैकी तिसरा हिस्सा जमीनदारांच्या व महाराजांच्या ताब्यांत आहे. बरें, ज्या थोडया लोकांना हक्काची जमीन आहे, ती तरी किती थोडी! एका कुटुंबांत फारफार तर चार एकर जमीन असते. ही मालमत्ता (!) श्रीमंती वाढवण्याऐवजीं सारा-भरपाईमुळें कुटुंब डबघाईस मात्र आणते. उद्योगधंद्यांत कारखान्यांत गुंतलेल्या बायकांचीही 'मालमत्तेच्या' बाबतींत हीच हकीकत आहे. म्हणून आर्थिक स्वातंत्र्य व मालमत्तेचे हक्क यांसाठीं चालवलेली ही चळवळ निरुपयोगी असून शिवाय बहुसंख्याक स्त्रीवर्गास धोक्याचीही आहे; यानें भांडवलशाही बळावेल. एकाला खड्डयांत घालून दुसऱ्यानें त्यावर गबर होणें हें भांडवलशाहीचें तत्त्व. मालमत्ता असलेल्या मूठभर स्त्रियांनीं हक्कांसाठीं भांडणें म्हणजे गरीबांना पिळून काढण्याचा परवानाच मागणें होय.

हीच गोष्ट राजकीय हक्कांविषयीं. स्त्रियांना, सर्व प्रौढांना मताधिकार मिळाला म्हणजे राष्ट्राच्या दारिद्र्याचा प्रश्न सुटेल काय? असे असतें तर जेथें मताधिकार सार्वत्रिक आहे अशा इंग्लंडादि राष्ट्रांतून बेकारांची संख्या बेफाट कां वाढती? जोंवर सर्व सत्ता मूठभर श्रीमंत लोकांच्या हातीं आहे व आर्थिक विषमतेचें भूत राष्ट्रभर थैमान घालीत आहे, तोंवर स्त्रियांचा व राष्ट्राचा उद्धार या वरवर हक्कांनीं होण्याची आशाच नको. त्यासाठीं संबंध समाजाची आर्थिक घडी नीट बसवली पाहिजे. उत्पादन व व्यय यांची मांडणी जास्त तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध झाली पाहिजे. स्त्रियांचे प्रश्न हे केवळ

स्त्रियांचे प्रश्न नसून ते मानवी प्रश्न आहेत; समाजाची घटना आमूलाग्र बदलल्याशिवाय ते सुटणार नाहींत.''

या आक्षेपावर असें उत्तर देतां येईल कीं, स्त्रियांची स्वाधीनतेची चळवळ ही सध्यां मूठभर श्रीमंत व सुखवस्तु मध्यमवर्गीय स्त्रियांच्या हातांत आहे खरी; पण हा प्रकार प्रत्येक राष्ट्रीय चळवळीत आढळून येतो. समाजातील रूढ अन्यायांना धक्के देण्याचे काम हें नेहमीं प्रथम समाजांतील वरच्या दर्जांतील सुबुद्ध पुढाऱ्यांकडूनच केले जातें. हिंदुस्थानांतील कॉंग्रेस ही सुद्धां प्रारंभीं मूठभर सुखवस्तु व सुशिक्षित लोकांचीच संस्था नव्हती काय? तिची स्थापना होऊन आज अनेक वर्षें लोटल्यावर ती खालच्या थरापर्यंत भिडली आहे. स्त्रियांची चळवळ ही अजून बाल्यावस्थेत आहे. समाजांतील खालच्या थरांपर्यंत आपलें कार्य जाऊन पोंचलें पाहिजे ही जाणीव तिच्या पुढाऱ्यांस आहे. दिल्ली येथील अखिल भारतीय महिला परिषदेत या ध्येयाचा उच्चार व पुरस्कार अध्यक्षपदावरून केला गेला. कांहीं कालानें ही चळवळ बहुसंख्याक स्त्रीवर्गाची होईल यांत शंका नाहीं. तसेच सध्यां ज्या हक्कांसाठीं स्त्रिया झगडत आहेत ते बहुतेक सुखवस्तु व श्रीमत वर्गातील स्त्रियांनाच मिळण्याजोगे आहेत हेंही खरें; ज्या वर्गाच्या स्त्रिया या चळवळींत पुढारी आहेत त्या वर्गाचे प्रश्न प्रथम हातीं घेतले जावे हें साहजिकच आहे. स्त्रियांची चळवळ श्रमजीवि स्त्रियांपर्यंत भिडल्यावर त्यांचे प्रश्न साहजिकच पुढें येतील. मागें एका प्रकरणांत पाहिल्याप्रमाणें श्रमजीवि स्त्रियांचे प्रश्न सबंध राष्ट्राच्या भवितव्याशी निगडित आहेत; ते सोडवण्यासाठीं लढा करावयाचा तो सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रांपुरता नसून राजकारणाच्या क्षेत्रांत लढवावा लागेल. राजकारणांत स्त्रियांनीं किंवा त्यांच्या प्रातिनिधक स्त्रीपरिषदेने पडावे कीं नाहीं या महत्त्वाच्या व वादग्रस्त प्रश्नाला अस्तिपक्षीं उत्तर दिल्ली येथील अधिवेशनांत दिलें गेलें आहे; पण राजकीय व आर्थिक घडामोडी झाल्याशिवाय बहुसंख्याक स्त्रियांचे प्रश्न सुटावयाचे नाहींत असे म्हणून सामाजिक व शैक्षणिक हक्क व सुधारणा यांविषयींही खटपट न करतां हात जोडून बसणे वेडेपणाचे नाही काय? स्त्रीशिक्षणाचा प्रसार, स्त्रियांचें शारीरिक व नैतिक बलवर्धन, सामाजिक दुष्ट रूढींचा नाश, यासाठीं चळवळ चालू ठेवल्यानेंच अंतिम आर्थिक घडामोडींत समतेचें स्थान शोभविण्याला स्त्रिया

पात्र होतील असे कां म्हणूं नये? शिवाय ही चळवळ हें भांडवलशाहीचें पिल्लू आहे हें म्हणणें भ्रामक व सर्वथैव खोटें आहे. एका वर्गाच्या जीवावर दुसरा वर्ग गब्बर होणे याला भांडवलशाही म्हणतात. मध्यम वर्गातील स्त्रियांना सुशिक्षण मिळून त्या आर्थिक दृष्टया स्वतंत्र झाल्या, त्यांना मालमत्तेचे, राजकीय व सामाजिक हक्क मिळाले तर त्याचा उपयोग गरीब स्त्रियांना पिळून काढण्याकडे त्या कशा व कां करतील? ज्या थोडया स्त्रिया शिक्षणादि हक्क सर्वथा उपभोगीत आहेत त्या तरी असें करतांना दिसत नाहीत; उलट त्या आपल्या गरीब, अज्ञ बहिणीसाठीं तळमळतांना, त्यांच्या उद्धारासाठी शक्य ती खटपट करतांनाच आढळतात. तेव्हां स्त्रीस्वातंत्र्याची हिंदुस्थानांतील चळवळ ही निरुपयोगी व धोक्याची आहे हें म्हणणें बरोबर नाहीं.

स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीविरुद्ध दुसरा असा एक आक्षेप घेण्यांत येतो कीं, या चळवळीची दिशा व ध्येय हें चुकीचे व म्हणून समाजाला परिणामीं विघातक असे आहे. स्त्रियांनीं पुरुषांच्या बरोबरीनें शिक्षण घ्यावे, या स्वातंत्र्यवादिनींच्या अट्टाहासाने स्त्रियांचे कोमलत्व, वात्सल्यादि गुण मरून जाऊन त्या पुरुषी वळणाच्या बनत चालल्या आहेत; स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें आर्थिक स्वातंत्र्य असावे; घराबाहेरील जगांत त्यांना काम करण्याचा हक्क असावा, या आग्रहामुळें, स्त्रीची अविवाहित राहून स्वतंत्रपणें अर्थोपार्जन करण्याची इच्छा बळावत चालली आहे. स्त्रीनें लग्न केलें तरी, पैसे मिळवणें ती चालूच ठेवीत असल्यामुळें, तिच्याकडून साहजिकच गृहिणीपदाची हयगय होते. अशा स्त्रिया बहुतेक संततिनियमन करून मातृपद स्वीकारण्याचें टाळतात. पण, यदाकदाचित् त्यांना मुलें झालींच तर त्यांच्या संगोपनाकडे दुर्लक्ष करून, त्यांना नोकरावर सोपवून त्या आपली नौकरी चालू ठेवतातच. यामुळें पुरुषाच्या कुटुंबसुखाची होळी होते. मुलांचे नुकसान होते व त्यामुळें राष्ट्राचेंही होतें. बरें, एवढें करून स्वतः स्त्रीलाही मोठें सुख लाभते असे नाहीं! नौकरी म्हणजे कुणाची तरी गुलामगिरी, तिला घराबाहेरही करावी लागते. मग त्यापेक्षां घरांतच गुलामगिरी केली तर ती जास्त सुखास तरी येईल. ही विचारसरणी *The Ethics of Feminism* या पुस्तकाचे कर्ते प्रो. वाडिया यांनीं पुढें मांडली आहे. स्त्रीशिक्षण, मताधिकार, मालमत्तेचे हक्क वगैरेंमध्यें त्यांनीं उदार धोरण स्वीकारलें असलें, तरी स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याच्या

मात्र ते अगदीं विरुद्ध आहेत. स्त्रियांना शिक्षण द्यावे, पण तें त्या उत्तम गृहिणी व माता व्हाव्या म्हणून. त्यांना मताधिकार असावा, पण विधिमंडळांत सदस्य म्हणून बसण्याच्या किंवा प्रधानपदे स्वीकारावयाच्या मात्र त्यांनीं भानगडींत पडूं नये, अशी प्रो. वाडियांची विचारसरणी आहे.

यांतील शिक्षणविषयक व आर्थिक स्वातंत्र्यविषयक मुद्द्यांना मागील त्या विषयावर लिहिलेल्या प्रकरणांतून उत्तरें दिलीच आहेत. स्त्रीला शिक्षण द्यावयाचे ते ती एक ‘ मानवप्राणी ’ आहे म्हणून दिलें पाहिजे; शिक्षणाच्या योगें राष्ट्राची एक उत्तम नागरिक व समाजाचा एक कर्तबगार घटक होण्याची पात्रता तिच्या अंगीं आली पाहिजे; खऱ्या शिक्षणाचे ध्येय स्त्री व पुरुषाच्या बाबतींत हेंच असावे; या सर्वसामान्य शिक्षणानंतर पुरुष ज्याप्रमाणें तो ज्या विशिष्ट धंद्यांत पडणार असेल, त्या धंद्याचे तांत्रिक शिक्षण घेतो, त्याप्रमाणे स्त्रीला गृहिणीपदाचे व मातृपदाचे शिक्षण घेतां येईल. नागरिकत्वाचें शिक्षण त्यांना न देतां, नुसतें मातृपदविषयक देऊन त्यांना घरांत डांबून ठेवणे म्हणजे राष्ट्राच्या अर्ध्या शक्तीचा अपव्यय करणे आहे. आज इतकीं वर्षें हिंदुस्थानांत स्त्रिया फक्त गृहिणीपद, मातृपद संभाळून आहेत. याचें दृश्य फळ आज आपणांस काय दिसते ? दुबळी, अडाणी, आकुंचित दृष्टीची माता व तिचेच आनुवंशिक गुण घेऊन जन्मास येणारीं मुले यांनी हिंदुस्थान आज अधोगतीस जात आहे.

हीच गोष्ट आर्थिक स्वातंत्र्याची. स्त्रियांनीं घराबाहेर पडूं नये, असा आग्रह धरल्याने राष्ट्राची अर्धी शक्ति केरपोतेरें व मुले वाढविणे यांत कुजत पडली आहे. तिचा यथायोग्य उपयोग राष्ट्रीय कामी केल्यास, राष्ट्राच्या उद्धाराचा दिवस जवळ येणार नाहीं काय ? स्त्री मिळवती झाल्यास कुटुंबाचे दारिद्र्य फिटेल, स्त्रीचा आत्मसंमान वाढेल, मुलें संपन्न स्थितींत वाढतील, त्यांच्या उत्कर्षाला कंगालपणाचा अपशकून जेथें तेथें होणार नाहीं, आईपासून येणारा भित्रेपणा, न्यूनगड मुलांच्या ठिकाणीं दिसत नाहींसा होईल, धीट, दिलदार व संपन्न नागरिक समाज व राष्ट्र दिवसेंदिवस सुखी व संपन्न करतील. मात्र स्त्रीला निवांतपणें राष्ट्राची सेवा करतां यावी, म्हणून तिच्याकडचें घरकाम व अपत्यसंगोपन या जबाबदाऱ्या राष्ट्रानें मागें एका प्रकरणांत सूचित केल्याप्रमाणें आपल्या शिरावर घेतल्या पाहिजेत.

याप्रमाणें स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीविरुद्ध घेतल्या जाणाऱ्या एकदोन आक्षेपांचा विचार केला. आतां शेवटीं आधुनिक स्वातंत्र्येच्छु स्त्रीची, राष्ट्रापाशीं व पुरुषवर्गापाशीं काय मागणी आहे, हें कविश्रेष्ठ टागोरांच्या शब्दांत सांगून, वाचकांचा निरोप घेतें.

" I am no Goddess to be worshipped, nor yet the object of common pity to be brushed aside like a moth, with indifference. If you design to keep me by your side in the path of danger and daring, if you allow me to share the great duties of your life, then you will know my true self. "

" एकाद्या देवीसारखी माझी पूजाही व्हायला नको आहे; आणि एकाद्या कृमिकीटकाप्रमाणें मला पायदळींही पडायला नको आहे. मला पुरुषाच्या खांद्याला खांदा लावून जीवनकलहांत झगडायची, अग्निकाष्ठें खायची एकदां परवानगी तर द्या, म्हणजे मग माझी खरी परीक्षा तुम्हांला होईल. "

---

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १५ | सहचारी | सहचरी |
| ५ | ३ | योद्ध | योद्धे |
| ८ | ६ | प्रजेत | व्रजेत |
| ८ | १४ | मार्थयिता | प्रार्थयिता |
| १४ | १६ | श्वश्वां | श्वश्वां |
| १५ | १७ | अमयच्छन् | अप्रयच्छन् |
| १८ | ९ | कमेटी | कमिटी |
| ३६ | २६ | साक्षेपानें | साटोपानें |
| ३७ | १० | पारोठें | पारठें |
| ४४ | १४ | तरण्या | पारठ्या |
| ४९ | ८ | शहारांतून | शहरांतून |
| ५० | ११ | खरा | सारा |
| ५२ | ५ | करतां | सांगता |
| ५२ | ११ | आभासपूर्वक | अभ्यासपूर्वक |
| ५२ | १३ | भेडावणाऱ्या | भेवडावणाऱ्या |
| ६० | १८ | त्यांनाच देण्यापुरतां | त्यांनाच उत्तर देण्यापुरता |
| ६३ | २७ | सनातनींच्या | सनातनीचा |
| ७३ | १९ | धर्मसूत्रांत | धर्मसूत्रांत, |
| ७३ | ३० | वंशवृद्धीसाठीं | वंशवृद्धीसाठीं, |
| ७४ | २१ | कारणामुळें | कारणामुळें— |
| ८० | १४ | घटस्फोटांत | घटस्फोटानें |
| ८१ | २६ | सामित्यांच्या | समित्यांच्या |
| ८२ | १३ | हा | हा, |

| | | | |
|---|---|---|---|
| ८८ | १७ | बहुपत्नीत्व | बहुपतीत्व |
| ८८ | २९ | ,, | ,, |
| ९० | ३ | हिंदु | हिब्रु |
| ९० | ९ | ,, | ,, |
| ९२ | १८ | संस्कारात्मक | संकरात्मक |
| ९५ | २४ | तशी | तशा |
| ९६ | ३ | निरक्षरत्वामुळें | निरक्षरत्वामुळें, |
| ९६ | ३ | अनुभवामुळें | अननुभवामुळें |
| ९९ | ९ | या | — |
| १०० | ५ | समानबुद्धि | संमानबुद्धि |
| १०० | १० | परस्पर समान | परस्पर संमान |
| १०० | १३ | ,, | ,, |
| १०० | १७ | सम्मान स्वभाव | सम्मान भाव |
| १०१ | १२ | त्याची | त्यांची |
| १०१ | २७ | जपणारी | जपणारी, |
| १०२ | २९ | पुढच्या | पुढच्या, |
| १०३ | १८ | पाडो | पाडो; |
| १०५ | २० | नायकांना | बायकांना |
| १०५ | २४ | ' गढलेल्या | ' वठलेल्या |
| १०७ | १० | बदलल्यामुळें | बदलल्यामुळें, |
| १०७ | १५ | तत्त्वत: | तत्त्वत:, |
| १०७ | १५ | कर्तृत्व | कर्तव्य |
| १०८ | ११ | खरें | सारें |
| ११० | ७ | झालेल्या | झालेल्या, |
| १११ | १२ | पुरुषांना | पुरुषांनीं |
| ११३ | १८ | खऱ्या | साऱ्या |
| ११४ | १३ | लागणाऱ्या | झटणाऱ्या |
| ११५ | ३ | व | व या |
| ११५ | ९ | आहेत; | आहेत व |

| | | | |
|---|---|---|---|
| ११७ | १७ | ब्राह्मी | ब्राह्मो |
| ११९ | १६ | (Filtration) तत्त्वानें | (Filtration तत्त्वानें) |
| १२२ | २ | त्या | या |
| १२२ | ३ | Education | New Education |
| १२२ | ३ | सार्टर | साल्टर |
| १२३ | २८ | सारक्षतेच्या | साक्षरतेच्या |
| १२४ | ९ | होताच, | होताच; |
| १२९ | ४ | कर्वे विश्वविद्यालयाचा | कर्वे यांनीं काढलेल्या विश्व-विद्यालयाचा |
| १३० | १४ | अव्यंग | अपंग |
| १३२ | ६ | इंग्लिशोत्तर | इंग्लिशेतर |
| १४० | २७ | खुरटलेल्या | खुरटलेल्या; |
| १४१ | २ | प्रिय: | मिथ: |
| १४१ | ९ | मात्र | मान |
| १५३ | २२ | आध्यम्निक | आध्यग्निक |
| १६० | २४ | घेतल्याबद्दल | घेण्याबद्दल |
| १६४ | १४ | मुंबईंत | मुबईनें |
| १६६ | ५ | इंग्लंडमध्यें | इंग्लंडमध्ये, |
| १६७ | २८ | टाकण्याबद्दल | टाकण्याबद्दलच्या |
| १६९ | १३ | इंटरटेनर | एंटरटेनर |
| १७० | १२ | संततिवयाची | संमतिवयाची |
| १७० | १८ | वेळीं | वेळीं स्त्री |
| १७७ | २२ | स्त्रियाही उत्साहपूर्ति | स्त्रिया उत्साहमूर्ति |
| १७९ | १८ | बरोबरीनें | बरोबरीनें— |
| १९१ | २ | आंतरशोधी | अंतर्शोधी |
| १९१ | ४ | ,, | ,, |
| १९१ | २७ | बालदिनसंरक्षक संस्था | बालहितसंरक्षक संस्था, |
| १९२ | ९ | झोडल्या, | झडल्या, |
| १९४ | १६ | या विषयाच्या | वेश्याव्यवसायाच्या |

| | | | |
|---|---|---|---|
| १९५ | २ | करून, | करून |
| १९५ | ३ | स्त्रियांना | स्त्रियांत |
| १९६ | ८ | सर्वसाधारण दृष्ट्या | सर्वसाधारणदृष्ट्या |
| १९७ | २४ | आहे, | आहे; |
| २०२ | २७ | संघटणा | संघटना |
| २०३ | २४ | (Unemployment Benefit Furd) | Unemployment Benefit Fund. |
| २०५ | २५ | त्याच्या | त्यांच्या |
| २०७ | ८ | करण्याचा हक्क | करण्याचा हक्क; |
| २११ | २७ | मजुरीचा | मजुरांचा |
| २१४ | २१ | कुटंबाचें | कुटुंबाचें, |
| २२१ | २७ | वासनांतील | बासनांतील |
| २२२ | २५ | हीच | हाच |
| २२२ | २७ | पडदा मनोवृत्ति | पडदा-मनोवृत्ति |
| २२५ | १२ | जीवनसृष्टी | जीवसृष्टी |
| २२६ | १८ | तणाणून | तण्णाऊन |
| २२६ | २८ | जगाशी | जगाशी, |
| २२६ | ३० | असतां | असतो. |
| २३० | १० | जाते. | जाते, |
| २३० | २२ | नसतात; | असतात; |
| २३२ | १३ | सौंदर्यसाधन | सौंदर्यप्रसाधन |
| २३३ | २५ | खुबीनें | खुषीनें |
| २५० | १० | ध्येयव्यक्ति | ध्येयभूत व्यक्ति |
| २५० | २८ | पुरुषात | पुरुषांत हे |
| २५२ | १३ | Hammurabis | Hammurabi |
| २५३ | ३० | Cration | Oration |
| २५४ | ४ | Women | men |
| २५७ | ६ | not a woman | nor a woman |
| २६० | २ | व्यक्तित्व | व्यक्तित्व, |
| २६६ | १८ | Eleaner Rathvone | Eleanor Rathbone |
| २६३ | ३० | हॅरिएट, | हॅरिएट |

# संदर्भ–ग्रंथ



खालील पुस्तकांचा, प्रबंध लिहितांना उपयोग केला आहे :—


| | |
|---|---|
| The Position of Women in Hindu Civilisation | Dr. A. S. Altekar. |
| Woman in India | Mary F. Billington. |
| The Awakening of Asian Womanhood | M. E. Cousins. |
| Purdah | Mrs. Frieda Das. |
| A Short History of Women | John Lang-don Davies. |
| Woman and Tomorrow | W. L. George. |
| Women and Economics | Charlotte P. Gilman. |
| Women | Winifred Holtby. |
| The Subjection of Women | John Stuart Mill. |
| The Suffragette Movement | E. S. Pankhurst. |
| The Position of Women in the U. S. S. R. | G. N. Serebrennikor. |
| The Ethics of Feminism | A. R. Wadia. |
| Our Cause—A Symposium | Edited by Shyam Kumari Nehru. |
| Our Freedom and Its Results by Five Women | Edited by Ray Strachey. |
| Women in Modern India Fifteen Papers | Edited by E. C Gedge Mithan Choski. |

| | |
|---|---|
| Indian Social Reform<br>A Collection of Essays, etc. | Edited by C. Y. Chintamani. |
| The Position of Women in Indian Life | by Her Highness the Maharani of Baroda and M. S. Mitra. |
| हिंदु स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा | कै. कृष्णाजी केशव गोखले |
| Women in Hindu Law | K. T. B. Aiyangar. |

[ वरील सर्व ग्रंथकारांची, लेखिका अत्यंत ऋणी आहे. ]